# माझीं कोरीव लेणीं

लेखिका

सौ. शांताबाई नाशिककर, बी. ए.

१९४०

किंमत २ रुपये

# परिचय

कादंबरीकर्त्री म्हणून सौ. शांताबाओी नाशिककर यांचें नांव महाराष्ट्रीय वाचकांना सुपरिचित आहे. "माझीं कोरीव लेणीं" ही त्यांची प्रस्तुत कादंबरी "स्त्री" मासिकांत प्रथम क्रमशः प्रसिद्ध झाली ती आता अेकत्रित पुस्तकरूपाने रसिकांच्या सेवेस सादर होत आहे.

साधी प्रौढ भाषा, घरगुती प्रसंगांचीं चटकदार वर्णनें, भावनांचा-विशेषतः स्त्रीहृदयांतील खळबळीचा यथातथ्य आविष्कार हे शांताबाओींचे सारे लेखनविशेष याहि कादंबरींत अुत्कटत्वाने प्रगट झालेले दिसून येतात.

पण शांताबाओींच्या अितर कादंबऱ्यांपेक्षा या कादंबरीला विशेष महत्त्वाचें असें स्थान वाङ्मयांत मिळणार आहे. कारण ही कादंबरी म्हणजे गेल्या पिढींतील सुखवस्तु आणि सुधारक अशा मध्यम वर्गांतील स्त्रीचें आत्मचरित्र आहे; आणि महाराष्ट्रीय मध्यम वर्गाच्या गेल्या पन्नास वर्षांचा सामाजिक अितिहास त्यांत आपोआपच चित्रित झाला आहे. आजच नव्हे, तर पुढे केव्हाहि ही कादंबरी वाचणाराला गेल्या अर्धशतकांतील महाराष्ट्रीयांचे आचारविचार, राहाणी, सामाजिक रूढि, विधवा स्त्रियांची परिस्थिति, त्यांच्याकडे पाहाण्याचा समाजाचा दृष्टिकोन, अित्यादींची अुपयुक्त आणि मनोरंजक माहिती मिळण्या-सारखी आहे.

या कादंबरीला सत्यसृष्टींतील अनुभवाचा पाया असल्यामुळे त्यांतील वर्णनें व स्वभावचित्रें अत्यंत वास्तव अशीं वठलीं आहेत. अितकीं, की कादंबरींतील काळांतच वावरलेल्या पुण्याच्या किंवा पुण्याशीं परिचित असलेल्या वाचकांना यांत कितीतरी "ओळखीचे चेहरे" आढळतील आणि गंमत वाटेल.

साध्यासुध्या चारदोन रेषांनी अेखादा व्यक्तिविशेष चित्रित करणाऱ्या चित्रकाराप्रमाणे शांताबाअीची लेखणी प्रभावी आहे. सुमतीने आपल्या आअीचें केलेलें वर्णन वाचून मागच्या पिढीतील अेका व्यवहारचतुर करारी गृहिणीचें चित्र कोणाच्या नजरेसमोर अुभें राहाणार नाही? श्रीधरपंत, विठ्ठलराव परांजपे, मावशी, किंवा सुमतीला कॉलेजच्या वाटेवर गाठून असा अनाचार न करण्याबद्दल तिचें मन वळवणारा वृद्ध गृहस्थ, अशीं सर्वच लहानमोठीं चित्रें आपापल्यापरी परिणामकारक झालीं आहेत.

ही कादंबरी लिहून शांताबाअीनी कादंबरी-वाङ्मयांत अेक महत्त्वाची भर टाकली आहे. महाराष्ट्रीय वाचक तिचें रसिकतेनें स्वागत करतील यांत शंका कसली?

**प्रकाशक**

# माझीं कोरीव लेणीं

## प्रकरण १ लें

पूर्वीच्या गोष्टी आठवण्यात एक प्रकारची मौज असते खरीच. प्रत्यगात्मा मनाचे खेळ पाहात असतो असें आपण वाचतों, पण त्याचें प्रत्यंतर आपणाला क्वचितच पाहावयाला मिळतें. आत्म-चरित्र लिहिताना किंवा त्याचें मनन करतांना मात्र खरोखरीच असें प्रत्यंतर मिळतें. आपल्या जन्माचा चित्रपट आपण त्रयस्थपणाने पाहून त्यांतील आपणांसकट आलेल्या सर्व पात्रांचे गुणदोष अजमावून पाहा-यचे अन् अमूक वेळी आपण असें वागलो नसतां किंवा असें वागलों असतो तर फार बरें झालें असतें अशा विचारांनी उगीचच तळमळायचें. त्या तळमळीतमुद्रा, दुखान्त नाटकाप्रमाणे एक प्रकारचें सुख लाभतें की काय, असादेखील मनाला कित्येक वेळां संशय येतो. सात सात वर्षांनी आपल्या शरिरातील प्रत्येक अणुरेणू बदलतो असें कुसाआत्याबाई म्हणत तें खरें असेल तर सात वर्षांनी आपला पुनर्जन्म होतो असेंच म्हटलें पाहिजे. आत्मचरित्र लिहिताना खरोखरीच वाटू लागतं, की या चरित्राची नायिका मीच आहें की दुसरी कुणी स्त्री आहे ? जों जों पूर्वीच्या गोष्टीचा विचार करूं लागावें तों तों हीच भावना दृढ होऊं लागते

मी॰सातसात वर्षांनी मरून, फिनिक्स पक्ष्याप्रमाणे लगेच पुन्हा जन्मलें असें धरलें तर आतापर्यंत मला सात पुनर्जन्म मिळाले असें

म्हटलें पाहिजे. कारण आता मला पन्नासावें वर्ष चालू आहे. किंवा माझ्या या सात पिढया झाल्या असें तरी म्हणावयास काय हरकत आहे ? माझी आत्मकथा म्हणजे या सात पिढयांची नवलकथा आहे. नवलकथाच नव्हे तर काय ? कारण यांतील कित्येक व्यक्तींची आणि स्थळांचीं नांवें बदललेली आहेत. नाहीतर ह्यात असलेल्या व्यक्तींना उगीच बोलपटावर खेचून आणल्यामारखें एखादे वेळी वाटायचें !

या सात या आंकडयावरून आठवलें. लहानपणी अद्‌भुतरम्य गोष्टी ऐकण्याचा मला अतोनात नाद असे. त्या गोष्टींतील राजांचे राजवाडे नेहमी सातचौकी, सातमजली असायचे त्यांतील प्रत्येक मजला वेगळया रंगाने आणि वेगवेगळ्या जिनसांनी सुशोभित केलेला असायचा.

माझ्या आयुष्यांत असेंच नाही का झालें ? राजवाडा, राजकन्या या मोठमोठया गोष्टी सोडून द्या; कारण मी कांही कुणी राजकन्या नाही. एका सुखवस्तु शिक्षकाची मी मुलगी ! आणि माझ्या आयुष्याला सातमजली राजवाडयाची उपमाहि योग्य नव्हे. माझ्या आयुष्यांत टोलेजंग, रम्य असें कांहीहि झालें नाही. अर्थात् इतरांच्या दृष्टीने. बाकी तसें पाहिलें तर प्रत्येकजणाला आपलें आयुष्य इतकें महत्त्वाचें असतें, की किंबहुना तो असतो म्हणूनच इतर जग असतें. या दृष्टीने पाहाता प्रत्येकजण आपल्या आयुष्याचा सम्राटच असतो. त्याचें आयुष्य हें त्याच्या राजवाडयाप्रमाणेच भव्य असतें. त्या आयुष्यांतील सुखदु:खांचे प्रसंग तो एखाद्या राजाप्रमाणेच भोगीत असतो.

माझ्या आयुष्याचा सातमजली वाडा मीं बांधून ठेवला आहे आणि एखाद्या प्रवाशाप्रमाणे त्यांतील सौंदर्यस्थळें आणि रुक्ष स्थळें यांचें मी त्रयस्थपणें समालोचन करणार आहे. प्रवासी ज्याप्रमाणे पाहिलेल्या स्थळासंबंधी प्रवासग्रंथ लिहितो, त्याचप्रमाणे मीहि हा माझ्या आयुष्याचा प्रवासग्रंथ लिहिणार आहे. अर्थात् काश्मिरांत हिंडलेल्याचा प्रवासग्रंथ इतरांनाहि मनोहर वाटतो. क्षुद्र खेडयांत हिंडणाऱ्याचा प्रवासग्रंथ क्षुद्रचा असायचा ! पण तें असो. मी वर सांगितलें ना एकदा, की प्रत्येकाला आपलें आयुष्य श्रेष्ठच वाटतें म्हणून ?

माझे वडील—

माझ्या वडिलांना जर खोटें बोलतां येत असतें आणि तोंडपुजे-पणा करतां येत असता, तर शाळाखात्यांत त्यांना पांचशे रुपयांपर्यंत बढती मिळून टांगाघोडा उडवतां आला असता. त्यांच्या हाताखालचे लोक पुढे दोनशेअडीचशें रुपये पेन्शन घेऊन आरामांत राहात असतां यांना मात्र वयाच्या साठ वर्षांपर्यंत पाऊणशें रुपये पेन्शन घेऊन संसार-खर्च भागवण्यासाठी पुन्हा खाजगी नोकऱ्या आणि शिकवण्यांचे काबाडकष्ट करावे लागले.

माझ्या वडिलांचें आयुष्य आणि माझेंहि आतापर्यंतचें आयुष्य यांचा विचार करूं लागलें की मला वाटतें, खरें बोलणें हेंहि एक प्रकारें भेकडपणाचेंच लक्षण आहे. माझ्यावर असे कित्येक प्रसंग आले, की त्या वेळीं मी थोडें खोटें बोललें असतें तर दुसऱ्या कुणाचें नुकसान न होतां माझा मात्र फायदा झाला असता. परंतु खोटें बोलण्याची भीति वाटून खोटें बोलणें भेकडपणाचें आहे, तो भेकडपणा पदरीं येतां कामा नये म्हणूनच मी खरें सांगून माझें नुकसान करून घेतलें आहे.

माझ्या वडिलांना व्यवहारज्ञान नसल्यामुळे स्वार्थसाधु लोकांनी त्यांचें वेळोवेळीं नुकसान केलें आणि माझें घोडें जाऊंद्या पुढे असें वागून वडिलांना मागे सारलें.

अर्थात् हें सर्व व्यवहारी जगाच्या दृष्टीने. पण वडिलांचें नांव निघतांच लोक किती आदराने बोलतात ! " विश्वनाथपंत केळकर ना ? आमचे मास्तर होते ते. अतिशय सज्जन गृहस्थ. "

मोठमोठे लोक त्यांच्या अशा आठवणी काढतात त्यांवरून वाटतें, की खरें बोलण्याचें आणि साधेपणाचें पुण्य मृत्यूनंतर भोगावयास मिळतें असें म्हणतात त्याचा अर्थ हाच काय ? असो.

नोकरीच्या बाबतींत अन्याय होऊन वडिलांना मिळणारी मानाची जागा जेव्हा कनिष्ठाला देण्यांत आली, तेव्हा पुरतीं नोकरीचीं वर्षं भर-ण्यापूर्वीच संतापाच्या भरात बाबांनी पेन्शन घेतलें. या गोष्टीचा परि-णाम त्यांच्या मनावर अतिशय झाला. १८९५ सालीं फर्लो घेऊन ते पुण्याला नारायण पेठेंतील आपल्या घरीं येऊन राहूं लागले.

या बिकट वेळीं आईनेच त्यांना धैर्य दिलें. याच एका प्रसंगांतून काय, पण संसारांतील सर्वच कठीण प्रसंगांतून आईने बाबांना सुरक्षित परतीराला नेलें.

बाबांनी नुकतीच फर्लो लीव्ह घेतली असून आता भाऊला आणि मला पुण्यांतील शाळेंत घालावयाचें होतें.

मी शाळेंत जाऊं लागलें तो पहिला दिवस मला किती चांगल्या रीतीने आठवतो आहे. १८९५ सालच्या मे महिन्याची पहिली तारीख होती. पुण्यांत मुलींच्या दुय्यम शिक्षणासाठी शाळा निघून अवघीं दहा वर्षें झालीं होती. प्रथम शाळा भिडे वाड्यांत स्थापन झाली तेव्हा फक्त पंचेचाळीस मुली शाळेंत दाखल झाल्या होत्या. या शाळेवर टिळकांनी केसरींत चढवलेला हल्ला आणि आगरकरांनी त्याना 'सुधारकां'तून दिलेली दणदणीत उत्तरें व मुलांमुलींच्या सहशिक्षणाची केलेली घोषणा अजूनहि जनतेच्या स्मरणांत ताजी होती. बहुतेक जनता स्त्री-शिक्षणाला विरोधी असून न्या. रानडे, प्रो. भांडारकर, रा. ब. पंडित यांच्यासारखी सुधारक मंडळी फक्त हाताच्या बोटांवर मोजतां येतील इतकीच होती. याच मूठभर मंडळीनी अत्यंत कष्ट सोसून आणि अनेक अडचणींना धैर्याने तोंड देऊन शाळा जगवून ठेवली. इतकेंच नव्हे, तर तिला प्रगतीचा मार्ग दाखवून दिला. शाळेने हुजूरपागेंत आपल्या मालकीची सुंदर इमारत बांधली असून त्या इमारतीत आता शाळा भरणार होती.

मी त्या वेळीं पांच वर्षांची असून शाळा हुजूरपागेंत आली त्याच दिवशीं मला शाळेंत घालण्यांत आलें

कोरी दगडी पाटी, वर्ख लावलेल्या दगडी पेन्सिली आणि बिगर इयत्तेचें पुस्तक यांची मेणकापडाच्या पाकिटांत मांडामांड करण्यांत मी सकाळीं नऊ वाजल्यापासून गुतलें होतें. कोण ती माझी धांदल !

शाळेंत जायचें म्हणून मला जितकी उत्कंठा लागून राहिली होती तितकीच मी मनांतून घाबरलें होतें. केव्हा केव्हा तर मनांतून

वाटत होतें, की आईला स्वच्छ सांगून टाकावें, मला शाळेंत जायचें नाही म्हणून !

आई या वेळीं सुमारें अडतीस वर्षांची होती. आईच्या मुद्रेवर करारीपणा आणि डोळ्यांत तेजस्विता झळके. तिचा पोषाख साधाच म्हणजे इरकली लुगडें आणि धारवाडी खणाची चोळी असा असे. केस साधे विंचरून बुचडा बांधलेला, कपाळाचें गोंदवण, हळद, आडवें कुंकू आणि दागिने मोजकेच पण सगळे ठळक असत तिची टापटीप फार असे. तिच्या पोषाखात व वागण्याबोलण्यांत घरंदाजपणा दिसून येई.

आईच्या वागण्यांत भावनाविवशता कधींच नसे. मला किंवा माझ्यापेक्षा चार वर्षांनी वडील असलेल्या भावाला तिने कधी मोठेंसें कुरवाळलेलें किंवा मुकेबिके घेतलेले मला आठवत नाही. आईने रागावून डोळे वटारले की माझी गाळण उडायची. नुसते डोळे वटारूं का म्हटलें तरी काम भागत असे.

म्हणजे आई तशी कांही रागीट स्वभावाची नव्हती किंवा तिचें बोलणेंहि कठोर नव्हतें; पण आम्हां मुलांना आणि काकांना तिचा मोठा वचक असे. यामुळे आपल्याआपल्याशींच मी मुसमुसत होतें.

दहालाच आम्ही सर्व मंडळी जेवायला बसलों. मला धड जेवण-सुद्धा जाईना. भाऊ आणि काका मला सारखें शाळेंत जायचें म्हणून चिडवीत होते. जेवल्यावर आईने माझा थाटमाट केला. वीतवीत जरीच्या काठाचा केशरी रंगाचा परकर, साटणीचा जांभळा पोलका, कानांत मोत्यांचे ईअरिंग्ज, पायांत चाळ आणि तोरड्या, केस उलटे फिरवून पाठीवर वेणी सोडलेली असा माझा सर्व पोषाख होता.

पोषाख घातला मात्र आणि माझा खालचा ओठ पुढे येऊन थरथरूं लागला. डोळ्यांत आसवांनी गर्दी करून सोडली.

रडव्या स्वरांत मीं आईला म्हणालें, " आई, मला नाही जायचं शाळेंत. "

मला वाटलें आई रागावणार ! पण तसें झालें नाही.

आईने माझ्या पाठीवरून हात फिरवून म्हटलें,

" वा ! असं कसं चालेल ? भाऊला एकट्यालाच का शिकू दे ? तुला इकडल्यासारखं विद्वान नाही का व्हायचं ? "

मीं मनगटाने डोळे पुसले. पण सुरांत रडवेपणा कायम होता. तशीच मी बोललें, " हो. मला बाबांच्यासारखं विद्वान व्हायचंय. पण आई, भाऊच्या शाळेंत मास्तर छड्या मारतात, घोडीची शिक्षा देतात, तसं करतील का ग मला ? "

" अग छे:! मुलीच्या शाळेंत नाही हो तसं मारीत उलट भावल्या मिळतात. केवढाले तरी बक्षीससमारंभ होतात. त्या मिस हर्फर्ड तर किती मायाळू आहेत! तुम्हां मुलांमुलीच्याबरोबर त्या खेळायला सुद्धा येतात हो. "

" खरंच का ग आई ? किती पण मज्जा ! पण आई, मला सोनी चिडवीत होती काल, की ' तू त्या शाळेंत गेलीस की तुला बाटवणार अन् मग आम्ही तुला घरांत देखील येऊं देणार नाही आणि तुला शिवणारदेखील नाही. ' खरंच का ग आई मला तिथं बाटवतील ? "

" सुमति, तूं कुणाचं कांही ऐकू नको बरं. सोनीला शाळेंत जायला मिळत नाही म्हणून मत्सरानं ती तसं बोलली, दुसरं काय ? पण शाळेंत खिरिस्ताव, मुसलमानांच्या मुली येतात त्यांच्याकडलं कांही खाऊंपिऊं नको, समजलीस ? "

अशा प्रकारें सर्व तऱ्हेने शंकानिरसन करून घेतल्यावर आमची स्वारी शाळेंत जाण्यास कबूल झाली.

नंतर आईसह मी मागल्या माडीत गेलें. आईने मघाशीच करून दिलेला विडा खात बाबा तक्क्याला टेकून पडले होते. बाबा उंच, काटकुळे आणि काळेसावळे तर आई ठेंगू, स्थूल आणि उजळ वर्णाची होती.

आईचा आम्हांला वचक वाटे, पण बाबांना आम्ही मुळीच भीत नव्हतों.

मला पाहाताच बाबा टाळ्या वाजवून म्हणाले, " ओ-हो-हो ! केवढा हा थाट केला आहेस तूं ! अन् पायांत तोरड्या घातल्या आहेस. आम्हांला चालून दाखव ! "

त्याबरोबर मीं मोठ्या अभिमानाने छुम्छुम् तोरड्या वाजवीत चालून दाखविलें.

मृदु स्वराने, सावकाश व स्पष्ट शब्दोच्चार करून बाबा बोलत. ते पुन्हा मला म्हणाले, " मी तुला कडेवर घेऊं का ? "

" नको. मी आता मोठी झालें."

" खरं ग खरं. " बाबा हसून म्हणाले, " तूं परकर नेसून आता मोठी बाई झाली आहेस, नव्हे का ? बरं, आम्ही नाही घेत तुला कडेवर. आम्ही आता कपडे करतों मग आपण तुझ्या शाळेंत जाऊं. "

मी सतरंजीवर बसून काहीतरी चाळा करूं लागलें आणि आईच्या मदतीने बाबा पोषाख करूं लागले त्या वेळी स्वदेशी चळवळीला सार्वजनिक स्वरूप आलें नव्हतं, परंतु पुण्यांत कांही लोक या विषयावर विचार करूं लागले होते. बाबाहि शक्यतोंवर देशी कापड वापरीत.

बाबांनी देशी जाड धोतराचा काचा मारून त्यावरूनच काळ्या कापडाची विजार घातली. सदऱ्यावर कडक कॉलर घालून काळा कोट घातला. इतक्या प्रकारच्या कोटांच्या फॅशन्स झाल्या, पण बाबांच्या कोटाची एक फॅशन ठरलेली होती. त्यांचे कोट नेहमी वर निमुळते आणि खाली मोठ्या घेराचे असत. दीड वीत शेंडीची डाव्या हाताने झर्रदिशी गाठ मारून त्यांनी तांबडी पगडी घातली आणि रेशीमकाठी उपरणें अंगावर घेतलें. त्यांनी पायांतहि सबंध पिवळे बूट घातले होते.

बाबा अठ्ठेचाळीस वर्षांचे असून रुंद कपाळ आणि तेजस्वी डोळे यांमुळे मोठे बुद्धिमान् दिसत. पण त्याच तेजस्वी डोळ्यांत मनाची सोज्वलता आणि प्रेमळपणाहि प्रतिबिंबित झालेला असे. त्यांचं वागणें कमालीचें साधें होतं. विद्वत्तेचं तेज त्यांच्या मुखावर स्पष्ट दिसे.

बाबा किडकिडीत असले तरी त्यांचं शरीर तालमीने कमावलेलें होतं. त्यांचा एकहि केस अजून पिकला नव्हता. पन्नाशीच्या पुढे त्यांचा पहिला दात पडला तेव्हा त्यांना केवढं वाईट वाटलें ! त्यांची प्रकृति फार सशक्त होती. डेक्कन कॉलेजांत असतां ते आळंदीपर्यंत पळत जात आणि पळत येत

बाबांचा पोषाख आटोपल्यावर मी बाबाच्याबरोबर शाळेंत गेलें.

हुजूरपागेंत त्या दिवशीं कोण आनंदीआनंद झाला होता! नवीन इमारतीत प्रथमच वर्ग सुरू होणार असल्यामुळे इमारत पताकांनी शृंगारली होती. मोठेमोठे लोक शाळेंत जमले होते हॉलमध्ये सभा भरली कांही भाषणेंहि झाली बाबा पुढे खुर्चीवर बसले होते आणि मी मुलींत बसलें होतें. मी भिऊनच गेलें एकदाचा समारंभ संपला खाऊ वाटल्यावर शाळा मुळी बंदच झाली.

मग शाळा बंद झाल्यावर बाबा मला घेऊन मिस हर्फर्डकडे गेले.

मी मुंबईला पुष्कळ विलायती बायका पाहिलेल्या होत्या. त्यांचे ते रंगीबेरंगी घेरदार झगे, फुग्याफुग्यांची केशरचना, त्यावर शिपतरांसारख्या टोप्या, तोंडावर जाळी आणि पायात बूट अशा पोषाखात मोठया रुमींत चालणाऱ्या बायका म्हणजे विलायती बायका असें मी समजत असे.

पण मिस हर्फर्डचा पोषाख किती साधा होता! तो साध्या कापडाचा गळ्यापर्यंत झगा, मध्ये भांग पाडून सरळ केस विंचरून लहानपणच्यासारख्या दोन बांधलेल्या वेण्या आणि तोंडावर किती सोज्वळपणा आणि प्रेमळपणा दिसे!

मिस हर्फर्डनी माझ्याकडे बघून कौतुकपूर्ण स्मित केलें आणि मला जवळ ओढून त्या आपल्या चमत्कारिक पोकळ उच्चारांच्या मराठींत म्हणाल्या,

"आमच्या शाळेंत येण्याची तुझी इच्छा आहे काय?"

मीं मान डाव्या बाजूला कलती करून खाली पाहात पाहात होकार दिला.

मिस हर्फर्ड उगीचच हसल्या. नंतर बाबांशी थोडा वेळ इंग्रजींत बोलून प्रवेशपत्रिका दिल्यावर आम्ही जाण्याकरिता उठलों; तेव्हा त्या माझ्या हनुवटीला हात लावून गोड स्वरांत म्हणाल्या,

"आता दररोज यायला पाहिजे बरं. शाळा चुकवूं नको!"

नंतर त्या बाबाच्याजवळ माझ्यासंबंधी कांहीतरी कौतुकाने बोलल्या असाव्या. कारण बाबा अभिमानाने हसले तें मी पाहिलें.

मी नाही शाळा चुकवणार म्हणून हळूच सांगितल्यावर आम्ही ऑफिसांतून बाहेर पडलो.

एका विलायती मडमेशी बोलायला मिळाल्याबद्दल मला केवढी धन्यता वाटत होती! केव्हा एकदा माझ्या नवीन शाळेची हकीकत मी भाऊला आणि काकांना सागतें असें मला झालें होतें. खाऊचा पुडा तर घरी जाईपर्यंत उरापोटाशी बाळगून नेला मी.

काका माझ्यापेक्षा चागले पंधरासतरा वर्षांनी वडील असून मॅट्रिकनंतर वकिलीची परीक्षा देऊन ते वकिली करूं लागले होते. ते आमच्या घरीच राहात त्यांचं लग्न होऊन बायको वारली होती. आता त्यांच्या दुसऱ्या लग्नासाठी खटपट चालू होती

काकाचें माझ्यावर अतिशय प्रेम. शाळेंतून येतांच मी त्यांना जाऊन बिलगलें आणि सगळ्या हकीकती मोठ्या अभिमानाने त्यांना सांगितल्या.

नंतर मी मागल्या माडीत गेलें. तेथे बाहेरचे कपडे उतरून बाबा तक्क्याला टेकून पडले होते. आई त्यांना अर्ध्या पानाचा विडा करून देत होती.

मी येतांच आई म्हणाली, " आता कशी कळी खुलली आहे? शाळेंत जायचं नाही म्हणाली होतीस नव्हे का?"

" आई, कित्ती ग छान आहेत मिस् हर्फर्ड!"

आई आणि बाबा हसूं लागलीं.

बाबा म्हणाले, " आता मोठी विदुषी झालं पाहिजे हो तुला."

मी सहजगत्या बोललें, " हात्तेच्या! त्यांत काय मोठंसं? होईन की मी विदुषी."

विदुषी या शब्दाचा अर्थ तरी मला कधी कळला होता त्या वेळीं!

दुसऱ्या दिवसापासून घरच्या मोलकरणीबरोबर मी शाळेंत जाऊं लागलें. मुलींना नेण्याआणण्याकरिता शाळेच्या कांही धमन्या होत्या

आणि शिवाय मोलकरणीहि होत्या. माझ्याएवढया लहान मुलींना शाळेंत जातांना त्रास फारसा होत नसे; परंतु नऊदहा वर्षांपुढे मुलगी उपवर झाली की तिला अतिशय त्रास होई. कागदाचे बोळे, खडे वगैरे अंगावर टाकणें, फाजीलपणाने बोलून डोळे मिचकावणें हे प्रकार नेहमी चालत शिकणाऱ्या मुली रडकुडीला येत. तरीहि शाळेंतील मुलींची संख्या वाढत वाढत दोनशेपर्यंत आली होती.

माझ्या वर्गातल्या मुलींनीच मला पहिल्याने थोडा त्रास दिला. माझी आई मुंबईला राहिलेली असल्याकारणानें त्या काळच्या पुण्याच्या सुधारकांच्या मानाने तिचे आचारविचार जास्तीच सुधारलेले होते माझ्याबरोबरच्या मुली खणाच्या परकरचोळ्या नेमून मध्ये भाग काढून खोपा घालीत किंवा परवंटाची साडी-काचोळी घालीत. कपाळाला ठळक कुंकू आणि हातांत बांगडया, नाकांत सुंकलें व कानांत सातफुल्या, बाळ्या वगैरे असायच्याच.

माझ्या पोषाखांत पुष्कळच वेगळेपणा होता

मधल्या सुटीत माझ्या शेजारच्या मुलीने मला विचारलें,

" तूं परभीण का ग ? "

" नाही काई, मी चांगली कोंकणस्थ ब्राम्हणाची मुलगी आहे. " मीं मोठया अभिमानाने उत्तर दिलें.

ती मुलगी पुन्हा बोलली, " काय ? ब्राम्हणाची तूं ? अन् हे उरफाटे केस, कपाळीं कुंकू नाही, गोंदलेलं नाही, हातांत बांगडी नाही, हे लुडेबुच्चे कान. अहा रे ! कुठल्या मुलुखाचे ब्राम्हण तुम्ही ? "

मी फुरंगटून बोललें, " वाटेल त्या मुलुखाचे ! तुला काय करायचीय् पंचाईत ? "

पण एवढयावर ती कुठली थांबायला ! शेवटी एकदा " ए हे रे परभीण ! पाटीवर शेपटा लडबडतो, म्हातारा नवरा बडबडतो ! " एवढं चिडवून मग ती गप्प बसली.

झालें, दुसऱ्या दिवशीं मी आईजवळ हट्ट घेऊन बसलें की, माझाहि इतर मुलींसारखा पोषाख कर म्हणून.

आईने मला परोपरीने समजावलें, की तें चांगलें दिसत नाही. पण मी ऐकत नाहीसें पाहून तिने सरळ भांगाचा खोपा घातला. मग मुद्दा‐ मच आरसा माझ्यापुढे धरून तिने विचारलें, " हं, बघ नीट. झालं ना समाधान ?"

आरशांत बघतांच मीं आरसा बाजूला केला. " ईस ! किती बाव‐ ळट दिसतें मी !"

आईने मग हसतहसत माझी पुन्हा वेणी घातली. " अग, अस एवढयातेवढया बोलण्याकडे कधी लक्ष देऊं नये हो. चार दिवसानं कोणी तुला चिडवणार नाही ! "

खरोखरीच तसं झालें. मला चिडवणारी मुलगीच माझी चांगली मैत्रीण झाली.



# प्रकरण २ रें

माझ्या वर्गातल्या मुली आजोळच्या गमतीदार हकीकती सांगू लागल्या किंवा आम्ही दिवाळींत सर्व आजोळी जाणार असें म्हणाल्या की मला वाईट वाटे. कारण मला आजोळच नव्हतें.

माझ्या जन्मापूर्वीच माझ्या तीन मावशा, मामा आणि आजी अशी सर्व मृत्युवश झालेली होती. एक मावशी कोकणात होती ती सटीसामासी दिसायची आणि आजोबा माझ्या जन्मानंतर वर्षानेच वारले.

आईचे दूरचे दोघे भाऊ होते. चांगलें पन्नास माणसांचें त्यांचें कुटुंब होतें. तेथे मी आईबरोबर नेहमी जाई. राहायला नव्हे, पण कार्यकारणाने तेथे जाण्यात आईला फार आनंद वाटे. कारण माहेर म्हणायला तिला तेवढंच घर राहिलें होतें. तेथे गेल्यावर आईच्या, वडिलांच्या आणि बहिणींच्या गोष्टी नेहमी निघत. त्या ऐकूनच मला पूर्वीच्या गोष्टी माहीत झाल्या.

आमचे आजोबा — म्हणजे आईचे वडील -- हे अतिशय विद्वान् गृहस्थ होते. ट्रेनिंग कॉलेजमध्ये त्यांना नोकरी असून ज्योतिषशास्त्रावर त्यांनी दोनतीन पुस्तकें लिहिली होती. एक तारा त्यांनी शोधून काढला होता; यामुळे त्यांचें नांव पाश्चात्य देशांतील ज्योतिर्विदांतहि चमकलें होतें म्हणे.

वैद्यकाचाहि त्यांना नाद होता. एकदा काय गंमत झाली, की घरांत कुणाला तरी खरूज झाली. नाना प्रकारचीं औषधें होऊन गुण येईना. एके दिवशीं अंगणांतल्या एका झाडाच्या पानांचा रस काढून तो रस खरजेवर लावावा असें आजोबांनी सांगितलें. आजोबा म्हणाले, " ही वनस्पति दिव्य आहे. कारण चंद्रप्रकाशांत ती विशेष चमकते. तिच्यांत कांहीतरी औषधि गुण असला पाहिजे. तेव्हा आपण ती खरजेला लावून पाहूं."

त्यांनी सांगितल्याप्रमाणे खरजेला त्या झाडाचा रस लावला अन् दुसऱ्या दिवशीं त्या मुलाचें अंग फदफदून आलें! घरांतल्या आजीसह

सर्व मंडळींनी भलतंच औषध सांगितल्याबद्दल आजोबांना दोष देण्यास सुरवात केली.

पण आजोबा दोष कबूल करीनात. ते म्हणू लागले, " माझं म्हणणं खरंच ठरलं. ती दिव्य वनस्पति आहे. तिच्या गुणामुळं ही सगळी घाण एकदम बाहेर पडली आहे. आता लवकरच मुलाला उतार पडेल."

पण मग पुन्हा त्या दिव्य वनस्पतीचा रस खरजेला लावण्यास घरांतून कोणींच संमति दिली नाही. दुसऱ्याच औषधांनी तो मुलगा बरा झाला.

आई लहान असतां तिची वडील बहीण नेहमी बाळंतपणाला माहेरीं येई. प्रत्येक वेळीं ती तीनचार महिने राही. तेवढया अवधींत आईला तिच्या लहान मुलांचा ळळा लागे. मग मावशी मुलांसह सासरीं जायला निघाली की आईला वाईट वाटे. मावशी समजूत करूं लागली की शेवटीं आई रागारागाने म्हणे, " बरं बरं, जा हो तूं आपली तुझीं मुलं घेऊन. ऐट नको तुझी उगीच. मला कांही मुलं होणार नाहीत की काय ?"

मग आजी आणि मावशी हसूं लागल्या की आई आणखीच चिडून रडू लागे.

दुसरी बहीण चांगल्या श्रीमंत ठिकाणीं पडली होती. मुलेंबाळें होऊन ती लवकरच वारली. ती वारली हें तिचें सुदैव. कारण तिच्या नवऱ्याला घरांतलें गुप्त धन शोधून काढण्याचें वेड लागलें होतें. किमयागार, भोंदु, साधू वगैरेंच्या नादीं लागून त्यांनी सर्व घरादाराचें व संपत्तीचें वाटोळें केलें.

आईची आणखी एक वडील बहीणहि सुखवस्तु घरांत दिली होती. या मावशीच्या यजमानांचा असा बाणा असे, की कधी मान वांकवायची नाही. दिंडीदरवाजांतून जातांना ते कधीहि पुढे वाकत नसत; तर पाठीमागे वाकून वर तोंड असतांना ते दिंडीदरवाजांत प्रवेश करीत.

आईची ही बहीण अतिशय बुद्धिमान् होती. स्वैपाकपाणी करण्यांत ती कुशल असून कामाला वाघीण. गळा गोड असून स्वतः सुंदर गाणीं तिने रचलीं होतीं. विणकाम आणि प्रत्येक तऱ्हेच्या कलाकुसरींत ती प्रवीण असे, आणि हौस फार.

आमची आई तिच्यासारखीच बुद्धिमान् आणि कलाकुशल. त्यामुळे या दोघी बहिणींत नेहमी चुरस चालायची. दोघींच्या वयांत दोन-तीन वर्षांचेंच अंतर होतें.

पण आईला बाबांचें साहचर्य आणि शिक्षण लाभल्यामुळे तिला पुढे यायला अवसर मिळाला तसा मावशीला मिळाला नाही.

एकदा कुठेसें पक्वान्नांचें प्रदर्शन होतें. आई आणि मावशी दोघी हलवा पाठविणार होत्या. त्या वेळीं शुभ्र साखऱ्या मिळणें फार कठीण असे. मावशीने खूप खटपट करून परगावाहून साखऱ्या मिळवून खसखशीचा हलवा मोठ्या मेहनतीने तयार केला.

आईने बालामृतवाल्या डोंगऱ्यांकडे साखरेचा खडा मागितला. त्यानी मोठ्या आनंदाने खडा दिला. ही साखर अतिशय शुद्ध असल्यामुळे आईने केलेला हलवा अति शुभ्र तर झालाच, पण काटाहि मोठा न्याहार आला. अर्थात् बक्षीस आईलाच मिळालें.

विणकामाचें असेंच होई. मावशी अगदी कठीण विणकाम महिनेच्या महिने लावून तयार करी. आई कांहीतरी नवीन कलाकुसरीचे डोळ्यांत भरण्याजोगे जिन्नस फार सायास न करतां बनवीत असे. त्यामुळे आईची वाखाणणी जास्त होई. दोन वेळां आईला बक्षिसेंहि मिळाली.

असें झालें की मावशी आईला म्हणे, " तू मोठी लबाड आहेस ! मी इतक्या मेहनतीनं इतके सुंदर कलाकुसरीचे पदार्थ करतें अन् तूं कांही त्रास न घेतां तुझी वाखाणणी होते. नुसती अक्कलहुषारी आहे तुला ! दुसरं कांही नाही. "

या दोघी बहिणींची मुलांवरूनहि चुरस चाले. हिचा एक मुलगा चांगला नांवलौकिकाला चढला आहे.

ही मावशी वारल्यावर तिच्या गाण्यांचा संग्रह छापून काढावा असं आईच्या मनांत होतें; पण गाणी लिहिलेली नसल्यामुळे आणि

आईला तीं सर्व कंठगत नसल्यामुळे तें जमलें नाही. त्यांपैकी दोन-तीन गाणीं आई म्हणत असे. बायकी पद्धतीचीं, पण फार गोड होती तीं गाणीं !

बाबांचे वडील जी. जी. एम्. सी. झाल्यानंतर त्यांना चांगली सरकारी नोकरी मिळाली होती. लवकरच हुबळीला दुय्यम सिव्हिल सर्जन म्हणून त्यांची नेमणूक झाली. त्या वेळी त्यांना साडेतीनशे रुपये पगार होता. पुढे ते पुष्कळच उच्च पदाला पोचले असते; परंतु ते या जागेवर येऊन थोडा अवधि लोटतो तोंच त्यांच्यावर मृत्यूने घाला घातला.

आमच्या आजीबाई सोवळ्या झाल्या. मुलांसह त्या पुण्याला राहूं लागल्या. एक लहानसें घर त्यांनी विकत घेतलें. शिवाय आजी-बाईच्या नांवावर आजोबांनी दहा हजारांच्या प्रॉमिसरी नोटा ठेवलेल्या होत्या.

या नोटांचें व्याज घेतवेळीं आजीबाईना आंगठा द्यावा लागे. तें न आवडून त्यांनी आपली सही घटवून ठेवली. पुढे मग त्या नेहमी सही करीत. आपल्याला सही करतां येते याचा त्यांना केवढा अभिमान होता !

या सोवळ्या असून लांब बाह्यांचीं पोलकी घालीत आणि पिवळ्या महेश्वरी लुगड्यांत कधीमधी काळा दोरा असे. या त्यांच्या वागण्याबद्दल तत्कालीन बायका त्यांना पाठीमागे नांवें ठेवीत.

या आजीबाई मी चार वर्षांची असतांनाच वारल्या. त्यांनी मृत्युसमयी काकांना संभाळण्याबद्दल आईला सांगितलें होतें. नाहीतरी काका नेहमी आईबाबांच्या जवळच असत. दुसरे चुलते दूर कुठेतरी नोकरी करीत. पण त्यांचा आणि बाबांचा फारसा जिव्हाळा नसल्याने गाठीभेटी क्वचित् पडत.

आमच्या आत्याबाई मात्र आईच्या फार मैत्रीण होत्या. नणंदा-भावजया यांचे प्रेमळ संबंध या दोघीशिवाय मी कुठे फारसे पाहिलेले नाहीत.

या आत्याबाई मराठी लिहीत, वाचत आणि काव्यरचनाहि करीत.

मी आत्याबाईंच्या मागून आमच्या घराण्यांत मुलगी अशी पन्नास वर्षांनी जन्मलें.

आमच्या आईला सात मुलगे झाले आणि मुलीकरिता नवस करण्याची वेळ आली होती. त्यामुळे माझें कौतुक लहानपणीं फार झालें.

आत्याबाईंचे यजमान बाबांचे फार मित्र होते. त्यांच्या मृत्यूमुळे बाबांच्या मनाला फार धक्का बसला होता. माझ्या जन्मापूर्वीच आत्याबाईंच्यावर वैधव्यावस्था आली होती.

पुढे कित्येक वर्षं आजीबाई मुलीचें तोंड पाहात नसत. याला कारण म्हणजे आत्याबाई सकेशा राहिल्या हेंच होतें. सोवळें होण्याबद्दल आई मुलीला परोपरीनें समजावून सांगत असतांना मुलगी ऐकेना. तेव्हा "तू सोवळी होईपर्यंत मी तुझं तोंड पाहाणार नाही!" असा त्यांनी त्रागा केला. परंतु आत्याबाईंनी आपला हट्ट सोडला नाही. मग शेवटीं शेवटीं कित्येक वर्षांनी आजीबाईंनी नमतें घेतलें. मायलेकींच्या भेटींत वीसपंचवीस वर्षांचें तरी अंतर पडलें होतें.

मी या आत्याबाईंच्यासारखीच स्वरूपाने झालें असें लोक म्हणत. त्यांचें माझ्यावर फार प्रेम असे. माझ्या प्रत्येक गोष्टीचें त्या कौतुक करीत.

माझ्या दोन्ही आजोळांच्या हकीकती हळूहळू वडील मंडळींच्या संभाषणप्रसंगावरून मला कळत गेल्या. वास्तविक माझ्या आयुष्याशीं तसा कुणाचाच संबंध आलेला नाही.

• • •

# प्रकरण ३ रें

शाळेंत जायला लागून मला चांगले सहा महिने झाले होते. दिवाळीची सुटी संपून नुकतीच शाळा पुन्हा सुरू झाल्यामुळे माझ्या मैत्रिणी आजोळच्या गमती सांगण्यात अजूनहि रमत. आजोळी नाही तरी घरी माझीहि दिवाळीची सुटी भाऊ व वाड्यातली पांचसहा मुलें यांच्यामध्ये अतिशय आनंदांत गेल्यामुळे मलासुद्धा सांगतां येण्याजोग्या मौजा पुष्कळच होत्या.

शाळेंत जाण्याची मला फार गोडी लागली होती. मिस हर्फर्ड यांना सर्वजणी ' मदर ' म्हणत आणि त्या मुलींच्यावर माया करीत तीहि मातेप्रमाणेच इतर मास्तरमास्तरणीहि मोठ्या सुस्वभावी होत्या. नेहमी खाऊ वगैरे मिळे

मुख्य मौज म्हणजे पुष्कळ बरोबरीच्या मैत्रिणीशी गप्पागोष्टी करायला मिळत आणि तऱ्हेतऱ्हेचे देशी-विदेशी खेळ खेळायला आणि गाणीं शिकायला मिळत.

आम्ही बरोबरीच्या मुली एकमेकींच्या नेहमी खोड्या काढीत असूं. आमच्या वर्गात एक पार्शी मुलगी होती. तिच्या डोक्यावर एक ल्हानशी टोपी असायची. आमच्यांपैकी कुणीतरी हळूच ती टोपी काढून घेतली की ती मुलगी दोन्ही हातांनी आपलें डोकें झाकून घेई. कारण डोकें कधीहि उघडें ठेवावयाचें नाही असा त्यांच्या जातींत निर्बंध असे. त्या मुलीनें बऱ्याच विनवण्या केल्या म्हणजे मग आम्ही तिची टोपी तिला परत द्यायच्या !

एखाद्या ख्रिश्चन मुलीने आवळा, चिंच असें कांही खायला दिलें की आम्ही हिंदु मुली तें नीट तपासून, परकराने पुसून घेऊन मग खात असूं. न जाणो, पाठीमागून त्या मुलीने जर हाकाटी केली की " मीं आव ळ्याला दात लावला होता, तूं आता बाटलीस ! " म्हणजे मग काय करणार ?

पंचहौद मिशनमधील चहाप्रकरण, प्रामण्य वगैरे गोष्टी अजूनहि वडील मंडळींच्या तोंडीं असून त्या आम्हां मुलींच्या कानांवर पडत असत.

एकदा आम्हां मुलीत चिडाचिडी झाली. एक मुसलमान मुलगी एकदा बोलली, " तुम्ही हिंदु दगडाची पूजा करतां " त्याबरोबर एका हिंदु मुलीने तिला उत्तर दिलें, की " तुम्ही थडग्यांतल्या प्रेतांची पूजा करतां. "

झालें! प्रकरण ' मदर 'च्या कानापर्यंत गेलें. त्यांनी गोड शब्दांत सर्व मुलींची समजूत घातली.

त्यानंतर पुन्हा असला प्रकार कधींच घडला नाही.

एकंदरीत, शाळा म्हणजे आम्हां मुलींना एक मौजेचीच बाब झाली होती. शाळेबाहेर मात्र थोडा वेगळा अनुभव येई.

एकदा मी आणि माझी एक मैत्रीण बनी अशा दोघी शाळेंतल्या मोलकरणीबरोबर शाळा सुटल्यानंतर घरीं चाललों होतों. नगरकरांच्या वाड्यावरून वळतो तोंच दहाअकरा वर्षांच्या सुमाराचे दोन मुलगे हातांत पाटीदप्तर घेऊन मागून आले. त्यांतील एकजण मोटयानेच बोलला,

" अरे, या हुजूरपागेंतल्या घोडया चालल्या आहेत बघ ! "

अन् लगेच माझा शेपटा धरून त्याने " ड्यां, ड्यां " केलें.

मी घाबरून गेलें आणि साळूबाईला बिलगण्याचा प्रयत्न केला पण त्यामुळे वेणीला ओढ लागून मी ओरडलें साळूबाईनी लगेच त्या मुलाचा दंड पकडला. पण तो मुलगा निसटून पळून जाऊं लागला. त्याच्याबरोबरचा मुलगा त्याच्या पाठोपाठ धावत सुटला. थोडक्याच क्षणांत त्या मुलाला पकडून या दुसऱ्या मुलाने आमच्यासमोर आणलें. तो दरडावून त्या खोडकर मुलाला म्हणाला, " काढशील पुन्हा लहान मुलींची खोडी ? "

तो मुलगा पुन्हा पळून जायला पाहात होता, पण साळूबाईनी त्याला नीट धरून त्याच्या पाठीत एक धपका मारला.

शेवटी पुन्हा खोडी काढणार नाही असें त्याने कबूल केल्यावर मोलकरणीने त्याला सोडलें. दुसऱ्या मुलाला तिने लगेच शाबासकीहि दिली. पण तो लाजून निघून गेला.

तो मुलगा होता काळासावळाच; पण फारच मोहक दिसत होता. मला तसबिरींतल्या कृष्णाचीच आठवण झाली.

त्या मुलाच्या त्या दिवशीच्या वागण्यामुळे तर तो मला फार फार आवडला. तो खेळायला आपल्याकडे आला तर मोठी मौज होईल असें मला वाटलें. चारआठ दिवसांनी मी त्याला विसरूनहि गेलें. क्वचित् त्याला कुठे पाहिल्याचा भास होई, इतकेंच.

त्या दिवशी घरी आल्यावर प्रथम नित्यनियमाप्रमाणे शाळेच्या विटाळाचा परकरपोलका बाहेरल्या ओटीवरल्या खुटीवर सोडून ठेवला आणि घरातला पोषाख म्हणजे चड्डी आणि सदरा घातला. मग सपाटून भूक लागली असल्यामुळे मी खायला बसलें.

दशमी खात असतां मीं आईला सगळी घडलेली हकीकत सांगितली. त्या चांगल्या मुलाची मी खूप वाखाणणी केली.

माझी हकीकत ऐकून आईला काळजी वाटली असावी. मी बोलत होतं तेव्हा तिने फक्त मुद्द्यापुरते प्रश्न विचारले. नंतर तिने मला सांगितलें,

" कांही मुलं फार वात्रट असतात ती असं वागतात. आता यापुढं साळूबाई किंवा आपली सरू कोणी बरोबर असली तरी तिचं बोट धरून अगदी जवळून चालत जा. "

तितक्यांत माझ्या चुलत आत्याबाई घरात आल्या. या आमच्या वाड्यांतच असत.

त्यांना आईने सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून कुसाआत्याबाई म्हणाल्या, " घरची मंडळी बोलतात तें ऐकून ही पोरटीं असा द्वाडपणा करतात. आता या बाबीएवढ्या लहानलहान मुली चार अक्षरं शिकल्या तर काय बिघडलं त्यांत ? वहिनी, तुमचं एक सोडून द्या. तुम्ही पुष्कळ शिकलांत; पण इतकं बरीक मनांत येतं, की जर वाचतां आलं असतं तर मीं पांडवप्रताप, हरिविजय वाचून जिवाची करमणूक तरी करून घेतली असती."

कुसाआत्याबाईंनी एवढें बोलून एक उसासा टाकला. नंतर माझ्याकडे बघून त्या बोलल्या, " बाबूताई, तूं अगदी भिऊं नको बरं. लग्नाच्या आधी काय काय तें शिकून घे. आता पदरांत पडेल तें खरं. मग जसा नवरा मिळेल त्यावर सगळं अवलंबून."

आई म्हणाली, " आम्ही कांही तसं अवलंबून ठेवणार नाही. आम्ही तिला पुष्कळ शिकवू आणि मगच लग्न करूं. "

" ती आनंदीबाई डॉक्टरीण आणि ती पुराण सांगणारी पंडिताबाई, तश्शी आमची बाबूताई होणार तर ! "

मी मोठ्या अभिमानपूर्वक होकार दिला. तेव्हा आई आणि आत्याबाई दोघी हसल्या.

मग आत्याबाई मला म्हणाल्या, " नव्या विष्णूच्या देवळांत मी कथेला जातेंय्. तूं येतेस का ? आलीस तर बायकांना कुंकू लावशील?"

मीं मोठ्या आनंदाने होकार दिला. आई शनिवारी सभेला जातांना मला बरोबर नेई तेव्हा मला कंटाळा येई. पण कथेला मी हौसेने जाई. आईने लगेच माझी तयारी करून दिली आणि मी कुसाआत्याबाईच्याबरोबर देवळांत गेलें.

देवळापुढे मोटी जागा असून त्यांत नारळीचीं कांही झाडें होतीं. त्या मोकळ्या जागेंत बरोबरच्या मुलींबरोबर खेळण्याकरिता वास्तविक मी देवळांत जात असें. तेथे नारळीचें एक झाड आडवें वाढलें होतं. त्या झाडावर चढण्यांत माझा पहिला नंबर असायचा. याचकरिता कथेला येण्यांत मौज असे. सभेला गेल्यावर गुपचूप बसून राहावें लागे. कुणी बोलूं लागलें की मला झोप येऊं लागे.

कथेला येऊन खेळत असतां देवळांत विठ्ठल विठ्ठलाचा नामगजर सुरू झाला की आम्ही मुली आंत पळायच्या. कारण सर्व बायकांना कुंकू लावण्याची हीच वेळ असे आणि खिरापतहि याच वेळीं मिळे. कथेंतली चुरचुरीत गोष्टहि मग ऐकायला मिळे

नामगजर ऐकून मी आंत गेल्यावर कुसाआत्याबाईनी माझ्या हातीं कुयरी देऊन मला बजावलें, " नीट बघून कुंकू लाव हो. आमच्यासारख्या बायकांना कुंकू नाही लावायचं. "

मग मी सवाष्णींना कुंकू लावीत देऊळभर हिंडू लागलें. गर्दीतून वाट मिळाली नाही की पुढे वाकून कुंकू लावावें लागे. एक बाई – बाई त्या काळच्या मानाने, बाकी तिचें वय सतराअठरापेक्षा जास्त

नव्हतें– पाठमोरी बसली होती. मी हात लांबवून तिच्या कपाळाला कुकू लावलें तों तिने तें पुसून टाकलें ! मला वाटलें, ही अशी काय करते ! म्हणून मी पुन्हा तिच्या कपाळाला कुकू लावलें. तिने पुन्हा कुकू पुसून माझ्याकडे जरा दटावून पाहिलें

आसपासच्या बायका फिसफिस हसल्या

एक म्हणाली, " त्यात या पोरीचा काय अपराध ? तं डोक्या-वरलं छप्पर तिनं पाह्यलं म्हणून तिला वाटलं लावावं कुकू ! "

आणखीहि बायका काहीकाही बोलल्या पण त्यातला खरा अर्थ मला कांहीच कळला नाही मी कुकू लावलें. ती बाई मात्र गुड-घ्यात मान घालून रडत होती तें पाहून माझी चूक झाली हें मला कळलें. ओशाळी होऊन मी कुसाआत्याबाईच्याकडे गेलें. त्यांना झालेला प्रकार सांगतांच त्या शेजारच्या बायकासह हसूं लागल्या. मग त्या म्हणाल्या, " आता पुढल्या वेळेपासून आधी कपाळाला कुकू आहे की नाही तं पाहात जा. कुकू असलं तर आपण लावायचं. "

माझ्या मनावर या सर्व गोष्टीचा परिणाम फार झाला. मी पुढे कुसाआत्याबाईच्याबरोबर जाण्याचें टाळू लागलें. गेलें आणि कुकू लाव-ण्याची वेळ आली म्हणजे मला नकोसें वाटे. मी तीन तीन वेळां प्रत्येक बाईच्या कपाळाकडे पाही अन् मग कुकू लावी.

ती बाई मात्र पुन्हा दिसली नाही म्हणजे मला बरें वाटे. तिला मीं एक वर्षानें पुन्हा पाहिलें. तेव्हा ती विरूप झालेली होती. मला पाहातांच तिचें तोंड गोरेंमोरें होऊन ती बाजूला मान वळवून खाली बघू लागली. माझ्या अगदी मनांत आलें, की तिच्याजवळ जाऊन तिला विनवावें, की माझ्यावर तुम्ही रागावू नका. पण मला धीर झाला नाही. माझा अपराध काय झाला याची पूर्ण जाणीव न होतांच माझें मन मला टोचीत होतें. रडावेंसें मला वाटत होतें, पण मीं ओठ आवळून रडू आवरलें.

● ● ●

# प्रकरण ४ थें

मी बिगारीतून पहिलींत गेलें तेव्हा शाळेचा वार्षिक बक्षीस-समारंभ खूपच थाटाचा झाला लेडी हॅरिस या अध्यक्ष होत्या.

रेचलबाई प्राथमिक शाळेंतील मुलींना नेहमी गाणीं शिकवीत. त्याचप्रमाणे तऱ्हेतऱ्हेचे खेळहि शिकवीत. आताच्या बक्षिस-समारंभासाठी त्यांनी मेपोल, पाकोळ्यांचें संभाषण, ड्रिल असे प्रकार मुली निवडून त्यांच्याकडून तयार करवून घेतले होते.

पाकोळ्यांच्या संभाषणांत मलाहि काम दिलेलें होतें. त्या-बाबतींत थोडीशी गंमतच झाली.

आमच्या वर्गातली एक मुलगी पुण्यांतील एका वजनदार गृहस्थांची होती. या रेवतीला माझें काम हवें होतें. लगेच रेवतीचे आईवडील 'मदर'ला भेटले आणि त्यांनी सुमतीचें काम आमच्या मुलीला द्या म्हणून त्यांना गळ घातली.

रेचलबाईंना ही गोष्ट आवडली नाही. त्यांनी दोनतीन शिक्षकांना बोलावून त्यांच्यासमक्ष आमचें संभाषण करून दाखवलें. पण प्रथम माझ्याऐवजीं रेवतीला घेतलें रेवतीच्या आईवडिलांनी घरींच तिला तो पार्ट शिकवून ठेवला होता. मी आपली रडत बसलें.

संभाषण आटोपतांच रेचलबाईंनी मला माझें काम करण्यास सांगितलें. त्याबरोबर मी डोळे पुसून आनंदाने हसूं लागलें. तें पाहून सर्वच शिक्षकांनाहि हसूं आलें.

मीं काम केलें. आमचें काम आटपतांच सर्व शिक्षकांनी अभिप्राय दिला, की " सर्वच मुलींपेक्षा सुमतीचें काम चांगलें होत आहे आणि रेवतीला मुळीच कांही साधत नाही. तेव्हा सुमतीलाच काम करूं द्यावें."

मला कोण आनंद झाला! शेवटीं रेवतीच्या आईवडिलांनी तिला एक इंग्रजी भाषण शिकविलें आणि समारंभाच्या दिवशी तिने एकटी-नेच तें म्हटलें.

तें असेना का आईबाबा दोघें समारंभाला आलीं होतीं. माझा

तो रंगीत पाकोळीचा पोषाख आणि पंख यांसह मी जेव्हा हाताने पंख हालवीत हालवीत उडल्याप्रमाणे हावभाव करीत आलें, तेव्हा किती कौतुकाने हसून त्यांनी माझ्याकडे पाहिलें ! आमच्या संभाषणाला खूप टाळ्या पडल्या. आम्हांला एकेक बाहुली बक्षीस मिळाली. खाऊ सर्वांनाच वाटला.

मग नियमितपणें अभ्यासक्रम सुरू झाले आणि त्याच वेळीं प्लेगोबाला फावलें उंदीर नी माणसं पटापट मरत होतीं. इस्पितळें, क्वॉरंटाइन असे शब्द ऐकूं येत. शाळा बंद झालेली होती. घरीं येणारी मंडळी नाना प्रकारच्या भीतिप्रद गोष्टी बोलत त्या ऐकून मन भिऊन जाई. पुढल्या वर्षी तर कहरच उडाला.

आम्ही सर्व मंडळी वाल्हें या पुण्याजवळच असलेल्या खेडयांत राहावयास गेलों. माझें शाळेचें एक वर्ष या प्लेगमुळे बुडालें.

तेथे पुण्यामुबईचीं वर्तमानपत्रें आमच्या घरी येत. गावांतली प्रतिष्ठित अशी दहापंधरा मंडळी जमत व तत्कालीन राजकारणासंबंधी तीन-तीन तास चर्चा चाले. केसरी म्हणजे पोथीसारखा सगळ्यांना पूज्य वाटे.

वाल्हें म्हणजे फारच सुंदर हवापाण्याचें ठिकाण. केळ्यांचीं बनें आणि संत्र्यामुसंब्यांच्या बागा सर्वत्र असून गहू, भुईमुग वगैरे पीक चांगलें येई. चिरेबंदी मोठाल्या विहिरींत दोनदोन मोटा चालल्या तरी चिंता नसे. या विहिरीत पोहण्याची मौज आम्हीं वाल्ह्याला असतांना मनसोक्त उपभोगली.

त्या खेडयांत आम्हां सर्वांनाच फार मान मिळे बाबा प्रसिद्ध कवि, आई सुशिक्षित आणि गृहव्यवस्थेंत निपुण.

आई पुरुषमंडळींत बसून राजकारण वगैरेवर बोले हें त्या लोकांना चमत्कारिक वाटलें तरी तसें कोणीहि दाखवीत नसत. आईविषयी त्याना अतिशय आदर वाटे

तेथल्या सर्व जातीच्या बायकाहि आमच्या घरीं जमत. आईने त्याना दोन कादंबऱ्या वाचून दाखवल्या. कादंबऱ्या ऐकतांना सर्व बायका इतक्या रंगत, कीं त्यांच्या तोंडून प्रसंगानुरोधाने " अगबाई ! अयाई ! हात् मेल्या " असे सहजोद्गार निघायचे.

आईला औषधांचें ज्ञान बरेंच होतें बायका नेहमी औषधपाणी विचारायला येत. एकदा गावच्या रामोशाने आपला तान्हा मुलगा आईच्या पायांवर घालण्याकरिता आणला. मुलगा आसन्नमरण झालेला असून गावच्या वैद्याच्या औषधाने गुण पडला नव्हता

आईने त्या मुलाचें पोट वगैरे तपासून औषध सांगितलें आणि रामोशी व त्याची बायको यांनी भावनेखातर पायाचा अंगाराहि मुलाच्या कपाळी लावला

त्या औषधाने मुलाला चांगला गुण आला. तेव्हा आठ दिवसांनी तो रामोशी बायकोमुलासह पुन्हा आला. पोराचे प्राण वाचवल्या-बद्दल त्या दोघानी आईला पुन पुन्हा पाया पडून दुवा दिला आणि शेवटी त्या रामोशाने एका मळकट फडक्यांत गुडाळून कडोसरीला लाव-लेला शंभर नंबरी सोन्याचा गोफ आईपुढे ठेवला व तो स्वीकारावा म्हणून दोघांनी परोपरीने विनवणी केली. आईने त्याची समजूत करून गोफ त्यांना परत न्यायला लावला.

या लोकांच्या मृदु भावना, श्रद्धा व कृतज्ञता खरोखरीच आदरणीय असतात

वाल्हयाला आम्ही दहापंधरा मंडळी सकाळसंध्याकाळ एका मळयां-तल्या विहिरीवर पोहायला जात असूं. माझें पोहणें म्हणजे भोपळा बांधून डुबणें

पुण्याहून आमच्यासारखेंच आणखी एक कुटुंब प्लेगमुळे वाल्हयाला राहावयास आलें होतें. त्या कुटुंबांतले दोघेजण भाऊ-काकांच्याच वयाचे साधारण होते. ते नेहमी पोहायला येत. वडील भावाची बायको सासुरवाशीण असल्यामुळे कधीकधीच येई.

पुढे मग काकांना कळलें, की ती मासिक पाळीच्या वेळीं ओढया-वर धुवायला जाते म्हणून सांगून हळूच नवरा व दीर यांच्याबरोबर विहि-रीवर येऊन पोहण्याची हौस भागवून घेत असे.

मनुष्यावर भलतेच निर्बंध पडले म्हणजे बंद भांड्यांतल्या वाफे-

प्रमाणे वाट सापडेल तिथून त्याचें लुब्ध मन आकांक्षा पुरवून घेण्यासाठी तडफड करतें. मनुष्याच्या हातून चुका होतात त्या या कारणानेच.

पंधरासोळा वर्षाची मुलगी ती. अंत्रळी का असेना, पण तिनें आपली अनावर हौस पुरवून घेतली चोरटेपणामुळे पाप किंवा चूक घडते ती अशी

संध्याकाळी आम्ही सर्व फिरायला जायची. शिकारी महादेवाचा कठीण डोंगर चढण्याची मला फार मजा वाटे. आई आणि बाबा पायथ्याशी कुठेतरी बसत आणि बरोबर आणलेली मोरोपंताच्या केका किंवा बंगाली-हिंदी कादंबऱ्या अशी पुस्तकें वाचीत आम्ही वरून येईपर्यंत वेळ घालवीत. किंवा बाबा आपल्या कविता आईला वाचून दाखवीत

महादेवाच्या शिखराकडे जाताना वाटेंतच चांभारांचें देऊळ होतें. या देवळांत नवस फेडण्याकरिता म्हणून खरोखरीच खेटरें टांगलेली बघून सर्वांना फार हसूं येई

कधी फिरायला न जातां मी बरोबरच्या मुलीत खेळत असे. यात ब्राम्हणाच्या एकदोन मुली असून बाकी गुजराथी, परदेशी, मराठे अशा जातीच्या होत्या माझ्या पुण्याच्या शाळेच्या मौजा ऐकण्यांत त्या मुली रंगून जात. मी नवीन नवीन खेळ आणि गाणीं त्या मुलींना शिकवीत असे.

नंतर वाल्ह्याच्या शाळेंत बक्षिस-समारंभ झाला. संभाषणें आणि गाणीं लिहिणें व ती बसवण्यांत हेडमास्तर, मास्तर यांना मदत करण्यांत बाबा, आई, काका वगैरे मंडळी पंधरा दिवस गुतली होती मी आणि भाऊ संभाषणांत काम करणार होतों. पंधरा दिवस अगदी धामधुमीचे गेले.

मग ताबूतांची गडबड.

वाल्ह्याला तीनचार ताबूत बसत. बहुतेक सबंध गाव ताबूत करण्यांत गुतायचा. ताबुताला कागद डकवून नकशीकाम करण्यांत काका चांगलेच तरबेज झाले. आम्ही मुलेंहि रंगीबेरंगी कागदाची फुलें चिकटवण्याला मदत करीत असूं.

कत्तलच्या रात्रीं प्रत्येक ताबुताचे लोक भांगघोटा तयार करीत. ती पितांपितां सर्व गाव हायदोसधुल्ल्यात रमायचा ! घराच्या ओसरीवर बसून आम्हीं ही गंमत मनसोक्त पाहिली.

वाल्ह्याला असतांना बाबांना कांहीच उद्योग नव्हता. ते पांहायलाहि येत नसत. कांहीतरी छंद त्यांना नेहमी लागे. निरुद्योगी बसण्याचा त्यांना मनस्वी कंटाळा. सुतारकामांत त्यांचं प्रावीण्य होतं. आता त्यांनी सागवानी लाकूड कोरून त्यांत हस्तिदंती नकशीकाम करून एक तसबिरीची फरेम तयार केली. यापूर्वी त्यांनी दोन पाटांवर नकशी केलेलीच होती.

आम्हां मुलाची त्यांत लुडबूड चालायचीच. भाऊ आणि आमचा मावसभाऊ किसन हे बाबांना भीत. कारण बाबा रागावले की त्यांच्यावर मोठ्यानेओरडत आणि केव्हाकेव्हा मारीतसुद्धा. मला मात्र चुकून त्यानी मारलें नाही किंवा ओरडून रागावलेहि नाहीत लहान मुलाशी बोलावें तसा प्रेमळ हेल काढून ते शेवटपर्यंत माझ्याशी बोलत.

माझा त्रास बाबांना होऊं लागला की तेअजीजीच्या स्वरांत बोलत," नको ग बाय खोड्या करूंस. तुझा मला उपद्रव होतो आहे."

एवढें बोलणें मला पुरत असे. मी रुसून जाऊं लागलें की वाईट वाटून बाबांनी म्हणावें," मागून मी तुला एक फूल करून देईन, समजलीस ?"

आणखी गंमत म्हणजे जियेतिथे हुरड्याच्या वेळी आमंत्रण येई. शेकोटीजवळ बसून हुरडा खाण्याची मजा वाल्ह्यालाच आम्ही लुटली.

याप्रमाणे आमचे वाल्ह्याचे दिवस आनंदीआनंदांत जात होते. बाबा दोन वेळां मुबईला जाऊन आले होते. पुरतीं नोकरीची वर्षे भरण्यापूर्वीच पेन्शन घ्यावयाचें, फर्लोनंतर पुन्हा नोकरी करावयाची नाही असा बाबांचा निश्चय असल्यामुळे त्याच कामासाठी ते मुंबईला जात. मुंबईहून येतांना ते नेहमी मिठाई आणीत. आता पुन्हा ते मुबईला निघाले तव्हा मी त्यांना जोडपाटी आणण्याकरिता बजावून ठेवलें होतें.

म्हणून आता बाबा गेल्यापासून मी दिवस— नव्हे तास मोजीत होतें. शेवटी चार दिवसांनी बाबा आले आणि जोडपाटी आणायला विसरलों अशी जरा वेळ माझी थट्टा करून मग त्यांनी ती जोडपाटी जेव्हा मला दिली तेव्हा मला कोण आनंद झाला! मी तीवर सारखी लिहीत बसलें. मिठाई खाण्याचीसुद्धा मला शुद्ध नव्हती. निजतांना जोडपाटी जवळ ठेवून मी निजलें.

रात्रीं मी अचानक जागी झालें. माझ्या कानांवर हुंदके पडत होते. आणि ते बाबांचे होते हें मी लवकरच ओळखलें. मी मनांतून इतकी घाबरलें की वाटेल तसल्या भयंकर कल्पना मनांत येऊं लागल्या. झालें तरी काय हें कळावें म्हणून तीव्र उत्कंठा लागून राहिलेली असून जीव दबकून गेला होता. मी तशीच भीतीमुळे गुपचूप पडून राहिलें. बाबांचें रडणें ऐकून मलाहि रडू येत होतें. पण मीं तें आवरून धरलें.

शेवटीं बाबांचे शब्द मला ऐकू आले— " या जगांत विद्वत्तेला मान नाही, प्रामाणिकपणाला मान नाही. वशिल्याचीं तट्टं आम्हांला लाथा मारून पुढं जातात. माझी महत्त्वाकांक्षा आज पार नष्ट झाली. मला अजून आशा होती, की माझ्या बाबतींत झालेल्या अन्यायाचं निवारण होइल म्हणून. पण संपलं आता सगळं! गोडगोड बोलूनच प्रिन्सिपॉलनी मला वाटेला लावलं. "

आई त्यांना धीर देत होती, " पण त्याच प्रिन्सिपॉलमुळं पाऊणशे रुपये पेन्शन तरी मिळण्याची सोय लागली. नाहीतर आपण काय केलें असतं ? "

तीं दोघें बोलत असतांच मला पुन्हा झोप लागली. झोपेंत वाईट स्वप्नांनी नुसती गर्दी केली होती

सकाळीं जागी होऊन अंथरुणांत उठून उभी राहून मी पाऊल टाकतें तों काड्कन् आवाज झाला.

माझ्या पोटांत धस्स झालें. अगदी जिवाला चरका बसल्यासारखें झालें. कारण तो पाटी फुटल्याचा आवाज होता!

माझें आजपर्यंतचं बहुतेक आयुष्य अशा प्रकारच्या प्रसंगांनी खचलेलें आहे. एखाद्या गोष्टीची वाट पाहा पाहा पाहायची, आशेने

ती मिळविण्याकरिता प्रयत्न करायचे आणि ती आशा सफल झाली तरी लगेच पदरी निराशा पडायची आशा आणि लगेच निराशा! मधला समाधानाचा काळ जवळजवळ नाहीच !

फुटकी पाटी मी अगदी दृष्टीआड करून टाकली. आईबाबांनी माझी समजूत केली. मी पण कांही वाईट वाटत नसल्यासारखें दाखवीत होतें पण खरी मनाची समजूत होणें कठीण होतें वर्गातल्या दोन-तीन मुलींच्या जोडपाटया पाहून मी कितीक दिवस आईच्यामागे लागलें होतें जोडपाटया महाग असल्यामुळे त्या सहज घेणें शक्य नसे. अशा परिस्थितीत मला ती जोडपाटी मिळाली आणि लगेच फुटली. पुन्हा मला जोडपाटी कधी मिळाली नाही अन् मी मागितलीहि नाही. मानुषी आणि आकस्मिक आपत्तीचे नमुने मी एका दिवशी पाहिले.

यानंतर वाल्ह्याहून आम्ही पुण्याला लवकरच परत आलों. आता प्लेग संपून शाळा सुरू झाल्या होत्या. इतके दिवस आम्ही तेथे राहिलो तरी तेथून परत येताना आम्हां सर्वांना वाईट वाटलें. तेथील मंडळीनाहि फार वाईट वाटलें. आम्हांला स्टेशनवर पोचवायला किती तरी मंडळी आली होती; आणि कांही बायका तर रडल्या !



# प्रकरण ५ वें

पुण्यात त्या वेळी राजकीय धुमश्चक्री माजलेली होती रँडसाहेबांचा खून, चाफेकरबंधु, द्रविडबंधु, टिळकांची सक्तमजुरीची शिक्षा असल्या भयंकर गोष्टींनी पुण्याचें वातावरण दुमदुमत असून संभावित डिटेक्टिव्हांच्या भयाने पुणेकरमंडळी दबकून गेली होती.

आईबापांनी आम्हां मुलांना ताकीद दिली होती, की " टिळक, केसरी, काळ वगैरे नावेंसुद्धा कुणाजवळ उच्चारूं नका. आम्ही घरांत कांही बोललों तरी तें पुन्हा बोलू नका आणि कुणी विचारलं तर आम्हांला कांही माहीत नाही म्हणून सांगा."

आम्ही मुलें आपापसांत मात्र भीतियुक्त मनाने याच विषयावर कुजबूज करीत असूं वडील मंडळीच्या बोलण्याचें पुनरुच्चारण असे तें याशिवाय मोठें झाल्यावर अमक्यासारखेंच वागायचें, अमुक करायचें वगैरे महत्त्वाकांक्षाहि आम्ही बोलून दाखवीत असूं. राजकारणासंबंधी बोलत असतां भाऊ आणि माझा मावसभाऊ किसन हें आपणांला माझ्यापेक्षा फार मोठे समजत आणि आता बोललेलें कुठे बडबडू नको म्हणून मला दम भरत

पण त्यामुळे आमच्या खेळात कांही अंतर पडलें होतं असें वाटतें का तुम्हांला ? छे: छे:, तसें मुळीच नव्हतें हां.

आमच्या आत्याबाईंची सर्व मंडळी वर्षभर बेळगांवला गेली होती. तेथून मुलाची बदली झाल्यामुळे मंडळी आता वर्षानंतर पुण्याला आली होती. आमच्या आतेभावाच्या तीन मुली आणि त्यांच्या चुलत घराण्यातील मुलेंमुली आमच्याच वयाचीं. तेव्हा त्यांच्या घरीं खेळण्याला ऊत येई. महिन्यामहिन्याला भावलाभावलींची लग्नें आम्ही लावीत होतो. तीं जिनगरी भावलाभावली नी ते पितळी दागिने, चिंधुकल्याचे खण, रॉकेलचे डबे, पिंगाण्या, टमटमगाड्या यांचीं वाजंत्रीं अन् खऱ्याखुऱ्या व्याहिणींप्रमाणे रुसवारुसवी अन् उखाण्यांची गर्दी ! कोण धांदल चालायची !

झोपाळ्यावरल्या आव्यांची शर्यत तर नेहमी चालायची. आम्हां सर्वांचा एक मोठा आवडता खेळ होता. बेळगांवहून येतांना आते-

भावाने पुष्कळ गाद्या करून आणल्या होत्या सर्व माणसांना गाद्या पुरून आठनऊ गाद्या शिल्लक राहिल्या होत्या त्या एका खोलीत रचून ठेवल्या होत्या. त्या गाद्या पाहूनच मला तो खेळ सुचला होता.

तो खेळ असा होता, की खालच्या वळकटीवर कुणीतरी एकीने हातपाय पोटाशी धरून पालथें पडावयाचें. नंतर तिच्या पाठीवर पाच-सहा वळकट्या ठेवावयाच्या मग सर्व मुलींनी अगदी वरल्या वळकटी-वर रांगेने बसावयाचें. मग एकीने खाली बसलेल्या मुलीला सूचना करावयाची. की ती मुलगी सर्व बळ एकत्र करून उठण्याचा प्रयत्न करी आणि आम्ही सर्वजणी गाद्याबरोबर कुठेतरी फेकल्या जायच्या. पडल्यावर लागू नये म्हणून आम्ही दोन गाद्या उलगडून ठेवीत असूं त्यामुळे आम्हाला लागत नसे. पण पडतांना ओरडायला होई. कोण ग बाई आम्ही खिदळायच्या !

एके दिवशी काय गंमत झाली, सर्व तयारी केल्यावर गादीत बसलेल्या मुलीला उठण्याची सूचना मला करावयाची असतां तिचें तोंड कुठल्या बाजूला आहे हेंच मला आठवेना. दुसऱ्या मुलींना मीं विचारलें तर त्यांनाहि आठवत नव्हतें. तेवढ्यांत ती खालची मुलगी जरा गुदमरल्यासारखी होऊन एकदम उठली. वरच्या मुलींना आपण आता पडणार ही कांहीच कल्पना नसल्यामुळे त्या अस्ताव्यस्त पडल्या. भयंकर ओरडा केला त्यांनी अन् मग ज्या कांही हसलों आम्ही !

आम्हीं त्या गाद्यांचा इतका धुडा चालवला होता ना, तरी आम्हांला कुणी मोठीं माणसें रागावत नसत. आमच्या घरीं मात्र आम्हीं मुलींनी गडबड केली किंवा भाऊच्या मित्रांनी चेंडूफळी, विटी-दांडू खेळतांना नासधूस केली तर काका रागवत. तसे ते कांही नेहमीच रागावत नसत. केव्हाकेव्हा ते आमच्यांत खेळावयाला सुद्धा येत अन् खूप गमती करीत.

मला मुलांचे दांडगाईचे खेळ फार आवडत. त्यांच्या बरोबरीने विटीदांडू, चेंडूदांडू, झाडावर चढणें हे खेळ मी खेळे. त्यांच्याबरोबर भंड्या लावण्यांतहि माझा नंबर बराच वर असे.

बाकी मला मुबईच्या जिन्याच्या कठडयाची भारी आठवण येई बाबा फर्लो घेईपर्यंत आम्ही मुंबईला पेंडशाच्या वाडीतल्या रस्त्यावरच्या बंगलीत राहात असूं. आमचा ब्लॉक तिसऱ्या मजल्यावर होता. काय पण सोयिस्कर जिना होता तेथे – नव्हे, चुकलें, जिन्याचा कठडा फार सोयिस्कर होता. तिसऱ्या मजल्यापासून तळमजल्या-पर्यंत कसा अगदी गुळगुळीत. एक जिना संपून दुसरा लागला की सुरेख वळण घेऊन खाली आणलेला मध्ये खाब नाही, काही नाही. वरल्या मजल्यावरून कठडयावरून घसरत सुटलें, की थेट तळमजल्यावर येऊन पोचायचें. पुण्याला कांही ही गंमत नव्हती.

काही कारणाने कुणी खेळायला नसलें तर मी मुग्याना साखर घालण्याचा उद्योग करी. साखरेचे कण त्या कष्टाने वाहून नेतात, एक-मेकीला मदत करतात आणि तोंडाला तोंड लावतात हें बघून मला गंमत वाटे. आमच्या वाडयांतल्या पेरूच्या झाडात त्यांनी घरें केलेली असून वर भोकें दिसत त्या भोकांत साखरेसह मुग्या प्रवेश करीत. कित्येक वेळा त्या मुग्यांची दया येऊन त्या भोकांत मी साखर टाकीत असे. त्या शर्करा-वर्षावाने आंतल्या मुग्यांना काय बरें वाटत असेल!

केव्हाकेव्हा संध्याकाळी अंगणांत सतरंजीवर गप्पा मारीत मुलें बसली की मी पडल्या पडल्या ताऱ्यांकडे बघत बसे मला वाटे, हे सर्व राजपुत्र-राजकन्यांचे राजवाडे असावेत. मग त्यातील अदभुत रमणीय आयुष्याची कल्पना करतांकरता मी तल्लीन होई.

आमच्या घरांत एक चारपाच फुटी चिरेबंदी बळद होतें. त्या बळदांतून एखादें भुयार खचित असेल असें मला, भाऊला आणि माझा मावसभाऊ किसन याला वाटे त्या भुयारांतून लांब गेल्यावर आप-ल्याला एखादा सुंदर उद्यानांतला राजवाडा दिसेल. त्या राजवाडयांत अगणित संपत्ति आणि दासदासी असतील. तेव्हा भुयाराचें दार साप-डावें म्हणून आम्ही तिघे किती वेळां तरी दिवा लावून घेऊन त्या बळदांत शोध करीत असूं; पण आमची प्रत्येक वेळेला निराशा होई.

पर्वतीवरलीं भुयारें पाहून आल्यावर तर आम्हांला हें भुयार शोधून काढण्यास स्फुरण येई.

वाल्हयाहून आल्यावर एका श्रावण-सोमवारी फार मजा झाली. आमच्या शाळेतल्या ड्रिल शिकणाऱ्या बाई 'डावा, उजवा' सांगतांना या दोन्ही शब्दांचा उच्चार चमत्कारिक पोकळ पोकळ असा करीत. तें मी घरी सांगितलें होतें. दुसऱ्या दिवशीं श्रावण सोमवार होता. आम्ही पर्वतीला जाणार होतों. त्या आनंदाच्या भरांतच भल्या पहाटे उठण्याचा संकेत करून आम्ही झोपलों होतों. पण एकालाहि लवकर जाग आली नाही. आम्हां मुलांना अंथरुणांतून ओढून काढून दोनदोन तपेल्या अंगावर ओतून झटपट तयारी आवरल्यावर आम्ही भल्या पहाटे निघालों. आमच्याबरोबर सातआठ मोठ्या बायका आणि आम्ही पंधरासोळा मुलें होतों.

पेशवाईंत हिराबागेसमोर नौकाविहाराचें तळें होतें. त्या तळ्यांत मध्ये सारसबागेंत गणपतीचें स्थान आहे हें तळें कोरडें पडत चाललें असून त्यांत कुठें डबकीं, चिखल, रानगवत एवढेंच सध्या शिल्लक होतें पर्वतीच्या वाटेवर अशी कांही किर्र झाडी होती की भिकारदास मारुतीच्या पलीकडे करकरीत तिन्हीसाजानंतर एकटादुकटा मनुष्य सहसा फिरकत नसे. फिरकलाच तरी रामनाम उच्चारीत असे. नेहमी त्या वाटेनें खेडवळ लोक जात. ते मंतरलेले ताईत, तांडगे बांधून घेत. रानकिड्यांचा भेसूर आवाज काय तो त्या भयाण शांततेचा भंग करी आणि पाण्याच्या उच्छ्वासांचा झाडीत दुमदुमलेला आवाज दूरवर ऐकू येई.

पर्वतीला फिरावयाला जाणारे लोक फार थोडे असत. परंतु शिवरात्र आणि श्रावण सोमवार या दिवशी मात्र पर्वतीच्या वाटेवर यात्रा भरून वाटेने माणसें, ^लगाड्या, टांगे, शिग्राम याची गर्दी होई. पुण्याच्या आसपासच्या खेड्यापाड्यातील बायकापुरुष नटूनथटून बैलगाड्यांतून यात्रेला यायचे.

पहाटे गर्दीचा त्रास होत नसल्यामुळे आणि दर्शन शांतपणें होत असल्याकारणाने कांही थोडे लोक त्याच वेळी जात. आम्ही मुद्दामच पहाटे निघालों होतों. वाटेंत जाणारींयेणारीं माणसें थोडीं भेटत. पण आम्हांला भीति वाटत नव्हती– म्हणजे फारशी भीति वाटत नव्हती;

कारण आमच्याबरोबरच पुष्कळ मंडळी होती. काका, हिरालाल- म्हणजे आमचा गुजराथी सैपाकी-आणि माझा मोठा मावसभाऊ हेहि बरोबर होते.

आम्हां मुलांचा या वेळचा बोलण्याचा विषय सारसबाग, हिराबाग, आदमबाग यांत संचार करणारी भुतें व त्यांच्या लीला असा होता. मोठाली मुलें तऱ्हतऱ्हेच्या गोष्टी सांगून आमच्या जिवाचा थरकाप उडवीत, तर त्यांचाहि स्वर कापरा आणि हलका असे. पहाटे भुतें घरोघरी जातात हें आम्हांला माहीत होतें. पण न जाणो! या भुतांखेरीज अंबील ओढयावर मध्यरात्रीं वांटणी करण्याकरिता चोर जमत त्यांच्याविषयीहि बोलणी झालीं. शेवटी ठगाच्या जबानीतल्याहि अंगावर शहारे आणणाऱ्या गोष्टी ऐकायला मिळाल्या. बायकांचीं आणि काकांच्याबरोबरच्या पुरुषमंडळीत काय बोलणी चालली होतीं कोण जाणे! पण सर्व मोठमोठयाने हसतबोलत चालले होते खरे.

मग पर्वतीवर चढणें, दर्शन घेणें, पर्वती उतरणें, प्रसाद म्हणून मिठाई विकत घेणें असें सर्व यथाशास्त्र झाल्यावर वर चढण्यापूर्वीच काकांनी पाळणेवाला आणि घोडेचक्करवाला यांना तयारी ठेवण्यास सांगितलें होतें. तेव्हा खाली आल्यावर मोठया बायका वगळून आम्ही सर्व फिरत्या पाळण्यांत आणि चकरांत फिरल्यावर घरीं परत निघालों.

आता गर्दी जरा वाढल्यामुळे आम्ही मुलें चुकूं म्हणून वडील मंडळीना भीति वाटू लागली. तेव्हा काकांनी एक युक्ति काढली.

त्यांनी आम्हां मुलांच्या जोडया करून एक रांग तयार केली. काका आणि आमचा मावसभाऊ असे सर्वांत पुढे आणि हिरालाल व एक आतेभाऊ असे दोघे मागे अशा रीतीनेआम्ही चालूं लागलों. काका आमच्या ड्रिलच्या बाईप्रमाणे पोकळ आवाजांत "डावा, उजवा" म्हणून मोठमोठयाने म्हणत ड्रिल करीत निघाले आणि आम्हांलाहि तशीच पावलें टाकायला त्यांनी सांगितलें. रस्त्यांतले जाणारेयेणारे लोक हसत, पण आम्हाला आणि काका वगैरेंना तरी त्याचें कुठे काय होतें! आईसह सर्व मोठया

भायका मात्र गाव लागतांच पुढे झटकल्या. गावांतली कुत्री रागारागाने भुंकूं लागलीं की काका हुबेहूब तसे भुंकत आणि मग आळींतलीं सर्व कुत्रीं भुंकूं लागत. अशा तऱ्हेनें आमची पलटण घरापर्यंत आली. या गडबडींत भुयार शोधण्याचें सुद्धा आम्ही विसरलों.



# प्रकरण ६ वें

लवकरच काकांचें लग्न झालें. पंधरा दिवस लग्नाची गडबड चालू होती. पाहुणे गेल्यावर घरांत शुकशुकाट झाला, तेव्हा मला चैनच पडेनासें झालें. लग्नाची सर्व मौज संपली म्हणून मला रडूंच येऊं लागलें.

काकू माझ्यापेक्षा चारपांच वर्षांनी काय ती मोठी होती. तेव्हा माझी नी तिची ताबडतोब गट्टी जमली.

ती गोष्टी फार छान सांगत असे आणि मला गोष्टी ऐकण्याचा नाद विलक्षण, तेव्हा मी सारखी काकूच्या भोवतीभोवती असायची. भाऊ, किसन, मी, काकू आणि वाड्यांतलीं मुलें पत्ते, सोंगट्या, बुद्धिबळें किंवा विटीदांडू असे खेळ शाळेनंतर खेळत असूं. काकू सासुरवाशीण असल्यामुळे ती जरा भिऊनभिऊन असे.

काकूच्या मंगळागौरी, सणवार सारखे चालूच असत. आम्हां बाकीच्या सर्वांना त्यांत आनंदच होता.

पण आईबाबांना सर्व घरखर्च भागवतांना काय होत होतें याची आम्हांला कशी कल्पना होणार? हल्ली घरभाडें ही जशी उत्पन्नाची बाब झालेली आहे तशी पूर्वी ती नव्हती. भाडें फार थोडें येई. आमच्या वाड्यांतल्या खोल्यांचें फक्त आठदहा रुपये भाडें येई. प्रॉमिसरी नोटांना भाव फार कमी येऊन तिघां भावांत वांटण्या होऊन जे पैसे हातीं आले ते जुन्या घराच्या डागडुजींत व भिंती घालण्यांत खर्च झाले. काकांच्या वांट्यांत आलेले पैसे लग्न आणि काकूचे दागिने यांतच गडप झाले! काकांना मिळकत अशी कांहीच नसून साहेबी पोषाख, दिवाणखान्यांत चांगलें फर्निचर यांत मात्र ते पैसे खर्चीत. धंदा चांगला चालण्याकरिता असें वागलेंच पाहिजे असा त्यांचा युक्तिवाद असे.

बाबांनी शेवटीं एका खाजगी शाळेंत नोकरी धरली आणि शिवाय घरीं वर्ग घेण्यास सुरवात केली.

बाबांना आता वार्धक्य ग्रासूं लागलें होतें, पण त्यांना निरुद्योगीपणाचा मूळचाच तिटकारा. मिनिटभर त्यांना स्वस्थ बसवत नसे. शेवटपर्यंत ते दिवसभर इतकें काम करीत की आम्हांला लाज वाटे. शाळा, शिकवण्या, लेखन, वाचन आणि कांहीतरी छंद असा दिवसभर त्यांचा उद्योग चाले.

काका एक पैसा कधी घरखर्चाला देत नसत. पण त्यांनी कुरकुरायला सुरवात केली, " तुम्ही या एकएक दोनदोन रुपयांच्या शिकवण्या करतां, त्यांत आपल्याला कमीपणा येतो. माझी मित्रमंडळी मला हसतात. "

बाबांनी गरीबपणाने सर्व ऐकून घेतलें. तीनचार वेळां आईहि गप्प बसली. मग मात्र एकदा तिने काकांना सणसणीत उत्तर दिलें. ती म्हणाली, " हें पाहा भावजी, सर्व सोंगं साधतात; पण पैशाचं साधत नाही. इतका सर्व घरखर्च चालवायला पैसे आणायचे कुठून ? इकडून आता शिकवण्याच काय, पण नोकरी करावी हेंदेखील मला आवडत नाही. पण दुसरा कांही आहे का उपाय? तुम्हीं महिन्याकाठी पन्नाससाठ रुपये दिलेत तर मग उद्यापासून सुद्धा शिकवण्या बंद करूं. "

यानंतर काकांची कुरकूर पाठीमागे चाले. काकू त्या वेळी तेराचौदा वर्षांची होती. तिला घरांतलें काम येत नसे आणि होतहि नसे. शिवाय आमच्या घरांत ब्राम्हण, मोलकरीण असल्याकारणाने आणि दूधदुभतें वगैरे आईच पाहात असल्याने काकूला कांही कामच नसे. कुठे पानें मांडायचीं, चहा करायचा, भाजी निवडायची अशीं किरकोळ कामें आई तिला सांगे. तेवढ्याचा ती गोंधळ घाली आणि काम फार पडतें, जाऊबाई जाच करतात, अशा तक्रारी काकांना सांगे. त्यामुळे काकांच्या वृत्तींत हलकेहलके बदल पडत चालला होता. वाड्यातल्या इतर बायकांच्याजवळहि काकू आईच्या चहाड्या करी. परंतु यामुळे काकूने वाईटपणाखेरीज कांहीहि मिळविलें नाही.

माझ्यावर मात्र काकाकाकूंचें प्रेम कायम होतें. काकूचें कांही चुकलें आणि आई तिला बोलली, की काकू रडूं लागे. कित्येक वेळां मी तिची समजूत घालीत असें.

दोन वर्षांनी काकूंचीं डोहाळजेवणें सुरू झालीं. आम्हांला चुलत-भाऊ झाला तो इतका गोंडस अन् सुरेख! आमच्या घरांत त्या बाळाने जणू नवचैतन्य निर्माण केलें.

मला अकरावें बारावें वर्ष लागल्यापासूनच " काय, यंदा लग्न करणार की नाही?" असे प्रश्न मंडळी आईला विचारूं लागली होती. आई सर्वांना एकच उत्तर देई, " आणखी दोनतीन इयत्ता होईपर्यंत सुमतीच्या लग्नासंबंधी आम्ही मुळी विचारच करणार नाही. त्यांतून फारच चांगलं स्थळ आढळलं तर करूनहि टाकूं लग्न. कारण केव्हा-तरी लग्न करायचंच, मग चांगलं स्थळ कां दवडायचं?"

माझ्या वर्गातल्या मुलींचीं लग्नें होऊन वरच्या वर्गांत जावें तसतशी मुलींची संख्या घटूं लागली होती. लग्न झालेल्या मुली मागून आम्हांला भेटायला येत तेव्हा कोऱ्या साड्या आणि दागदागिने घालून येत. मग तिचे दागिने पाहाणें, नांव घ्यायला लावणें आणि थट्टा-मस्करी करणें यांमध्ये वर्गातल्या मुलींचा दिवस जायचा. मास्तरणीसुद्धा त्या मुलींचें कौतुक करीत. लग्न झाल्यामुळे त्या मुलीला केवढा मान चढे! मुलीच्या आयुष्यांतलें ध्येय काय? तर लग्न! अन् तें गाठल्याबद्दल त्या मुलीला आनंद होई. लग्नानंतर मुली क्वचितच शाळेंत शिकायला येत.

आम्हां इतर मुलींना त्या मुलींचा थोडा मत्सरच वाटे. आपलेंहि लग्न होऊन आपणहि दागिने घालून केव्हा एकदा मैत्रिणींना भेटायला जाऊं असें मनांतून वाटे; पण आम्ही उघड असें कधी बोलून दाख-वीत नव्हतों.

बाकी शाळेंत फार मजा असे. इंग्रजी पहिलींत तर आमच्या आनं-दाला जसा कांही ऊत आला होता! कोण जाणे केव्हा शाळेंत येणें बंद होतें तें, असें मनांत वाटूनच जणू आम्ही हिंदु मुली मनसोक्त मजा करून घेत होतों. पारशी आणि ख्रिश्चन मुली जात्याच धीट आणि गमत्या स्वभावाच्या.

आमच्या वर्गातली एक ख्रिश्चन मुलगी ख्रिश्चन वसतिगृहांत ( शाळेच्याच ) राहात असे. या ॲग्नेसच्या खोलींत पांच मुली होत्या.

संध्याकाळीं जेवण आटपून, देशीविदेशी खेळ खेळून अभ्यासाची घंटा झाली की मुली आपापल्या खोलींत जाऊन अभ्यास करीत. एके दिवशीं या पांच मुलीहि अशाच अभ्यास करूं लागल्या. परंतु अचानक गप्पांना सुरवात होऊन चौघी मुली गप्पा मारण्यात दंग झाल्या आणि फक्त एक मुलगी अभ्यासांत गढून गेली. मेरीनेहि अभ्यास न करतां गप्पांत सामील व्हावें म्हणून या मुलींनी प्रयत्न केला; पण तिने ऐकलें नाही. आठ वाजतां लहान मुलींनी झोपावयाची घंटा होताच खोलींतला दिवा मालवून या सर्व मुली पलंगावर पडल्या. ॲग्नेसच्या मनांत मेरीची कांही खोडी काढावी असें आलें. सर्वजणींना झोप लागली असें पाहातांच ॲग्नेसची स्वारी उठली. तिने हळूच कात्री घेतली आणि चंद्रप्रकाशाच्या सहाय्याने मेरीची एक भुवई कातरून टाकली.

ॲग्नेसला मिस् सोराबजींनी, म्हणजे मदरनी, पुष्कळच उपदेश केला; पण त्यांना खराखुरा राग आलाच नसावा असें ॲग्नेसने आम्हांला सांगितलें.

मेरी स्वतः खोडकर असल्यामुळे तीहि ॲग्नेसवर मुळीच रागावली नव्हती. ती बरेच दिवस विचित्र दिसत होती.

शाळेच्या मधल्या मुख्य इमारतीच्या पाठीमागे कांही आवळ्यांचीं आणि चिंचेचीं झाडें होती. लहानपणीं आवळे, चिंचा खाण्याकरिता जिवाची काय पण तगमग चाले! परंतु आमच्या शाळेंत नियम केला होता, की जी मुलगी आवळा किंवा चिंच खाईल तिला एरंडेल पाजायचें!

आम्ही गच्चीवर ( पायखान्याकडे ) जायला निघालों, की दोनतीन हरपररेवडयांच्या झाडांवरले आवळ्यांचे घोस लटकलेले आणि झाडांखालीहि आवळ्यांचा सडा पडलेला दिसायचा. पण एरंडेलाच्या भीतीमुळे एक आवळा उचलायची आम्हां कुणाची प्राज्ञा नव्हती

अल्लाउद्दिनाला रत्नांचीं झाडें दिसलीं; पण त्यांचीं रत्नें तोडून खिशांत घालायचीं नाहीत असा जर प्रतिबंध केला असता तर! आम्हांला ते आवळयांचे घोस अगदी पेढेबर्फीपेक्षा जास्त मोहक दिसायचे; पण शेवटीं मान वळवून निघून जावें लागे.

एके दिवशीं मला स्वप्न पडलें, की आई मला नाहूं घालीत होती आणि तपेलींतून माझ्या डोक्यावर पाण्याची धार न पडतां आवळेच पडत होते. स्वप्नांत कांही घडलें तरी आश्चर्य वाटत नाही. त्याप्रमाणे मला आश्चर्य मुळीच वाटत नव्हतें. स्वस्थपणें नहाणें चालूच होतें. न्हातांना मीं जीभ बाहेर काढली होती की नाही तें मला आता आठवत नाही; पण काढली असली तर मीं ती मोठी शहाणपणाची गोष्ट केली, असें नाही वाटत तुम्हांला ?

पण एकसुद्धा आवळा मीं खाल्ला नाही हें अगदी नक्की.

मधल्या सुट्टीत आणि शाळेनंतरसुद्धा आम्ही खूप खेळायच्च्या; पण वर्गात मात्र आम्ही पुतळ्याप्रमाणे शांत असायच्च्या. रोजच्या अभ्यासांत सहसा कुणी चुकारपणा करीत नसे.

मी जसजशी वरल्या वर्गात जात होतें तसतशी लग्नाविषयीची उत्सुकता कमी होऊन शिक्षणात गोडी लागू लागली होती.

अन् अशा तऱ्हेने मजेंत सर्व चालू असतां अचानक माझें लग्न जमलें. लग्नाचा विचार नाही, खटपट नाही, कांही नाही. योग होता म्हणून जमलें. आमच्या मानाने स्थळ फारच चांगलें होतें. मुलगा डबल ग्रॅज्युएट, चांगली नोकरी, बिजवर, पण लहान वयाचा— अशा वर्णनाचें स्थळ कळतांच आईबाबांना मोह आवरला नाही. मला दाखवल्याबरोबर लग्न जमलें. मला वाईट वाटू लागलें. आवडत्या मास्तरणींना, मैत्रिणींना सोडून जायचें म्हणून मी रडत बसायची

आईने एके दिवशीं मला बजावलें, " इकडल्यासमोर रडू नकोस हो. नाहीतर ते सरळ लग्न मोडून टाकतील. "

इंग्रजी तिसरींत मी असतांच माझें लग्न झालं. सासरच्या श्रीमंतीच्या मानाने कांही फारसं न करतां थोडा हुंडा, थोडी करणी आणि लग्नखर्च म्हणून अडीच हजारांचा खर्च झाला. बाबांनी कष्ट करून आण्यारुपयांनी माझ्या लग्नाप्रीत्यर्थ आणि भाऊच्या शिक्षणासाठी जमवलेले पैसे माझ्या लग्नांतच खर्चून गेले !

लग्नासाठी सर्व नात्यागोत्याची मंडळी जमल्यामुळे सर्व वातावरण गप्पागोष्टी आणि विनोद-आनंदाने दुमदुमत होतें. अक्षत समा-

रंभाची मिरवणूक जेव्हा माझ्याशिवाय घरून निघाली तेव्हा मला मोठें वाईट वाटलें. मग दुसऱ्या दिवशी श्रीमंतपूजनाच्या वेळी माझी भाची व जिवलग मैत्रीण राजी ही मला म्हणाली, की "मी आता जात नाही. तुझ्याजवळच बसतें." तेव्हा मी तिला हळूच सांगितलें, की "तसं नाही तूं आता जाच अन् कसंहि करून मुलगा नीट बघून येऊन मला वर्णन सांग."

आमचा लग्नाआधी दर्शनसमारंभ झालेला होता, पण मी वर मान करून आनंदरावांच्याकडे बघितलें होतें कुठे ? म्हणूनच ते कसे काय आहेत हें जाणण्याची मला उत्सुकता लागून राहिली होती

श्रीमंतपूजनाहून राजी आली ती अगदी आनंदाने उड्या मारीतच !

युरोपियन लोकांत लग्नदिवशीं वधूचा थाटमाट फार करतात आणि सर्व लोक तिचेंच कौतुक करीत असतात. त्यामुळे ती त्या दिवशी मोठी आकर्षक दिसते. आपल्याकडे वधूचा नुसता अवतार करून ठेवीत. नवऱ्यामुलाचा मात्र थाटमाट व कोडकौतुक फार होत असल्याने तो एरवीं कसाहि असला तरी लग्नप्रसंगीं मोठा देखणा दिसतो.

राजीने माझा हात धरून मला ओढूनच एका बाजूला नेलें आणि "सुमति, काय तुझा नवरा सुरेख आहे !" असें ती जी वर्णन करीत सुटली ती सबंध पोषाखाचें वर्णन करून शेवटीं ते कसे ऐटींत लोडाशीं बसले होते तेंहि तिने दाखविलें.

हें वर्णन करण्याच्या भरांत ती सारखी "तुझा नवरा" म्हणून म्हणत होती. मला तें वर्णन ऐकून अत्यानंद होत होता; परंतु नवरा हा शब्द मला रुचेना. म्हणून मीं म्हटलें, "ए, सारखी नवरा-नवरा काय करतेस ग ? तुला नांव माहीत नाही वाटतं त्यांचं ?"

राजी मुद्दामच म्हणाली, "मला काय माहीत ! तूंच सांग."

मीं लाजावें असा तिचा हेतु होता. तो का मी सफळ होऊं देणार ? मनांत संकोच वाटत असूनहि मीं सांगितलें, "याएउं नेहमी आनंदराव म्हणत जा."

मी आणखीहि एकदोघींना याप्रमाणे सांगितल्यावर सगळीकडे ती गोष्ट पसरली. तेव्हा आई म्हणाली, "हं, बरोबर आहे कादंबऱ्या वाचून तिला नवरा, बायको हे प्राकृत शब्द आवडेनासे झालेत. तिला पति, पत्नी असे शब्द आवडायचे."

बावांनी पुष्टि दिली, "होय, तिला कांता, ललना, नाथ, आर्यपुत्र— अस्सं लोकांनी म्हणावंसं वाटत असेल."

मग काय विचारतां? सर्व मंडळींनी "तुझा पति", "तुझा नाथ" असें म्हणायला आरंभ केला

काकूने या प्रकारात आणखीच भर घातली. ती म्हणाली, "नुसतं हें अस्सं 'तुझा नाथ', 'तुझा पति' असं म्हटलेलं नाही बाई बरं लागत. त्याला जरा बहुमानार्थी राव, पंत असं जोडायला हवं."

अन् मग जेव्हा का सगळ्यांनी आर्यपुत्रपंत, नाथराव, पतिपंत असें म्हणायला सुरवात केली तेव्हा मला अगदी भीक नको पण कुत्रा आवर, असें होऊन गेलें !

लग्नानंतरच्या दोनचार दिवसांत माझें सासरमाहेर सारखें चालू होतें. राजी माझी पाठराखीण होती. मग माहेरीं आल्यावर नव्या नात्यांतील मंडळी कसकशी बोलतात, कशी वागतात, त्यांच्या लकबी याचें साग्रसंगीत वर्णन मी आणि राजी करीत असूं.

वरपक्षाचा जानवसा ज्या वाड्यांत होता त्याचे मालक एक जहागिरदार होते. त्या पतिपत्नींना प्रत्येकीं मासिक तीस रुपयांचें उत्पन्न होतें. हे जहागिरदार मोठे रसिक वृत्तीचे होते. त्यांचें घर तिमजली, पण अगदी साध्यासुध्या बांधणीचें होतें आणि त्याचें नांव 'शांतिकुंज' असें ठेवलेलें असून तशी पाटी घरासमोर उभें राहातांच दृष्टीस पडे. घराच्या दरवाजावर "सुस्वागतम्"चें तोरण होतें. या सुस्वागतम्-खालून घरांत शिरल्यावर डाव्या बाजूस जिना लागे आणि तेथे "या जिन्याने वर जावें" अशी सूचक पाटी होती. त्या सूचनेप्रमाणे त्या जिन्याने वर गेल्यावर दाराच्या फळीवर "पादत्राणें येथे ठेवावींत" ही पाटी वाचून पादत्राणें काढूं लागावें तों खाली "यावें, बसावें"

अशीं विनंतीवजा वाक्यें दिसत. माडीच्या भिंतींवरील तसबिरा व रविवर्म्याच्या चित्रांखाली छापील सुभाषितें, " सत्य सदा बोलावें " वगैरेंसारखीं चिकटविलेलीं असून भिंतीवर पूर्व, पश्चिम वगैरे दिशा लिहून ठेवल्या होत्या. आंतल्या बाजूला अन्नपूर्णागृह असल्याचें पाटीवरून कळे. वाड्यांत मोडक्यापडक्या खोलीचें स्नानमंदिर केलें असून त्यांतील एका फळीवर गोवऱ्यांची राखुडी ठेवलेली असून त्या फळीवरच " दंतधावनचूर्ण " असें लिहिलें होतें. मागल्या बाजूला बाग होती. तिला एखादें नांव होतें की काय आठवत नाही ! केवढा हा कल्पनाविलास !

बाबांचे एक अतिशय विद्वान् साहित्यिक मित्र होते. ते लग्नांतील सर्व समारंभांना हजर होते. वरपक्षीयांनी लग्नानंतर आमच्या मंडळींना अल्पाहार दिला त्यालाहि ते आले होते.

दिवाणखान्यांत अल्पाहार आटपून पान खात असतां हे साहित्यिक उठले आणि त्यांनी रस्त्याकडील खिडकीजवळ जाऊन भिंतींवर इकडेतिकडे मुद्दाम बघितलें. नंतर खिडकींतून डोकें बाहेर काढून ते खिडकीच्या चारी बाजूंच्या भिंतींकडे बघू लागले. तेव्हा त्या जहागिरदारांनी " काय पाहातां ? " म्हणून साहजिकच प्रश्न केला.

यावर त्या साहित्यिकांनी उत्तर दिलें, " नाही, कांही नाही. मला थुंकायचं होतं, तेव्हा ' इकडून थुकूं नये ' अशी कांही पाटीबिटी आहे की काय तें बघत होतों मी. "

याप्रमाणे लग्नसमारंभ मोठ्या मजेंत पार पडला.

लग्न लागल्या वेळेपासून काकू मात्र अर्धशिशी दुखते म्हणून कोठींत जाऊन पडली. जेवणावळीच्या बोलावण्यालाहि ती गेली नाही आणि कांही कामाधामालाहि लागली नाही.

लग्नानंतर तर काय, मी आनंदाच्या शिखरावर चढलें ! उत्तम स्थळ मिळून लग्नाची हौस तर भागलीच; पण शिक्षणहि पुढे चालू ठेवायचें असें माझ्या पतींनी म्हणजे आनंदरावांनी सांगितलें. पुन्हा पुण्याला माहेरीं राहून पहिल्याप्रमाणेच सर्व कांही व्यवस्थित व्हावयाचें, मग मला आनंद कां होणार नाही ?

पुढील वर्षी मे महिन्याच्या सुट्टींत आणि दिवाळीच्या सुट्टींत काय ती मी सासरीं गेलें.

माझी शिक्षणाची व्यवस्था कांही सहजासहजीं झालेली नव्हती. आनंदरावांचे आपल्या वडिलांशीं या बाबतींत कडाक्याचे वादविवाद झाले होते. मला शाळेंतून काढून टाकावें म्हणून मामंजीचे आटो-काट प्रयत्न चालू होते. आईबाबांनाहि त्यांनी पत्रें लिहून तुम्ही आनंदरावाना अयोग्य सल्ला देत आहां असें ध्वनित करण्यास कमी केलें नाही.

बाबांनी त्यांना कळवलं की " आम्हीं आनंदरावांना कांहीहि सांगितलेलं नाही. ते स्वखुषीनंच सुमतीला शिकविण्याला तयार आहेत. सुमतीचं शिक्षण पुढं चालू राहिलं तर त्यांत आम्हांला आनंदच आहे. आनंदराव सागतील त्याप्रमाणंच वागण्याशिवाय आम्हांला गत्यंतर नाही. त्यांनी इच्छा दर्शविली तर ताबडतोब आम्ही मुलीला सासरीं पाठविण्यास तयार आहों."

शेवटीं आनंदरावांनी आपलेंच म्हणणें खरें केलें. त्यांच्या वडि-लांनी कशीतरी पण संमति दिली.

आठपंधरा दिवसांनी आनंदराव पुण्याला येत. माझे पति म्हणून ते माझ्या आप्तांना प्रेमविषय झालेच होते. त्यांतच त्यांची बुद्धिमत्ता आणि रसिकपणा यांची भर पडली. आई, बाबा आणि काका या तिघां-नाहि आनंदरावांचं कसें कोडकौतुक करावें एवढाच जणू ते आले की विचार असे.

आनंदरावांना याबद्दल फार कृतज्ञता वाटे. आईवर त्यांची विशे-षच भक्ति बसली होती. आईचें आणि त्यांचं माझ्यावरून नेहमी बोलणें होई.

आनंदराव म्हणत, " तुम्ही सर्व मंडळी माझ्यावर किती प्रेम करतां! माझे हे दोन दिवस फार फार मजेंत जातात "

आई म्हणे, " पण एरवी तुम्ही असे हे एकटे एकटे मुंबईला राहातां हें नाही आम्हां दोघांना पसंत. तुम्ही सुमतीला मुंबईला न्या आणि तिथंच शाळेंत घाला."

" आई, तुमची सुमति प्रेमाच्या साम्राज्यांत वाढलेली, तुम्ही सगळी मंडळी एकमेकांवर इतकं प्रेम करतां, की मला आश्चर्यच वाटतं. अशा परिस्थितींत राहाणाऱ्या सुमतीला आमच्या घरीं न्यावं असं मला वाटतच नाही. आमच्या घरचं वातावरण अतिशय रुक्ष आहे. तुमचं घर नंदनवन आहे, तर आमचं घर सहारा वाळवंट आहे." यानंतर आनंदराव हसून म्हणत, " त्यांतून तुमची मुलगी तुम्हांला जड वाटत असली तर सांगा. मी तिला घेऊन जातो "

" आमची मुलगी आम्हांला जन्मभरसुद्धा जड व्हायची नाही. पण तुमच्याकरिता आम्हांला वाटतं. तुम्ही एकटे असे किती वर्ष राहाणार ? तुमचं घर तुम्ही सहारा वाळवंट म्हणता; मग तिथं राहून तुमची मनःस्थिति नाही का बिघडणार ?"

आनंदराव थट्टेने बोलत, " आई, या मगळयाला आता एकच उपाय दिसतो आहे. तुम्हीच सर्व मंडळी मुंबईला या ना. म्हणजे मग आपण सर्वच एकत्र राहूं. तुमच्या घरच्या प्रेमळ वातावरणात मला सुद्धा नेहमी राहायला मिळेल."



## प्रकरण ७ वें

आमचें घर म्हणजे त्या वेळीं खरोखरीच नंदनवनासारखें आनंदाने फुललेलें असायचें. आईबाबांची संसारयात्रा इतकी लांब झाली तरी आम्हींसुद्धा त्यांना भांडतांना कधींहि पाहिलेलें नाही. त्यांच्यासारखें एकनिष्ठ आदर्श प्रेम क्वचितच पाह्यला मिळतें.

बाबांची निवडक मित्रमंडळी जमली की राजकीय आणि साहित्य-विषयक चर्चा चाले. आईने नात्याचीं माणसें जशीं जोडलीं होतीं तशीच इतरहि ओळखपाळख पुष्कळ होती. ही मंडळी आमच्या घरीं आली किंवा आम्ही त्यांच्या घरी कारणपरत्वें गेलों, की बायकी सामाजिक गप्पाष्टकांना ऊत येई. घरीं धर्मकार्य, सणवार वगैरे यथाशास्त्र चाले. नात्यागोत्याचीं माणसें आमच्याकडे जेवायला येत त्याप्रमाणे आम्हीहि त्यांच्याकडे जात असूं.

आम्ही सर्व उत्सवप्रिय असल्यामुळे सणवार आम्ही फार हौसेने करीत असूं. नात्याची मंडळी जेवायला आली की सकाळपासून संध्याकाळपर्यंत हास्यविनोदांत काळ जाई. विणकाम, शिवणकाम, स्वयंपाकपाणी या सर्व गोष्टींत आई प्रवीण होती. प्रत्येक कामांत काका तिला मदत करीत. कॅनव्हास हातीं धरून त्यावर टाके घालण्यापासून तों करंज्या-कडबोळीं करण्यापर्यंत काकांची तयारी असे. आई आणि काका नवीननवीन कल्पना काढून कलाकुसरीचे जिन्नस बनविण्यांत दंग असत. पूर्वी सिगारेटच्या पेट्यांत लहानलहान चित्रें असत. एकेका पेटींत एकेक चित्र असे. त्या चित्रांचा पडदा करण्याचें आईच्या मनांत आलें, त्या वेळी बाबांना मुबईला नोकरी होती. मनांत येतांच काकांनी मुबईच्या प्रत्येक हॉटेलांत जाऊन तीं कार्डें विकत मिळण्याची व्यवस्था केली. नंतर जसजशीं कार्डें मिळतील तसतसा पडदा काकांच्या मदतीने आईने तयार केला सबंध दाराला पुरेल इतका तो मोठा होता. मी या वेळी फक्त चार वर्षांची असल्यामुळे हातीं लागला की दगडी मोती चघळून गिळायचा येवढेंच काम करीत असें. माझ्या-

पासून दगडी मोत्यांचे आणि दगडी मोत्यांपासून माझें रक्षण करण्याचें त्या दोघांना मोठेंच काम पडे.

काकांचा स्वभाव अतिशय बोलका आणि विनोदी. कांहीतरी विदूषकासारखें वागून किंवा कांहीतरी बोलून ते सारखे हसवीत

बाबांच्याहि डोक्यांत नवीन कल्पना सदैव स्फुरत. घरांत नव्या फॅशनच्या सर्व सुखसोयी करण्याकरिता त्यांचे प्रयत्न चालत. जुन्या बाजारांत बुधवारीं, रविवारीं फेरी घालून कांहीतरी दोनचार पैशांची खरेदी बाबा करून येत.

नंतर या कित्येक बाजारांच्या दिवशीं जमवलेल्या जिनसांच्या सहाय्याने ते एखादा जिन्नस तयार करीत. अर्थात् तो जिन्नस कितीहि उपयुक्त असला तरी साळ्याची गाय अन् माळ्याचें वासरूं असा तो दिसण्यांत ओबडधोबड व विचित्र दिसे. तो जिन्नस बघून केव्हाकेव्हा आम्हां सर्वांची हसूनहसून पुरेवाट होई. पण बाबा आमच्यावर त्याबद्दल रागावत नसत, तर उलट तेहि हसूं लागत परंतु त्या जिनसाचा कंटाळा येईपर्यंत उपयोग मात्र करीत. त्यांनी बनवलेली वस्तु लगेच टाकून कधी दिली नाही. मग कंटाळा आला की ती तिसऱ्या मजल्यावरील अडगळींत जायची.

अशाच जुन्या बाजारांत घेतलेल्या वस्तूंचा बाबांनी एका उंच खिडकीकरिता सरकपडदा तयार केला. तो सरकविण्याकरिता हात पोचत नसे. म्हणून त्यांनी युक्ति केली होती. एका बाजूची दोरी ओढली की तो पडदा बंद होई व दुसऱ्या बाजूची ओढली की खिडकीवरून तो बाजूला सरकत असे. या युक्तीचें नांव बाबांच्या एका मित्राने ‘ तगारीची पुगारी ’ असें ठेवलें होतें आणि आम्ही मंडळी त्याच नांवाने त्या पडद्याबद्दल उल्लेख करीत असूं. ही तगारीची पुगारी सतरा वेळां बिघडे. दोरी ओढतांना मधल्यामधेच कुठे ती अडकून बसेल याचा नेम नसे आणि शेवटीं स्टुलावर चढून पडदा सरकवावा लागे!

एकदा पडदा सरकेना, तेव्हा काका चिडले. ते तिरसटपणाने बाबांना म्हणाले, “ असलं हें कांहीतरी दरिद्री तुम्ही करून ठेवतां त्यापेक्षा दोनचार रुपये खर्चून पडदा विकत कां घेत नाही ? ”

बाबांचं तोंड उतरून गेलें ते काहीहि बोलले नाहीत.

पण आईने उत्तर दिलें, "आम्हांला नाही कांही विकत घ्यायचं. तुम्हांला आवडत नसला तो पडदा तर तुम्ही त्याला हातच लावू नका."

"असल्या बोलण्यांत काय अर्थ आहे!" असें पुटपुटत मग काका आपल्या माडीत निघून गेले.

मला आणि भाऊला काकांच्या अशा वागण्याचा राग येई. पण आम्ही गप्प बसत असूं.

बाबांनी आणखी एक छंद केला.

आमच्या तिसऱ्या मजल्यावर वर्तमानपत्रांची रद्दी पुष्कळ साचली होती. हल्लीप्रमाणे त्या वेळीं रद्दी विकण्याची सोय नसे. मातीच्या जमिनीमुळे सतरंजी मळून जाई व सतरंजीवर चालून जमीनहि भराभर उकरत असे.

मग बाबांनी जुनी वर्तमानपत्रें एकाला एक चिकटवून चांगली पंधरावीस फूट लांब आणि दहाबारा फूट रुंद अशी कागदाची सतरंजी तयार केली. कित्येक वर्षें या सतरंजीचा छंद त्यांना लागला होता. असो.

भाऊ मोठा सुस्वभावी आणि कोमल अंतःकरणाचा. मी, बाबा आणि आई आम्हां तिघांवर त्याचें इतकें प्रेम होतं, की वेळप्रसंगीं जिवाला जीव द्यायला तो कमी करणार नाही. पण त्याच्या भोळेपणाचा फायदा उनाड मुलें नेहमी घेत याबद्दल आईबाबांना थोडी काळजी वाटे. पण भाऊच्या बुद्धिमत्तेपुढे आणि हसऱ्या स्वभावापुढे ती काळजी टिकाव धरीत नसे.

बाबांची मी जास्त लाडकी होतें तर आईचा भाऊ जास्त लाडका होता.

काकांचें मात्र फक्त माझ्यावर प्रेम असे. भाऊचा ते लहानपणापासून राग करीत. आता त्यांच्या प्रेमाला काकू आणि त्यांचा मुलगा वसंत हे अर्थातच वांटेकरी झाले होते.

वसंतावर आम्हां घरांतल्या सर्वच माणसांचा जीव की प्राण होता.

काकू अलीकडे मला जरा "श्रीमंतीणबाई, यजमान अगदी मुठींत आहेत, तुमची अगदी मजा आहे, सासरी जायला नको, काम नको," असें कांहीतरी मधूनमधून हिणवीत असे. पण मी तिकडे फारसें लक्ष देत नसे.

मी विश्वासाने बोललेल्या गोष्टी काकूने दुसऱ्या बायकांना सांगितल्याचा संशय आल्यावरून मी तिच्याशी पूर्वीप्रमाणे मनमोकळेपणाने बोलत नसे. याबद्दल तिला वैषम्य वाटे; पण ती एकंदरीत माझ्याशीं बरी वागत असे.

मैत्रिणींचीहि मला कधीच वाण नसे. माझी एक नवीनच मैत्रीण झाली होती. तिचें नांव अनसूया असें असून आई एवढीच तिची नात्याची अशी होती.

पतिनिधनानंतर चरितार्थाला साधन नसल्यामुळे अनसूयेची आई गंगाबाई हिने लहानशी खाणावळ चालवली होती. सोवळी झालेली परंतु तरुण आणि सुंदर अशी ही बाई खाणावळीचा धंदा करीत असल्यामुळे तिच्याबद्दल आणि तिच्या मुलीबद्दल नाना प्रकारच्या वाईटसाईट बातम्या लोक उठवीत.

या मुलीशीं माझी मैत्री झाली तेव्हा आईकडे कांहीजणींनी मुद्दाम येऊन सांगितलें, " अनसूयेबरोबर तुम्ही सुमतीला मैत्री ठेवू देऊं नका. त्या मायलेकी अशा अशा प्रकारच्या आहेत."

आईने सगळ्यांना सांगितलें, " ती पोटापाण्याचा धंदा करते, यात वाईट तें काय आहे ? बरं, ती तरुण असल्यामुळं आणि पाठीमागं कुणी त्राता नसल्यामुळं लोक वाटेल तें बोलतात त्याला त्या बिचारीनं काय करावं ? आणि सुमतीबद्दल माझी इतकी खात्री आहे, की ती कुणी शिकवून कधीहि बिघडायची नाही. उलट ती वाइटाला सुधारील मग मी तिला अमुक मैत्रीण कर अन् अमुक करूं नको असं कशाला सांगूं ? पुन्हा ती अनसूयेच्या घरीं फारशी जात नाही, अनसूयाच आमच्या घरं येते. अन् ती मुलगी मला चांगली वाटते."

आईने त्या लोकांना परस्परच अशी उत्तरें दिली; पण मला मात्र लोक असें म्हणताहेत आणि मी त्याना अशी उत्तरें देतें असें आईने सांगितलें.

याचा तिच्या अपेक्षेप्रमाणे इष्ट तोच परिणाम झाला. आईने माझ्याबद्दल इतका विश्वास दाखविला याबद्दल मला धन्यता तर वाटलीच आणि आईबद्दल प्रेमादर दुणावला आणि शिवाय अनसूयेच्या दुर्दैवी परिस्थितीबद्दल माझ्या मनात सहानुभूतीहि उत्पन्न झाली.

माझ्या मैत्रीमुळे अनसूयेचा फार फायदा झाला. माझ्याबद्दल गंगाबाई आणि अनसूया दोघींनाहि फार आदर वाटे. माझ्या मैत्रीबद्दल त्यांना अभिमान वाटे. माझ्याबरोबर मी अनसूयेला सगळीकडे नेत असे, यामुळे चांगल्या ओळखी होऊन माझी मैत्रीण म्हणून लोक तिलाहि चांगली वागणूक देऊं लागले.

आमच्या आईने अतिशय खटपट केल्यामुळेच पुढे अनसूयेला उत्तम, सुशिक्षित व श्रीमंत स्थळ मिळालें. आमच्या शब्दाखातर मुलाने तिला पतकरली. त्याबद्दल त्या मुलाला कधीहि पश्चात्ताप करावा लागला नाही. अनसूया एक सुगृहिणी झाली.

माझ्या भोवतालची परिस्थिति याप्रमाणे अत्यंत गोड होती. सर्वांनी माझें कौतुक करावें आणि मी सर्वांना मधुर स्वभावाने आकर्षून घ्यावें असं माझें जीवन चाललें होतं.

अशा प्रेमळ वातावरणांत आपणहि राहावें असं आनंदरावांना वाटणं साहजिक होतं आणि आनंदरावानी एकटं राहूं नये असं आईबाबांना वाटणेंहि साहजिकच होतं.

आनंदराव मला म्हणत, " सुमति, इथून मुंबईला जायचं म्हणजे मला असं जड वाटतं की जसा काही मी सासरी जातो आहे. "

आनंदराव वरचेवर पुण्याला येत, पण ते मुंबईला परत निघाले की प्रत्येक वेळेला सर्वांना वाईट वाटे.

माझ्याहि मनाची चलबिचल होई. माझें मन दोहींकडे ओढ घेई. शिक्षणाची हौस वाटत असून बरोबरीच्या इतर मुलींना संसारांत दंग

होऊन गेलेल्या पाहिल्या की आपणहि त्यांच्यासारखा संसार करावा' आदर्श पत्नी आणि गृहिणी होऊन दाखवावें अशी इच्छा होई. आनंदरावांच्या नित्य सहवासाची ओढ लागे. बरं, शिक्षणांतहि एकतानता होत नसे कारण शिवामुठी, मंगळागौरी, वटपूजा असले प्रकार चालतच असत. पण सासरी जाण्याला मनाची तयारी नव्हती. शाळा सोडणें म्हणजे मोठें कठीण काम होतें. मीं शिकावें असं वाटत असूनहि त्यांना केव्हाकेव्हा एकट्याने मुबईला जातांना उद्वेग येई. त्या भरांत ते मला म्हणत, "सुमति, मी तुझ्याकरिता केवढा स्वार्थत्याग करतों याची तुला कल्पना नाही!"

मला खरोखरच त्यांच्या स्वार्थत्यागाची पुरती कल्पना नव्हती. मी म्हणे, "मग मी येऊं का बरोबर? पुरे झालं आता शिकणं. नाहीतर आई म्हणते तशी मी मुबईलाच शाळेंत जाईन."

"छे, छेः! तूं दूर आहेस तेंच ठीक आहे. तूं नेहमी जवळ राहायला आलीस म्हणजे तुझ्या शिक्षणांत व्यत्यय येईल. तुला बी. ए.-पर्यंत शिकवायचं माझ्या मनांत आहे. निदान मॅट्रिक तरी तुला झालंच पाहिजे."

आनंदराव माझ्यापेक्षा वयाने बरेच मोठे होते त्यांचें वय सव्वीस वर्षांचें होतं. प्रथम पत्नीच्या निधनामुळे आनंदरावांना दुःखाची ओळख झाली होती. ते स्वभावाने गंभीर बनलेले होते. कधी-कधी ते उदास होत तें माझ्या मनाला लागत असे. मीं कारण विचारलें म्हणजे ते म्हणत,

"सुमति, तूं लहान आहेस. तुला माझं दुःख सांगून समजायचं नाही."

"अजून आठवण होते का?" असं एके दिवशीं मीं विचारलें.

तेव्हा आनंदरावांनी उत्तर दिलें, "सुमति, माझं तुझ्यावर इतकं प्रेम आहे! तुझा स्वभाव अतिशय गोड आहे. कुणींहि प्रेम करावं असा तुझा स्वभाव आहे. तूं लहान असून तुझ्या वागण्याबोलण्यांत समंजसपणा आहे. तूं मला मिळालीस आणि तूं माझ्यावर प्रेम करतेस याबद्दल मला फार धन्यता वाटते. पण इतकं असूनहि मला कधीकधी

असं उदास कां वाटतं तें माझं मलाच समजत नाही तर मी तुला काय सांगू ? मी एक ध्येयवादी मनुष्य आहें. कोण जाणे माझं आयुष्य कसं जाणार आहे ! तुला तें कांही समजणार नाही. ”

नंतर मी आनंदरावांना मधूनच होणाऱ्या त्यांच्या उदास वृत्तीबद्दल विचारीनाशी झालें. पण मनाला हुरहुर वाटे. आनंदरावांना फार उदास वाटत असलें की ते व्हायोलिन वाजवीत बसत. ते आनंदांत असले म्हणजे मला बरोबर गायला सांगत. बरोबर फिरायला जावें असें त्यांना वाटे; पण मला धीर होत नसे. लोक नांवें ठेवतील म्हणून मला भीति पडे. मी ‘नाहीं’ म्हटलें तरी आनंदराव माझ्यावर कधीहि रागावत नसत.

आनंदरावांच्यावरील प्रेमामुळे आईबाबांनी त्यांचे थट्टेचे शब्द मूर्त स्वरूपांत आणण्याचा विचार केला.

बाबांनी खटपट करून मुबईला एका खासगी शाळेंत नोकरी मिळविली. मुबईला भाड्याने ब्लॉकहि मिळविला चार दिवसांनी काका-काकू खेरीजकरून सर्वांनी मुबईला जावयाचें असें ठरलें. उत्साहभरांत सर्व निघण्याची तयारी चालविली होती. बाबांनी पुण्याच्या शाळेचा राजीनामा देऊन वर्गहि बंद केले.

माझी शाळा, माझ्या आवडत्या मास्तरीणबाई आणि मैत्रिणी यांना सोडून परक्या शाळेंत जावयाचें म्हणून मनाला अत्यंत वाईट वाटत होतें.

पण आनंदरावांचा प्रेमळ सहवास मला मुबईला लाभणार होता. नवीन जीवनाबद्दल मला एक प्रकारची उत्कंठाहि वाटत होती.

दोन दिवसांपूर्वीच आनंदराव पुण्याला येऊन गेले होते. तेव्हा पहाटेपर्यंत आनंदाच्या भरांत आमचे पुढील बेत चालले होते. वेळ कसा गेला तें आम्हांला कळलें नाही.

कोण तो अत्यांनद ! कोण तो पुढील मनोराज्याचा कल्पनाविलास ! परस्पर सहवासाची केवढी ती मनोरम, तीव्र आतुरता !

पण मनुष्य अत्युच्च शिखरावर पोचतो तोच क्षण त्याच्या वैभवाचा शेवटचा क्षण असतो. तेथून खाली उतरणें त्याला प्राप्तच असतें.

माझ्या दुर्दैवाने सौख्यशिखरावरून माझा पुरता कडेलोट करून टाकला. मधेआधे कुठेहि थारा न देतां निर्दयपणें त्याने मला दुःखाच्या दरींत लोटून दिलें.

आनंदराव मुंबईला गेल्यावर दोनच दिवसांनी मुंबईची तार आली, की ऑफिसमधे जात असतां सूर्यतापामुळे आनंदराव आजारी होऊन कसेबसे घरीं पोचले. नंतर चारपांच तासांत त्यांचा अंत झाला !

आईबाबांना असह्य धक्का बसला. माझ्या दुर्भाग्याची खरी जाणीव मला नव्हती, पण त्यांना होती. समाजाच्या दृष्टीने माझी काय अवस्था झाली होती आणि माझा जन्म कसा जायचा याचा भेसूर चित्रपट अग्निज्वाळांप्रमाणे त्यांच्या डोळ्यांसमोर नाचत होता !

लहानपणीं माझी जोडपाटी फुटली. तिचा पुरता एक दिवसहि मीं उपभोग घेतला नाही ! आता माझें कपाळ फुटलें ! एक वर्ष होतें तोंच माझें सौभाग्य संपलें !



## प्रकरण ८ वें

पुढील दोन महिन्यांत समाचाराला येणाऱ्या लोकांची आमच्या घरीं गर्दी असे. आमच्या नात्यांतील बायका दिवसभर आईच्या भोवती असत. शिवाय ओळखीपाळखीच्या बायका येऊन थोडा वेळ बसून जात. प्रत्येक वेळीं मला समोर बोलावून दुःखप्रदर्शन हें होईच. आई सारखी रडे; पण मला रडू येत नसे. मला कसेंसेंच होऊन जाई !

दुःखी घर म्हणजे स्मशानाचें धाकटें भावंड रात्रीं स्मशानांत वावरतांना आपल्या सभोवती भुतंखेतं वावरत आहेत या कल्पनेने मनुष्याचा जीव कासावीस होतो. दुःखी घरांत पिशाच्चाप्रमाणे अवकळा पसरत असते. दुःखभावना भुताप्रमाणे मनाला भेडसावतात.

काय करावें, हेंच कुणाला सुचत नसे. मी माडींत आलें की बाबा वर मान म्हणून करीत नसत ! माझ्या कपाळाकडे बघण्याची त्यांच्या मनाला शक्ति नव्हती !

एके दिवशीं एक बाई समाचाराला आली. ही पुनर्विवाहित असून त्या कार्याला हातभार लावणाऱ्यांपैकी होती. ती सरळ आई-बाबांना म्हणाली, " अहो, तुम्ही असे रडत काय बसलांत ? तुम्ही तर उलट आनंद मानायला हवा की समाजसुधारणेची ही एक सुवर्णसंधि तुमच्याकडे चालून आली आहे ! तुमच्या मुलीचा तुम्ही पुनर्विवाह करून समाजाला उदाहरण घालून द्या."

ऐकणारी मंडळी या बोलण्याने थक्क होऊन गेली.

आईने उत्तर दिलें, " अहो, त्या सगळया पुढल्या गोष्टी झाल्या; पण आनंदरावांच्यासारखा बुद्धिमान तरुण गेला याबद्दल दुःख नाही का होणार ? माणसापेक्षा का समाजसेवेला किंमत आहे ? "

बाबांनी पूर्वी नोकरीवर असतां, गावोगावीं बदली होई तेथे आपल्या ओजस्वी वाणीने विधवांवर होणारे सामाजिक जुलूम, घर-गुती छळ आणि त्यांची आर्थिक हलाखी यांवर व्याख्यानें दिली होतीं आणि आता प्रत्यक्ष त्यांच्या मुलीवरच वैधव्यावस्था कोसळली होती.

विधवांच्या दुःस्थितीबद्दल त्यांचे पुन्हा विचार चालू झाले. त्यांच्या मनांत कल्पना आली, की सुमतीनें कुंकू लावण्यास काय हरकत आहे? ही विधवा आहे असें समाजाने ओळखून काय करायचें? स्त्रीच्या अनाथपणाची, दौर्बल्याची अशा रीतीने समाजाला जाणीव करून दिल्यानेच अनर्थ कोसळतात लोक नेमके विधवेला उपद्रव देतात कुंकू लावण्याने विधवांच्या स्थितीत पुष्कळच सुधारणा होईल खास त्याचप्रमाणे धार्मिक व मंगल समारंभातहि विधवांना भाग घेऊं द्यावा असें त्याचें म्हणणें होतें

भेटायला येणाऱ्या मंडळीबरोबर आई आणि बाबा याच विषयावर चर्चा करूं लागले.

बहुतेक पुरुष या प्रश्नाला अनुकूल अभिप्राय देत. तुम्ही मुलीला जरूर कुंकू लावायला सांगा, असें त्यांनी प्रोत्साहन दिलें.

आईहि या मतप्रसारांत गुंतली पुण्यातील सुशिक्षित स्त्रियांच्या घरी देखील ती गेली. आईचें म्हणणें असें होतें, की दहा बायकांनी बरोबर कुंकू लावण्याची प्रथा पाडावी म्हणजे कुणाला फारसा त्रास होणार नाही पण कोणीहि बायका कबूल झाल्या नाहीत. त्या म्हणत "तुमच्या मुलीला कुंकू लावू द्या"

कांहीजणी म्हणाल्या, "प्रत्येक देशांत वैधव्यसूचक कांही ना कांही गोष्ट करतात पारशी, युरोपिअन या समाजांतसुद्धा विधवेला काळा पोषाख किंवा फीत बांधणं अशी कांही खूण कांही दिवस कां होईना, पण ठेवावी लागते. मग आपल्यांतल्या या चालीलाच नांवं कां ठेवायची?"

आईने त्यांना सांगितलें, "इतर जातींत चाल आहे म्हणूनच का ती आपण चालू ठेवायची? ती चाल वाईट आहे हें आपल्याला पटत असतांना ती चाल समाजांतून घालवायला नको का?"

पण नाही.

मे महिन्याची सुट्टी संपून शाळा लवकरच सुरू व्हावयाच्या होत्या. आमच्यावरील दुःखप्रसंगाला आता दोन महिने झाले होते. मी पण शाळेंत जाऊं लागणार होतें.

आई एके दिवशी माझ्याकडे करंडा घेऊन आली आणि म्हणाली, " सुमति, तूं कुंकू लावावंस अशी आमची इच्छा आहे. "

घरामध्ये कुंकवाबद्दल चाललेले वादविवाद मी ऐकतच होतें. कुंकू लावण्याविषयी माझे मतहि अनुकूल होतेंच. पण मी भीत होतें.

मी आईला म्हटलें, " आई, माझ्याबरोबर दुसऱ्या चार बायका येणार असत्या तर कुंकू लावण्याची माझी तयारी आहे पण माझ्या-बरोबर कुणी नाहीतच, पण मागूनसुद्धा कुणी येणार नाहीत तूं सर्व बायकांच्याकडे जाऊन आलीस त्याचा काय फायदा झाला? मी एक-टीनं कुंकू लावलं म्हणजे लोकांची काकदृष्टि मात्र माझ्या एकटीकडे लागेल. ही कुंकू लावते म्हणून सगळं पुणं माझ्याकडे बोट दाखवील. कुंकू न लावण्यापेक्षा कुंकू लावूनच मला जास्त त्राम होईल "

" पण अशी ही चांगली चाल पाडायची तर कुणीतरी त्रास सोसला पाहिजे "

" मला काही तितकं धैर्य नाही अन् कुंकू लावण्यानं इतर परि-स्थिति का बदलणार आहे? कुंकवानं मुखात का भर पडणार आहे? "

मी कुंकू लावण्याला तयार झालें नाही ज्या समाजाने मला कुरवाळलें होतें त्या समाजाच्या मनाप्रमाणे वागले की आपल्याला कोण काय करणार? पुणं माझ्याच बाजूचं आहे अशी माझी भावना होती.

पुढल्या गोष्टी जर मला कळल्या असत्या तर कुंकवाची टिक-लीच काय, पण कपाळभर मळवट भरून मी गावांत मिरवलें असतें!

आईबाबाचा पाठिंबा असताना मी त्याचं म्हणणं अमान्य करून भित्रेपणाने समाजदेवतेच्या कुशीत तोंड लपवलें

मी शाळेंत जायला निघालें त्या दिवशी मी प्रथमच घराबाहेर पडणार होतें. मला कांही वेगळेंच वाटत होतें आपल्यात काहीतरी अंतर्बाह्य बदल झालेला आहे, समाजांतून आपलं स्थान घसरलें आहे याची जाणीव गेल्या दोन महिन्यांत घरी येणाऱ्या लोकानी दाखवि-लेली सहानुभूति, दया या भावनावरून माझ्या मनावर बिंबत चालली होती. पूर्वीप्रमाणे स्वस्थ मनाने आता मला रस्त्यांतून चालतां येईना.

घाईघाई करून एकदाचें लोकांच्या दृष्टीआड व्हावें असें मला होऊन गेलें.

शाळेंत मात्र माझें मन निर्धास्त झालें. माझ्या वर्गातल्या मुली पूर्वीसारख्याच माझ्याशी वागत होत्या झाल्या गोष्टीचा कुणाच्या तोंडून उल्लेखसुद्धा झाला नाही. माझ्या कांही मैत्रिणी मध्यंतरी माझ्याकडे येऊन मला भेटून गेल्या होत्या त्या वेळीसुद्धा शाळेंतल्या मैत्रिणीबद्दल, अभ्यासाबद्दल अशाच आम्ही बोललों होतों. आताहि शाळेंत आल्यावर घरगुती गोष्टीची आठवणहि होत नसे माझ्या वर्गातल्या मुली खरोखरच मोठ्या सुस्वभावी होत्या त्यांच्या सहवासांत मॅट्रिकपर्यंतचे माझे दिवस आनंदांत गेले

पण फार आनंदांत गेले नाहीत. कारण त्या मुलीच्यापेक्षा माझ्या परिस्थितींत वेगळेपणा आहे याची जाणीव मला नित्य असे. दुःखाची ठिणगी हळूहळू फुलत चालली होती. सहावी-सातवीत तर माझ्या मनावरील गांभीर्याची छाया वाढत चालली. मला मुली म्हणत सुद्धा की, " सुमति, तूं किती उदास असतेस नेहमी ? मागं किती हसायचीस आता मोठ्यानं तर मुळीच हसत नाहीस ! "

कां बरें मी उदास होणार नाही ? मी मूळची केवढी उत्सवप्रिय आणि आनंदी ! पण आता लग्न, मुंज, हळदीकुंकू हे समारंभ मला वर्ज झाले होते. माझ्याकरिता आईनेहि या समारंभांना जाण्याचें सोडलं. ती हळदीकुंकवालासुद्धा जाईनाशी झाली. आमच्या घरांत पुढे तीनचार वर्षं सणसुद्धा साजरे केले नाहीत आई आणि बाबा दुखाःने इतके खचून गेले !

बाबांनी पुन्हा शाळेंत नोकरी धरली. धरावीच लागली नोकरी. पूर्वीचं तें आनंदी वातावरण कुठच्या कुठेच लयाला गेलें. चेष्टा, मस्करी, हसणें, खिदळणें या गोष्टी जवळजवळ नाहीशा झाल्या. आईबाबा आपल्या माडीत आणि बाकीची आम्ही आपापल्या माडींत याप्रमाणे घरची अवस्था झाली.

आणि हें सर्व कोणामुळे ? तर माझ्यामुळे !

जेवणावर तेवढे आम्ही बोलत असूं. पण ती राजकीय किंवा सामाजिक चर्चा असायची. अवांतर गप्पागोष्टी मुळीच नसत.

आमच्याच घरी काय, पण घरोघरी तत्कालीन राजकारणाची चर्चा चालत असे. बाबांची स्नेहीमंडळी जमली की राजकारण निघायचेंच

मेथापक्ष, टिळकपक्ष, सार्वजनिक काकांची स्वदेशीची चळवळ, ताईमहाराज खटला याप्रमाणे विषय निघून पक्षोपपक्ष होऊन मंडळी जवळजवळ वर्दळीवर यायची.

आईला राजकारणाची आवड अतिशय. याशिवाय बायकांची आठवड्याची सभा तिने कधी चुकवली नाही.

पण आता आईचें लक्ष हळूहळू आध्यात्मिक विषयाकडे अधिक वळू लागलें होतें. ती रोज पुराण ऐकायला जाऊं लागली.

बाबा पक्के निरीश्वरवादी. परंतु आई पूजाअर्चा, नेमधर्म करी, तिच्याआड ते कधीहि आले नाहीत.

आईबरोबर माझ्या आत्याबाई– कुसाआत्याबाई– या जात. घरीं आल्यावर त्या पुराणातील विषयांसंबंधी चर्चा करीत.

ती चर्चा ऐकून मलाहि अध्यात्म विषयाची गोडी लागत चालली. मीं योगवासिष्ठ, ज्ञानेश्वरी हे ग्रंथ वाचून काढले. माझें इतर वाचन यामुळे फार कमी होऊन मनावरलें गांभीर्याचें दडपण फार वाढलें.

आमच्या घरांतील वातावरण बिघडवायला काकाकाकूहि कारण झालीं. आपल्या घरीं सुमतीचा कायमचा तळ पडला, तिच्या सासर-हून एक पैसाहि मिळत नाही, तिचा खर्च आपल्याच कुटुंबावर पडणार हें पाहून काकूंचा तडफडाट सुरू झाला.

काकांना आता थोडीबहुत अर्थप्राप्ति होऊं लागली होती. परंतु वसंताच्या पाठीवर दोन मुलें झाल्याने त्यांना वेगळें राहाणें शक्य नव्हतें. काकूच्या अंगांत तितका उरकहि नव्हता.

आमच्या आईच्या हाती सढळपणाने खर्चायला असा पैसा कधीच आला नाही. कशी तरी खर्चाची तोंडमिळवणी व्हायची.

पैशाची अशी ओढघस्तीची परिस्थिति असूनसुद्धा आईने संसार अशा कांही हुषारीने केला, की ओळखीपाळखीच्या बायकांनीसुद्धा अचंबा करावा. घरांत ब्राम्हण-मोलकरीण संभाळून काकाचा आणि आम्हां दोन मुलाच्या शाळा कॉलेजचा खर्च आणि कपडेलत्ते सर्व व्यवस्थित-पणं भागवून पुन्हा कधी एक पैशाचं कर्जवाम तिनं केलं नाही किंवा दुसऱ्या कुणापुढे कधी याचना केली नाही. खोट्याची कास न धरतां निवळ व्यवहारदक्षता आणि चार लोकात मिळूनमिसळून वागण्याची कला याच्या जोरावर तिने लोकात वाहवा मिळविली तिने नुसतं बोलावणं पाठवलं की नात्यातल्या व इतरहि दोनतीन बायका मदतीला येत

हें काकूला सहन होत नसे काकालाहि वाटे, की वहिनीना लोक मान देतात तसाच त्यानी माझ्याहि बायकोला द्यावा. वहिनीं-प्रमाणेच नोकरानी हिचे हुकुम पाळावे.

आमच्या घरचा गुजराती ब्राम्हण माझ्या जन्मापूर्वीपासूनच आमच्या घरीं होता. भाऊला आणि मला भरवण्यापासून त्याने कामें केली होती. काका आणि हिरालाल मित्राप्रमाणे खेळत, गप्पा-गोष्टी करीत. हिरालाल आम्हा सर्वांच्यावर अतिशय प्रेम करी

आता काकू हिरालालला मुलांचं काम सांगू लागली की तो साफ तिला सांगे, "तुमच्या मुलांचं तुम्हीच करा. तुम्हाला तरी काय काम आहे ?"

बरं, हिरालालने काकूच्या मुलांना कधीमधी बाहेर नेऊन आवडीचे जिन्नस खायला देऊन असा कांही लळा लावून ठेवला होता, की काकूला त्याला रागावणं शक्य होईना.

वसंत हिरालालबरोबर बाहेर जाण्यासाठी हट्ट धरून बसला की हिरालाल काकूला म्हणे, "मी त्याला घेऊन जातो पण मी येईपर्यंत तुम्ही स्वयंपाकाला लागलं पाहिजे."

काकूला तें कबूल करणें भाग पडे. पुन्हा काकूला स्वयंपाक धड येत नसे. स्वयंपाक करीत असतां पाटावर बसून भितीला डोकं टेकून ती झोप घ्यायची. अव्यवस्थितपणा अतोनात !

आईला या वागण्याची मोठी चीड येई. मग आई काकूला रागें भरे.

काकूला आपला अपराध समजत नसे. निरपराधी माणसाप्रमाणे ती रडे. नंतर बाहेर आईची निंदा करी. घरांत ब्राम्हण असून मलाच कामाला लावतात आणि वाटेल तसें बोलतात अशी ती चहाडया सांगे. दुसऱ्या बायकांनी उमाकाकू असें असें बोलतात असें आईला सांगितलं की द्वेषवन्हि आणखीच भडकत असे.

काकूंनी मग आणखीच एक उपाय काढला.

" आमच्या वांटणीच सगळे पैसे भाऊजी आणि जाऊबाई यांनी खाल्ले " असें काकूने सर्वत्रांना सांगायला सुरवात केली काकाहि असेंच बोलू लागले

ओळखीचे लोक त्या दोघावर विश्वास कसें ठेवणार ? प्रथम बाबांना नोकरी लागली त्या वेळी ते सोलापूरला होते. आई आणि बाबा आपल्या संसारासाठी फक्त बारा रुपये ठेवून घेऊन बाकीचे पैसे आपल्या भावंडांच्या चरितार्थासाठी व शिक्षणासाठी पुण्याला आजीबाईच्याकडे पाठवून देत. कित्येक वर्षे हा त्यांचा नियम होता. घराच्या डागडुजीला बाबांनी कितीतरी पदरचा पैसा खर्चला ! त्यानंतर काकांचा प्रतिपाल लहानपणापासूनच करून आपल्या स्वतःच्या मुलाप्रमाणे त्यांचा विद्याभ्यास करून त्याना मार्गाला लावलें होतें

एके दिवशी काकांचे एक वकील स्नेही आमच्या घरी आले. श्रीधरपंत असें असें म्हणताहेत, तेव्हा खरेंखोटें काय आहे, असें ते विचारूं लागले.

आईने घरासंबंधी सर्व कागदपत्र आणि पहिल्यापासून पैसे पाठविलेल्या मनिऑर्डरींच्या पावत्या त्या वकिलांपुढे टाकल्या. त्या पाहून झाल्यावर आईने काकांचा प्रतिपाल कसा केला ती सर्व माहिती सांगितली.

ही हकीकत ऐकून व प्रत्यक्ष पुरावा पाहून ते वकील अगदी विस्मयचकित होऊन गेले. " काय हा कृतघ्नपणा ! " असे उद्‌गार काढून नंतर " आम्हा अनोळखी माणसांना काय माहीत ? श्रीधरपंतांनी सांगितलं तेंच आम्हाला खरं वाटलं. तुम्ही दोघं सज्जन म्हणून त्यांना घरांत राहूं देतां. मी नसतं माझ्या असल्या भावाला घरांत राहूं दिलं. " इतकें बोलून ते वकील निघून गेले.

आईने काकांची चांगली हजेरी घेतली. तेव्हा शेवटी डोळ्यांना पाणी आणून– " चुकलों. पुन्हा असं होणार नाही. अमक्या माणसानं तुझे पैसे भावानं खाल्ले असं माझ्या मनात भरवून दिलं, तें मला खर वाटलं, म्हणून मी बोललों. " अशी त्यानी मखलाशी केली.

पुन्हा असल्या गोष्टी काकांनी कुणाला सांगितल्या नाहीत.

पण आईबाबांच्या मनाला फार मोठा धक्का बसला. आपल्या मुलाप्रमाणे ज्याला आपण वाढविलें त्याने आपली अशी नाचक्की गावभर करावी हें किती दुष्टपणाचें !

लग्न होईपर्यंत काका किती चांगले वागत. आता ते असे बद-लले तरी कसे ?

पण काकूचा वरील डाव हुकला तरी तिचें माझ्या बाबतींत खवचट वागणें चालूच होतें.

काकू काम करूं लागली की दोन्ही लहान मुलें माझ्याकडे संभाळण्यासाठी आणून देई. धाकटी मुलगी नलू इतकी रडवी होती, की तिला रडूं न देण्यांतच माझा वेळ जाई. बाहेर नेली तरी ती रडण्याची थांबत नसे. मग अभ्यास नाही, वाचन नाही किंवा कांही– नाही अशी माझी अवस्था होई. नुसतीं पानें मांडावीं लागलीं तरी काकू मला मुलें संभाळायला लावून सर्व कामाचें उट्टें काढी. ही गोष्ट आईच्या लक्षांत आली तरी ती बोलणार कशी ?

काकू माझा छळ गुप्तपणें करी. आईला देखील त्या गोष्टी समजत नसत. मला मुकाट्याने त्रास भोगावा लागे.

मला सकाळीं लवकर स्नानाची सवय होती. स्नान केल्यावांचून मला चैन पडत नसे आणि अभ्यास होत नसे.

काकूने आता असा उपक्रम सुरू केला, की मी स्नानासाठी येऊं लागलें, माझे पाय जिन्यावर वाजले, की ती धाकट्या नलूला घेऊन न्हाणीवर जाऊन बसे आणि तिला तेल लावायला सुरवात करी. मग त्या मुलीचं न्हाणें, दुसऱ्या दोन मुलांची आणि काकूची आंघोळ होऊन बंबांत पाणी तापलें म्हणजे मग मला आंघोळीला जागा मिळायची! मी लवकर उठलें तरीहि काकू माझी वेळ साधी आणि मी अर्धा तास उशीर केला तरी नलूला तेल लावण्यापासून त्या सर्वांची स्नानं आटोपे-पर्यंत मला थांबावेंच लागे.

रोज मला चीड येई. अभ्यासाचा वेळ जातो म्हणून जिवाची तगमग होई. आणि स्नानानंतर अभ्यासाला वेळ मिळत तर नसेच, पण अशा मनःस्थितींत अभ्यासहि होत नसे. शेवटी मी सकाळच्या अभ्यासाचा नाद सोडून दिला. रात्रीच्या जेवणानंतर मी अभ्यास करूं लागलें.

दिवसभरांत अशा कित्येक गोष्टी चालायच्या. आईला कळूं न देतां मला छळायचं यांतच काकू आपलें चातुर्य खर्चीत असे. तिला तो एक छंदच लागला होता, दुसरं काय? मी त्रासलें की सूडाचं जें समाधान तिच्या हसण्यात दिसे त्यामुळे माझें रक्त उसळून येई.

पण आंतल्या आंत जळण्यापलीकडे मला कांहींहि करणें शक्य नव्हतं. काकाहि आईशीं मधूनमधून माझ्यावरून भांडण उकरून काढीत— "माझी बायको घरांत इतकं काम करते. सुमतीनं थोडं तरी काम कां करूं नये? ती मॅट्रिकमधे शिकत असली तरी तिचे इतके लाड तुम्ही कां करतां? घरांतला प्रत्येक चांगला जिन्नस तुम्ही सुमतीला वापरायला देतां. माझ्या बायकोजवळ ती आताशी बोलतसुद्धा नाही, बेपर्वाईनं वागते. तिला चांगली कामाला लावल्याखेरीज ती सुधारायची नाही. माझ्या बायकोनं भाजीच्या चार काड्या निवडल्या तर सुमतीनं दोन तरी निवडल्याच पाहिजेत."

आई प्रथम काकांना सांगत असे, "भाऊजी, सुमतीच्या आयुष्यांत आह्मा सुख तें काय मिळणार आहे? आम्ही आता जें कांही तिला सुख देऊं तेंच खरं."

पण पुढेंपुढे ती त्यांना स्वच्छ सांगे,

"मी सुमतीला मुळीच काम सांगणार नाही. माझ्या घरांत मीं ब्राम्हण ठेवलेला आहे. तो असतांना आणि मी असतांना आम्हांला दुसऱ्या कुणाच्याच कामाची गरज नाही."

काका एकदा म्हणाले, "बरं आहे. मी माझ्या बायकोला माझ्या माडींत बसवून ठेवीन."

आईने म्हटलें, "मग एकटीलाच नको. मुलांनाहि माडीवरच बसवून घ्या. आम्ही कुणी त्यांना बोट लावणार नाही. आम्ही कांही तुमचं देणं लागत नाही. सुखानं नसेल राहायचं तर वेगळे राहा."

आई इतकें बोले त्याप्रमाणे वागणूकहि ठेवी. तिने काकाकाकूचें कांहीएक चालू दिलें नाही. परंतु तिच्या आणि बाबांच्याहि मनाला अतोनात त्रास होई. आई पूर्वी सहसा रडत नसे, पण पुढेंपुढे काकांशीं भांडण झालें की शेवटी त्याचं पर्यवसान आईच्या रडण्यांत होऊं लागलें. माझे पुढे कसें होणार या काळजीने आईबाबांना ग्रासून टाकलें. वार्धक्य दिवसानुदिवस वाढू लागलें.

भाऊला माझ्या परिस्थितीची जाणीव कॉलेजमध्ये गेल्यावर येऊं लागली.

काकाकाकू भाऊशींदेखील नीट वागत नसत. काका मुळी लहानपणापासून त्याला जसा पाण्यांत पाहात. तो नापास झाला की काका म्हणत, "भाऊला घरांतून हाकलून दिल्याखेरीज तो मुळीच सुधारणार नाही."

भाऊला या सर्व गोष्टी समजत. पण तो काकांना कधीहि वाकडें बोलत नसे. काकूशींहि तो आदराने वागे. काकू त्याच्या वाटेला कधीं गेली नाही.

आता काका जेव्हा काकूच्या नादानें मला त्रास देऊं लागले आणि आईला रडण्यापर्यंत त्रास होऊं लागला तेव्हा एकदोन वेळां

जहरी शब्दात तो काकाना बोलला, तरी त्याच्या बोलण्यांत वावगें काहीच नव्हतें. काका त्यानंतर पुष्कळ दिवस गप्प होते

भाऊ प्रेमाचा देखावा कधी करीत नसे. त्याचें प्रेम गंभीर-पणाने जाणवत असे भाऊसमोर माझ्याविरुद्ध कुणी शब्द उच्चारलेला त्याला सहन होत नसे. त्या माणसाला नुसता तो धारेवर धरी.

याप्रमाणे माझें आयुष्य चाललें होतें या सर्व घडत असलेल्या गोष्टींचा परिणाम माझ्या मनावर कसकसा होत चालला होता हें यथार्थपणें सागणें फार कठीण आहे

अगदी थोडक्यांत इतकें सागता येईल, की मला वारंवार वाटे, कुत्रा, घोडा निकामी झाला म्हणजे त्याला कसें ठार करतात! पूर्वी विधवा सती जात. किती चागलें तें! जिवंत ठेवून सामाजिक छळाने मनुष्य प्रेतासारखें करून नुसतें लोकांना अपशकुनापुरतें कशाला राखून ठेवावें? त्यापेक्षा सती जाणें फार चांगलें. याच विचारांच्या भरांत एकदा आनंदरावांनी बलिप्रतिपदेला ओवाळणीत घातलेली बारीक हिऱ्याची आगठी मीं गिळून टाकली! मी मेलें नाही याबद्दल मला मोठें नवल वाटलें!

काकूने दुसऱ्या दिवशी मला विचालें, "हें काय सुमति, बोटां-तली आंगठी काय झाली ग?"

काकूने खेळीमेळीने प्रश्न विचारला होता. तेव्हा मीं तिला सर्व हकीकत सांगितली.

काकू हसूं लागली. "काय वेडी आहेस ग!" अशी नुसती आगठी गिळून का मरण येतं? त्याला हिरा कुटून खावा लागतो."

मी म्हटलें, "अग, पण परवाच एका कादंबरीत वाचलं नाही का आपण– एका रजपूत स्त्रीनं हिऱ्याची आंगठी खाऊन प्राण दिला म्हणून?"

"अग तो चांगला मोठा हिरा असेल. उगीच चांगली आंगठी गमावलीस पण पुन्हा असला कांही प्रयत्न करूं नको हो."

ही हकीकत घरांत सर्वांना कळली. पण आईसुद्धा सर्वांनी ती हसण्यावारी नेली !

आईबाबांना मनांत काय बरें वाटलें असेल ?



## प्रकरण ९ वें

माझें मॅट्रिकपर्यंतचें शाळेंतलें आयुष्य एकंदरीने सुंदर गेलें. त्या वेळीं मुलींचें शिक्षण फार अल्प प्रमाणांत होतें. प्रतिवर्षी मुलींच्या संख्येंत भर मात्र पडत होती.

हायस्कूलमध्ये मुली लग्न न होतां टिकून राहातील अशाच असायच्या. या बहुतेक सर्व सुखवस्तु व कमीजास्त प्रमाणांत सुधारकांच्या असत. जी मुलगी हुषार असून जिची शिक्षणाविषयी आवड दिसून येईल अशाच मुलींना आईबाप फार करून शाळेंत पाठवीत.

मुलींना हिंदु, ख्रिश्चन, पार्शी, ज्यू अशा विद्यार्थिनींच्या व मास्तरणींच्या नित्य सहवासाने आपोआपच धर्मभेद, जातिभेद या बाबतींत मनाचें औदार्य प्राप्त होऊन श्रेष्ठ, कनिष्ठ किंवा आपपरभाव वाटेनासा होई. सर्व विद्यार्थिनी. इतर भेदाभेद कुणाच्या मग लक्षात सुद्धा येत नसत.

हुजुरपागेंतल्या मुलीच्या पोषाखांत कितीतरी बदल झाला होता! कित्येक वर्षे तर लोकांत कौतुकपूर्ण अशी म्हणच पडली होती, की हुजुरपागेंतली मुलगी मुबईंत किंवा मद्रासेंत जरी दिसली तरी दाणा टिपावा तशी ओळखतां येते. पोषाख, चालणेंबोलणें कसें रेखीव असतें!

आमचे वृद्ध शिक्षक आम्हांला आदरणीय वाटत. आमच्या मास्तरणी अतिशय मायाळु आणि ध्येयवादी असत. आम्हां मुलींना त्या दैवतांप्रमाणे प्रिय वाटत. अभ्यासांत कोणाकडून विशेषशी कसूर व्हायची नाही किंवा कंटाळा आला म्हणून शाळा बुडवायची नाही. उलट कधी एकदा शाळेंत जातें अशी अवस्था होऊन सुट्टी आली की वाईट वाटायचें.

मॅट्रिकच्या वेळेला आम्ही फक्त चार मुली होतों. पूर्वी परीक्षा दिवाळीनंतर होत असत; त्यामुळे दिवाळी कधी सुखाची जात नसे. आम्ही मॅट्रिकला बसणार म्हणून 'मदर'नी आमचें कोण कौतुक चालविलें होतें! आमचा अभ्यास त्यांनी कसून तयार करवून

घेतला होता. परीक्षा सुरू झाल्यावर त्या आम्हांला परिक्षेच्या मंडपापाशीं रोज पोचवायला येत, आम्हांला धीर देत आणि दुपारच्या खाण्यापिण्याची व्यवस्था पाहून अधीरतेने " पेपर कसे गेले ? " म्हणून विचारीत. आम्ही पास व्हावें म्हणून त्या प्रार्थना करीत आणि पास झाल्यावर आम्ही शाळा सोडून जाणार याबद्दल त्यांना वाईटहि वाटे.

खरोखर, पूर्वी मुलींनी शिकणें म्हणजे एक वैभवाची गोष्ट असे हो, अन् आम्हांला फी किती होती माहीत आहे का ? खालच्या वर्गांतील मुलींना चार आणे आणि चौथी ते सातवीपर्यंत आठ आणे ! भाऊ मला या फीवरून नेहमी चिडवायचा.

आम्ही सर्वजणी उत्तम रीतीने पास झालों. पुढे आम्ही शाळेंत शिक्षकमंडळींना भेटायला गेलों तेव्हा आम्हांला ती शाळा आणि ती शिक्षकमंडळी अंतरणार म्हणून फार वाईट वाटलें

आम्हां मुलींचीहि पुढे ताटातूट झाली त्या दुसऱ्या मुली परगावच्या कॉलेजांत गेल्या. माझ्या जिवलग मैत्रिणींचें लग्न होऊन ती दूर प्रांतांत गेली. मी एकटीच फर्ग्युसन कॉलेजमध्ये दाखल झालें. परगावची एक मुलगी माझ्याच वर्गात आलेली मला कळलें, तेव्हा मला जिवावरचें मोठेंथोरलें दडपण उचलल्यासारखें वाटलें कारण एकटीलाच वर्गात जावें लागतें की काय अशी आधी मनाला फार धाकधूक वाटत होती !

मी मॅट्रिक पास झाल्याबद्दल आईबाबांना अपरिमित आनंद झाला. बाबांनी स्वतः बाजारांत जाऊन दगडू हलवायाकडून पांच रुपयांचे पेढे आणले.

भाऊ पास झाला तेव्हाहि सर्वांना आनंद झालाच होता तो आता इंटरच्या वर्गांत होता, पण बुद्धिमत्तेच्या जोडीला थोडा तरी अभ्यास असल्याशिवाय चालत नाही. एव्हांना तो बी. ए. व्हायचा; पण नापासाची दरवर्षी तो हल्ली घेऊं लागला होता. तो आता इंटरला

नापासच झाला होता. तो नीट मार्गाला लागतो की नाही ही आई-बाबांना काळजीच असे.

आमच्या नात्यागोत्यांत मुलगी अशी मीच प्रथम मॅट्रिक झालें होतें. नाहीतरी पुण्यांत त्या वेळीं अशा मॅट्रिक मुली कितीशा होत्या? फारच थोड्या! त्यामुळे नात्यांतल्या मंडळींनी माझ्यावर अभिनंदनाचा नुसता वर्षाव केला! आत्याबाई सर्वांना मोठ्या अभिमानाने सांगत, "माझी भाची मॅट्रिक झाली हो!" आईबाबांना धन्यता वाटत होती. काकांनासुद्धा खराखुरा आनंद झाला. त्यांनी मला एक फाउंटन पेन बक्षीस दिलें आणि आपल्या मित्रांना आपल्या पदरचे पैसे खर्चून पेढे वांटले. "आमच्या घराण्याचं नांव काढलंस बरं" असें काकू म्हणाली.

मला अगदी स्वर्ग हाती आल्यासारखें झालें होतें. बाकी त्या वेळीं कॉलेज म्हणजे मुलींना स्वर्गाइतकेंच जवळजवळ दुर्लभ होतें म्हणा!

ज्येष्ठांत भाऊचें लग्न झालें. लग्न म्हणजे नुसता विधि झाला. मी सुस्थितींत असतें तर त्याचें लग्न चांगल्या थाटामाटानें झालें असतें. पण मला कशांतच भाग घ्यावयाचा नसल्यामुळे लग्नसमारंभ थाटांत करावा असें कुणाच्या कसें मनांत येणार? तरी आई मला शक्य तोंवर भाग घ्यायला लावीतच होती.

काकूच्या मनांत वसंताची मुज करावी असें होतें. आईने आनंदाने संमति दिली; परंतु तिने टोलेजंग समारंभाचा हट्ट धरला तेव्हा आईने तिला साफ नकार दिला.

काकू पाठीमागे कुरकुरत होती, "आम्ही आपल्या वांटणीचे पैसे घेऊन थाटांत मुज करूं."

ज्या माणसाने काकूचें हें बोलणें आईच्या कानांवर घातलें त्यांच्याच हातीं आईने निरोप पाठवला, "भाऊजींचं पालनपोषण करून त्यांची विद्या केली, त्याचा खर्च टाका अन् मग काय उरेल त्यांत मुंजीचा थाट खुशाल उडवा."

लग्नात काकूने गंमतच केली. छातींत कळा मारतात म्हणून ती खोलींत विवळत पडली. मग लग्नाच्या दुसऱ्याच दिवशीं ती माहेरीं गेली. तिच्या माहेरीं लग्न व्हावयाचें असून त्या दिवशीं केळवण होतें. आमची चुलत चुलती तेथे जेवायला गेली होती. जेवणानंतर ती थोडीबहुत श्रीमंतपूजनाची तयारी करण्यांत गुतली. नंतर ती पाहाते तों काकू आणखी चार बायकांबरोबर भांडीं घाशीत बसली होती! माहेरच्या मोलकरणीचें कांही भांडण झालें असून ती आपणहि काम करीना अन् दुसऱ्या कुणालाहि काम करूं देईना, त्यामुळे घरच्या बायकांवरच भाडीं घासायची पाळी आली होती. पण काकूला आदल्या दिवशीं अंथरुणांतून उठवत नव्हतें ती भाडीं घासण्याइतकी दुसऱ्या दिवशीं तयार झाली होती!

माझ्या लग्नाच्या वेळींसुद्धा अर्धशिशीच्या सबबीवर ती घोळ घालून बसत असे याची आता सर्वांना आठवण झाली.

लग्नानंतर मात्र तिने हळूहळू सुधावहिनीला आपल्या गटांत सामील करून घेतलें. सुधावहिनीने प्रथम इच्छा दर्शविल्यावरून मी तिला इंग्लिश आणि मराठी शिकवीत असे. त्यामुळे काका, काकू याना फार राग आला. पुढे काकूच्या चिथावणीवरून वहिनी अभ्यासच करीना. मग मीं तिला शिकवण्याचें सोडून दिलें.

वहिनी धोरणी असल्यामुळे बाकी सर्वांशीं पटवून घेई. आईच्या भीतीने माझ्याशीं सुद्धा ती दबकून असे. परंतु काकूप्रमाणे तीहि अहूनअहून मला त्रास देण्याला आणि माझी निंदा करण्याला शिकली.

मी कॉलेजांत जात असल्यामुळे तर त्या दोघांना वाटेल तसल्या नव्यानव्या बातम्या पिकवायला मोकळें रानच मिळालें.

• • •

## प्रकरण १० वें

कॉलेजांत आम्ही फक्त दोनच मुली होतों. आम्ही दोघी प्रीव्हिअस-मध्येच होतों. पुण्यांतील कॉलेजमधील मुली आता शेकड्यांनी मोजतां येतात, पण त्या वेळीं मुलींनी कॉलेजांत जाणें म्हणजे स्त्रीशिक्षणाचा केवढा तरी विजय मानीत!

आता बहुतेक वर्तमानपत्रें स्त्रीशिक्षणास उत्तेजनपर लिहूं लागलीं होतीं. परंतु पुराणमताभिमानी लोक अजून हवे तितके— नव्हे. नको तितके होते. हिंगण्याच्या अनाथमहिलाश्रमांतील विधवा आणि पुण्याच्या शाळा-कॉलेजांतील विद्यार्थिनी म्हणजे या लोकांना अवाच्या-सवा बातम्या उठवायला आणि सन्मित्रसमाजासारख्या दुर्धारिक मेळ-वाल्यांना खुसखुशीत पद्यात्मक टीकेला मोठें भांडवलच झालें होतें.

कॉलेजचें वातावरण शाळेपेक्षा विलक्षण वेगळें असतं मला फार चमत्कारिकच वाटे. मला शाळेंतल्या पोक्त शिक्षक मंडळींबरोबर वागण्याबोलण्याचा काय तो सराव होता आणि आता सर्वत्र बरोबरीचीं मुलें. त्यांची काकदृष्टि सदा मुलींच्याकडे लागलेली! मन नेहमी बावरलेलें असे

मुलींनी आपल्या बरोबरीने शिकावें हें मुलांनासुद्धा खरोखरी वैषम्य वाटे. आम्हां मुलींना त्रास देण्याचा ते यथाशक्ति प्रयत्न करीत घरून कॉलेजांत जायचें आणि तेथून घरीं परत यायचें म्हणजे एक जिवावरचें ओझें वाटे. रस्त्यांत कोण अभद्र शब्द उच्चारील, कोण शाकुंतल सौभद्रांतलीं गाणीं गुणगुणेल किंवा दुसरी कांहीतरी चेष्टा करील याचं सदैव धास्ती असे. रस्ता डोळ्यांसमोर ठेवून चालायचें आणि कान बंद ठेवायचे असें धोरण मीं स्वीकारलें होतें.

लकडी पुलापलीकडे रस्त्याच्या कडेने गवताच्या गंजी रचलेल्य असत. जवळच आंबराई व कॉलिज होतें. या ठिकाणीं वस्ती तुरळक आणि लोकांची जा-ये फार थोडी असे. येथून जातांना फार भीति

वाटे. आसपास मराठे लोकांच्या कांही झोपड्या असून ते कामें करीत त्यांची सोबत मानून मी जाई. त्यांतच वडारी लोकांच्या राहुटयांचा तळ पडलेला दिसला की धावें दणाणून जायचें.

एके दिवशीं आंबराईजवळून मी जात असतां एका गृहस्थाने पुढे होऊन मला आडवलें. रेशीमकाठी धोतर, करवतीकाठी उपरणें, लांब काळा अंगरखा आणि झिळमिळ्यांची पिवळी पगडी व तिच्याखाली टपोऱ्या मोत्यांची भिकबाळी-- अशा पोषाखाच्या त्या गृहस्थाने माझी वाट धरल्याबरोबर मी घाबरून गेलें. कोणी जवळपास मदतीला आहे की नाही हें मी बघू लागलें.

तेव्हा तो गृहस्थ सौम्यपणाने मला म्हणाला, " बाई, तुम्ही मला भिऊं नका मला आपला आप्तच समजा पण माझ्या चार हिताच्या गोष्टी ऐकून घ्या "

" पण इथं रस्त्यांत कशाला ? घरीं माझे आईवडील आहेत त्यांना काय सांगायचं तें सांगा. "

" नाही. मला कांही तसं फार सागायचं नाही. माझं म्हणणं इतकंच, की बायका शिकल्यामुळं त्या आर्यसंस्कृति विसरतात. बायकांचं शिक्षण वाढत जाईल तसतसा हिंदुधर्म बुडाल्याशिवाय राहाणार नाही. गृहिणीपद आणि मातृपद यांच्यासारखं उदात्त ध्येय पुढं ठेवून पुरुषांना घर म्हणजे विश्रांतिस्थान करून द्यायचं. अहाहा ! असल्या बायका म्हणजे देवताच त्या. पण तें सोडून कावेबाज मिशनऱ्यांच्या नादीं लागून या बायका आता पुरुषांसारख्या शिकू लागल्या आहेत. बाई, तुमच्यासारख्यांनी आता हा असा पोषाख कशाला करावा ? तुम्हीं आता देहकष्ट करून पापक्षय करावा आणि देवपुराणं करून परमार्थ साधावा. बाई, हात जोडतों तुमच्यापुढं. तुम्ही हा भलता शिकण्याचा नाद सोडून द्या. "

तो गृहस्थ मनापासून बोलत होता. भावनोद्रेकाने त्याच्या डोळ्यांत पाणी आलें होतें. शेवटीं त्याने खरोखरी माझ्यापुढे हात जोडले.

मला काय करावें तेंच सुचेना. वाटेल तितका त्याच्याजवळ वाद घातला तरी त्या माणसाला माझें बोलणें पटणार नाही हें मी ओळखून होतें.

तेव्हा मी म्हणालें, " बरं हं, मी तुमच्या म्हणण्याचा विचार करीन "

तो गृहस्थ म्हणाला, " विचार कसला करतां ? मी म्हणतों तेंच बरोबर आहे. अन् आणखी एक सांगतो तुम्हाला– एक वेळ शिकलां तुम्ही तरी चालेल, पण दुसरंतिसरं कांही करूं नका "

" दुसरंतिसरं म्हणजे काय ? "

त्या गृहस्थाने गळ्याजवळच्या जानव्याला हात लावला. इकडे-तिकडे भयचकित मुद्रेने बघून तो हलकेंच बोलला, " अहो, त्या कर्व्यांनं आपल्या धर्मावर कलंक फासला ना. आणखी विधवा आणून त्यांचेहि पुनर्विवाह तो लावून देणार आहे म्हणे ! हर हर ! कलियुगाचा तडाखा हा ! दुसरं काय ? मग देतां ना तुम्ही मला वचन असलं कांही करणार नाहीं म्हणून ? "

मला आता त्या माणसाची जरा चीडच आली. ती ब्याद घाल-वावी कशी म्हणून मी त्रासून गेलें होतें. " हें बघा आजोबा, तुम्ही आता कलियुगाचं सत्ययुग बनविण्यासाठी ओंकारेश्वरावर वर्षभर अनुष्ठान करा, म्हणजे सर्व ठीक होईल. मला एकटीदुकटीला उपदेश करून काय होणार आहे ? चला व्हा बाजूला ! मला उशीर होतो आहे. "

त्या माणसाने अशा कांही तिरस्काराने माझ्याकडे पाहिलें ! जणू तो कपाळावरल्या भस्माप्रमाणे मलाहि भस्म करून टाकणार होता ! तो बाजूला झाला आणि दातओठ खाऊनखाऊन मला आणि सर्वच शिकणाऱ्या बायकांना अश्लील शिव्या देऊं लागला.

पण मी जागेवर ठरतें कशाला ? वाट मिळाल्याबरोबर मी जवळ-जवळ धावतच कॉलेजांत गेलें.

लेडीज रूममध्ये ही हकीकत सांगितल्याबरोबर गोदू उद्‌गारली, अगबाई ! मलादेखील एके दिवशीं रस्त्यांत अडवून तो माणूस असाच उपदेश करूं लागला. मीं सणसणीत उत्तर दिल्यावर मलाहि असाच तो शिव्या देऊं लागला. मी तुला सांगितलं नाही याचं कारण एवढंच, की शिव्या खाल्ल्याची कशाला फुशारकी मारावी ?"

आम्ही हसलों. यानंतर आम्ही आपापले वेगवेगळे अनुभव सांगितले. त्या गोष्टी होऊन गेलेल्या असल्यामुळे आम्हांला आता हसूं येत होतें. पण पुढे काय अनुभव येणार याबद्दल मनांतून भीतीहि वाटे.

गोदू ही रत्नागिरीला मुलांच्या शाळेंत शिकली होती. तिला पहिल्यापासूनच लोकांचा उपद्रव फार झाला होता, त्यामुळे तिचें मन बरेंच खंबीर झालेलें होतें. तिने मला धीर दिला.

गोदू म्हणाली, " कुत्रीं भुंकलीं तरी हत्ती आपला मार्ग सोडीत नाही. त्यांच्या भुंकण्यामुळं हत्तीचं महत्त्वहि कमी होत नाही. शिक्षणाच्या ध्येयाकडे नजर ठेवून पुढं जायचं."

गोदूचें हें बोलणें मीं अगदी नीट मनांत साठवून ठेवलें. तिचा सहवास मला पुढे लाभला असता तर फार बरें झालें असतें; पण ती प्रीव्हियस झाल्याबरोबर मुंबईच्या मेडिकल कॉलेजांत गेली.

प्रीव्हियसमध्ये गोदू बरोबर होती म्हणून बरें झालें, नाहीतर मला एकटीला फार कठीण गेलें असतें.

सर्वच प्रोफेसर्स मुलींना मदत करण्याला धजत नसत. शिवाय एक प्रीतिविवाह कॉलेजांत घडून आल्याची बोलवा गावांत पसरून लोकमत जरा गढूळ झालें असल्यामुळे मदत करूं इच्छिणारेहि भिऊन-भिऊनच मुलींशीं बोलत.

आमची अडचण होतच असे. पण लोकांना काय त्याचें ? आम्हां विद्यार्थिनींचीं नांवें कुणातरी प्रोफेसरांबरोबर किंवा मुलांबरोबर जोडून देऊन वाटेल तसल्या बातम्या उठवायच्या असा विद्यार्थ्यांना एक

नवीन उद्योगच झाला होता ! त्या बातम्या सहजच गावांत पस
बोभाटा होई.

पुढे इंटरमध्ये वर्गात मी एकटीच विद्यार्थिनी होतें ए
इंग्लिशच्या प्रोफेसरांनी मला कांही पुस्तकें वाचण्यास दिलीं
त्यानी कॉलेजच्या पट्टेवाल्याबरोबर माझ्या घरीं पाठविलीं व तीं अ
अमुक प्रकारे वाचा म्हणून मला सूचना देण्यासाठी चिठ्ठीहि पाठवि
पुस्तकें सूचनेप्रमाणे लवकरच वाचून काढली आणि त्यासंबंधं म
विचार प्रदर्शित करणारें पत्र मीसुद्धा उलट पाठविलें. यावर मा
चुका दाखविण्यासाठी त्या प्रोफेसरांनी पुन्हा मला पत्र पाठविलें व
त्यांचे आभार मानले. यांतील प्रत्येक पत्र मी बाबांना दाखवीत अ

पण काकूने आपल्या एका मावसभावाला– तो माझ्याच वर
होता– सांगितलें, " अरे, तुझा तो अमुक अमुक प्रोफेसर इतका
कट आहे की आमच्या पुतणीला पत्रं लिहितो."

त्या मुलाने (रघुवीरने) वर्गातल्या सर्व मुलांना ती बातमी प
विली. फरक इतकाच केला, की पत्रांऐवजी त्याने प्रेमपत्रें असें म्ह
दोघेंहि एकमेकांना प्रेमपत्रें पाठवीत असतात अशी बातमी पसरविल

हांहां म्हणतां ती बातमी सबंध कॉलेजांत पसरून भाऊन
कानीं आली.

भाऊ रघुवीरला भेटला. पण तो उर्मटासारखा उत्तरें
लागला. तेव्हा भाऊ सरळ प्रिन्सिपॉलकडे गेला.

प्रिन्सिपॉलनी बोलवून घेऊन रघुवीरला जेव्हा कॉलेजमधून हाक
देण्याची धमकी दिली तेव्हा स्वारी नरम आली. मग त्याने पाया प
ण्यास सुरवात केली. " मी पुन्हा असं कधी बोलणार नाही " असें म्ह
लेखी माफीहि लिहून दिली.

प्रिन्सिपॉलनी भाऊला कळविलें, की नुसत्या माफीने तु
समाधान होत नसेल तर मी या मुलाला रस्टिकेट करतों. हें र

वीरलाहि त्यांनी कळविलें. तेव्हा रघुवीर आमच्या घरीं आला व आई-बाबांच्या व माझ्यासुद्धा पायां पडला. बाबांनी भाऊच्या हातीं निरोप पाठवला, की या मुलाच्या जन्माची नासाडी व्हावी अशी आमची मुळीच इच्छा नाही, रघुवीरने लेखी माफी दिली तेवढें बस्स आहे.

ती लेखी माफी दप्तरांत पडली; परंतु त्यामुळे मुलांचें तोंड कुठे थाबलें!

एके दिवशीं मी वर्गांत गेलें तों मी बसत असे त्या बाकापुढल्या डेस्कवर 'शकुंतला' हीं अक्षरें खडूने काढून ठेवलीं होती. मीं झट्कन् मुलाकडे पाहिलें. तीं कुत्सितपणें हसत होतीं. रघुवीर विजयाने हसत होता. तितक्यांत तास घेणारे प्रोफेसर आले म्हणून सर्व शांत झालें.

माझें लक्ष तासाकडे होतें कुठे? माझ्या हृदयाला इंगळ्या डसत होत्या. "काकूच्या एका शब्दप्रहाराबरोबर लोकांच्या दृष्टीनं माझं शील कवडीमोल झालं का? कांचेवर हिऱ्यानं चरा पाडला की ती काच भंगली नाही तरी तो चरा कायम राहातो त्याप्रमाणं काकूनं हा जो माझ्या अब्रूवर चरा पाडला तो जन्मभर कायमच राहाणार काय? रघुवीरनं हा मजेखातर खेळ केला तो मला जन्मभर भोवणार काय? माझ्या आजपर्यंतच्या निष्पाप वागण्याला कांहीच कुणी किंमत देत नाही?

"माझ्यासारख्या विधवेला शीलाशिवाय दुसरी काही ठेव असते का? लोक नेमके तिच्या शीलावर शिंतोडा उडवीत असतात.

"पण माझ्या आईबाबांच्याबद्दल या लोकांनी कांही विचार केला का? माझं शील माझं नव्हतं. माझ्या आईबाबांनी ती माझ्याजवळ मोठी ठेव ठेवली होती, अढळ विश्वासानं ठेवलली होती. मी मुलांच्या कॉलिजांत जाणार तेव्हा कांही लोकांनी घरीं येऊन 'सुमतीला मुलां-बरोबर शिकवूं नका. उगीच विषाची परीक्षा कशाला पाहातां. झालं एवढं शिकणं पुरे.' असा सल्ला दिला होता. त्यांना सर्वांना आई-बाबांनी एकच उत्तर दिलं होतं. तें म्हणजे, 'आमच्या मुलीवर आमचा

पूर्ण विश्वास आहे. ती अशी बिघड म्हटल्यानं कधी बिघडायची नाही. शिवाय तिचं शिकणं झाल्यावर आम्ही तिचं लग्न करून देणार आहों हें तिला माहीत आहे. मग ती कशाला बिघडेल ? '

" लग्नाची गोष्ट बाजूला राहूं दे. लग्न व्हायचं नसतं तरी इतका अढळ विश्वास ठेवल्यानंतर मीं बिघडणं शक्य तरी होतं का ? माझ्याबद्दल ज्यांनी कधी अणुमात्र अविश्वास दाखवला नाही, आपल्या मायेचं छत्र जे माझ्या मस्तकावर धरून उभे होते ते माझे आईबाबा जिवंत असता मी माझ्या शीलाला डाग लागून घेईन ? संभवनीय तरी कसं वाटतं हें या लोकांना ? कोणतीहि वाईट गोष्ट ऐकली की ठेवला विश्वास ! हें आहे काय ? वाटेल त्या अफवेवर विश्वास ठेवणाऱ्या लोकांची डोचकी म्हणायचीं की मडकीं ? अब्रूला बळेनं ताटीवर घालून तिच्यापुढले हंसिनं चालणारे मडकंधरे हे !

" काकू, तूं नुसता माझ्या एकटीच्या अब्रूवर चरा पाडला नाहींस तर आईबाबाच्या हृदयावर तूं चरा पाडलास. "

' चल सुमति, वर्गांतच का बसून राहाणार आहेस ? " वर्गावरून जाणाऱ्या एका मुलीने आंत येऊन मला प्रश्न केला ही प्रीव्हिअसमध्ये होती.

मी पुस्तकं घेऊन चालूं लागलें.

" डोकंबिकं दुखतं होय ? " तिने विचारलें.

" हुं. " मीं उत्तर केलें.

मनांत मीं म्हटलें, " नुसतं दुखत नाही, तर डोक्यांत आग भडकली आहे माझ्या. "

मला सहसा रडूं येत नसे; पण त्या दिवशीं रात्रीं मी खूप रडलें. मी दुर्दैवी ! आणि माझ्यामुळे इतरांनाहि त्रास होत होता. आमच्या घरातल्या नंदनवनाचें सहारा वाळवंट कुणामुळे झालें ? तर माझ्यामुळे !

माझी दुर्दैवाने फुटलेली आयुष्यनौका तुफान दर्यामध्ये सापडलेली. त्या नौकेंत असतां भीति, निराशा, दुःख या विकारांनी माझ्याहि मनांत तुफान चाललेलें. माझ्या जिवलग आप्तांना माझी ती स्थिति बघवत नसल्यामुळे त्यांनीहि आपल्या आयुष्यनौका माझ्या बचावासाठी तुफानांत लोटलेल्या दिसून मला जरा समाधान वाटलें. परंतु त्यांचे ते प्रयत्न व्यर्थ आहेत. माझ्यामुळे त्यांची आयुष्यनौका मात्र वादळात ग्रस्त होत आहे हें बघून माझा जीव गुदमरून जाई. न जाणों, एखाददुसरी डुबली तर ? त्यापेक्षा माझीच आयुष्यनौका कां डुबत नाही ?

जा जा. तुम्ही सगळे परत जा. माझ्या सुखासाठी तुम्ही असा अट्टाहास का करता ? जें काय होणार असेल तें माझें एकटीचें होऊं द्या.

माझ्या जिवाची ही तळमळ बोलून कशी दाखवायची ? अन् बोलून दाखवून कोण ऐकणार आहे ? आई, बाबा, भाऊ काय भाडोत्री आहेत म्हणून जा म्हटल्याबरोबर जातील ? काय करूं मी ?

पिंजऱ्यांतल्या पोपटाप्रमाणे माझें मन आंतल्या आत तडफडत होतें.

"करूं तरी काय मी ? कशा या यातना संपवायच्या ? "

आत्महत्या ? पण लोक त्याचा काय अर्थ करतील ? करीनात ! मेल्यावर कोण त्यांना विचारतो ? माझ्या भोवतालच्या लोकांना माझ्या नशिबांत गुंतवून वावड्यांप्रमाणे मी खाली ओढून आणतें आहे त्यांची तरी सुटका होईल.

लगेच जिवाला धक्का बसला. होईल का सुटका ? आईबाबाची काय अवस्था होईल ? माझ्या अशा कृतीने त्यांच्याहि जीवनाची दोरी मी कातून टाकीन खास.

नाही. नाही. मला धैर्याने सारें सोसलेंच पाहिजे. पण– पण– कसें सोसूं मी सारें ? कसें सोसूं ?

आई ! आईग ! नाही या यातना सहन होत !

या दिवसांनंतर माझ्या रडण्याचा पावसाळा सुरू झाला. एक वर्षभर मी अतोनात रडलें. रोज रात्रीं वाईट विचारांनी डोकें फिरूं लागलें की शेवटीं त्याचें पर्यवसान रडण्यांत होई. मग कोणाला ऐकूं जाऊं नये म्हणून मी पांघरुणाचा बोळा तोंडांत घालून रडे. यामुळे माझी प्रकृति बिघडत चालली. मला बारीक ताप येऊं लागला. तरी माझा अभ्यासक्रम नियमित चालूच होता.

मला समाजाविषयीं विलक्षण चीड आली. लोकांच्या मनोवृत्ति दुखावतील असें कांहीतरी करावेंसें वाटूं लागलें. कुंकू लावण्यांत मला कांही अर्थ दिसेना, म्हणून मी रोज अंबाड्यावर फुलें घालूं लागलें.

त्या वेळीं विधवेने फुलें घालणें म्हणजे केवढी धैर्याची गोष्ट होती ! एकदोन वेळां मी फुलें घालायला विसरलें तेव्हा मुलांनी मधल्या सुट्टींत बाकावर फुलें आणून ठेवलीं. मीं वर्गात आल्यावर तीं फुलें पाहिलीं मीं तीं सरळ उचलून डोक्यांत घातलीं.

लोकाना वाटत होतें, शिकून ही आता अधिकाधिक शहाणी (?) होत चालली आहे

माझ्या मनाची अवस्था मात्र कठीण होत चालली होती. माझी बुद्धि हट्टाला पेटली होती; पण भावना विवळत होत्या, त्या मला छळीत होत्या.

पण एवढ्यानेच कुठे काय संपलें होतें !

● ● ●

# प्रकरण ११ वें

आईला हल्ली सुमारें वर्षभर जरा बरं वाटत नव्हतें तिची बुद्धि इतकी तीव्र, पण हल्ली तिला स्मरण राहीनासें झालें बोलताना तिला एखादा शब्द आठवेनासा होई किंवा आपण काय बोलतों हेंच तिच्या लक्षांत न राहून अर्धवटच बोलणें सोडावें लागे.

आईसारख्या कर्तबगार बायकोला या दुखण्यामुळे काय वाटत होतें तें आम्हांला तर्कानेच काय कळेल तेवढें. वादविवाद ती टाळू लागली. आता काकूने पत्राचा इतका गोंधळ घातला, परंतु आई तिला किंवा काकांना एका शब्दाने बोलली नाही. घरांत मला ऐकूं जावें अशा हेतूनेच तिने एक वाक्य उच्चारलें. " लोक कांही का बोलेनात, आम्हांला खऱ्या गोष्टी माहीत आहेत. सुमतीवर आमचा विश्वास आहे "

आई काकूला बोलली नाही म्हणून मला आईचा राग आला. मीच एके दिवशीं काकूला बोलू लागलें तितक्यात काका आले व " खबरदार एक शब्द माझ्या बायकोला बोलशील तर कॉलेजात गेलीस म्हणून शेफारूं नको जरा शहाणपणानं वागली असतीस तर ही कशाला लोकांजवळ काही सांगायला गेली असती? अन् तिनं इतकं कांही नाहीच सांगितलेलं. दुसऱ्या मुलांनीच सारा फाजिलपणा केला आहे " असें मलाच फडाफडा बोलू लागले.

" दुसऱ्या मुलांनी नव्हे, रघुवीरनं फाजीलपणा केला तुम्ही त्याच्याशीं बोलू सुद्धा नये. "

" तसं कसं चालेल? हिच्या नात्याचा आहे तो त्याच्याशीं बोललंच पाहिजे. "

त्यापुढे मीं काकूशीं भाषणहि सोडून दिलें.

तिला काय त्याची पर्वा होती म्हणा! ती लोकांत सांगे, " त्या आता आमच्यासारख्या अडाणी बायकांशीं कशा बोलणार? त्यांचे ते प्रोफेसर नी मुलं– त्यांच्याशीं बोलतात हो त्या! "

होय. मी मुलांशीं बोलत असे. वर्गातली सर्वच मुलें कांहीं वाईट नसतात बी. ए. पर्यंत तीनचार मित्र मला लाभले. ते मला इतकी मनापासून सर्व प्रकारें मदत करीत. मी एकटी वर्गात असतां त्यांनी माझें कुठेहि अडू दिलें नाही. आपणां स्वतःकरिता ते पुस्तके, नोट्स् वगैरेंची जी जी सोय लावीत ती ती न सांगतांच माझी लावीत. हीं मुलें माझ्याबद्दल चांगलें तर बोलतच, पण दुसऱ्या कुणालाहि वाईट बोलू देत नसत. एकदा माझ्याबद्दल कोणी मुलगा वेडेंवाकडे बोलला. तें ऐकताच माझ्या एका मित्राने त्याला चांगलाच चोप दिला हे सर्व मित्र अजून मला भेटायला येतात.

एकदोन मुलें लोचटपणा करून घरीं येत. वर्गात मात्र प्रौढीच्या गोष्टी सांगत

या लोचट मुलांपेक्षाहि एका लोचट गोऱ्यागोमट्या वकिलांनी मला जास्त त्राम दिला. ओळख नाही, कांही नाही ! ते आपले कॉलेजच्या पत्त्यावर मला पत्रें पाठवीत. पहिलें पत्र त्यांनीं सहीने पाठविलें. नंतर प्रथमाक्षरांनी सही केलेली असे. त्यात पुनर्विवाहाची याचना असे मी त्याना एकहि उत्तर पाठविलें नाही, तरी त्याची पत्रांवर पत्रें येतच. एका वेळीं या सद्गृहस्थानी माझ्यावर पस्तीस शार्दूलविक्रीडितें रचून पाठविलीं ! एकदा तर टागोरांनी भगवान् कृष्णाची प्रार्थना जशी केली आहे तशा काव्यमय भाषेंत एक इंग्रजी गद्यकाव्य पाठवलें ! काय हा वेळेचा व बुद्धीचा अपव्यय !

दोन वेळां त्यानी उघडीं कार्डें पाठविलीं. त्यांत "तुझे पत्र पोचलें" इथपासून सुरवात व "आज मला अमुक ठिकाणीं भेट" अशी सूचना होती. सही "तुझा परिचित" अशी होती.

हीं पत्रें माझ्या हातीं येईपर्यंत मुलांनी वाचलेलीं असत. फोडून वाचलेलीं असत.

काय त्या मुलांना वाटलें असेल ? पण असेल कशाला ? वर्गातून जातांयेतां हळूच उच्चारलेले 'वसंतसेना' 'गुलाबकळी' हे शब्द माझ्या कानांवर आदळतच की ! असलीं पत्रें लिहिणाऱ्या त्या वकिलाला काय नांव द्यावें ? अन् काय शिक्षा द्यावी ? अर्थात् कल्पनासाम्राज्यांत !

माझी इंटरची सहामाही परीक्षा आटपते ता आई अर्धांगवायूचा झटका येऊन पडली. दोन दिवस तिची आशा नव्हती. डॉ. विश्राम, डॉ. परसनसिंग यांनी ऐकमेकांच्या सल्ल्याने उत्तम औषधोपचार व शुश्रूषेची पद्धत सांगितल्यामुळे गुण आला. आई पुढे दोन महिने अंथरुणाला खिळून होती. वहिनीने तिची फार उत्तम शुश्रूषा ठेवली. पुढे आई घरांत हिंडूंफिरूं लागली; पण तिचा शक्तिपात झाला होता

आणखी चार महिन्यांनी तिला पुन्हा एक झटका आला आणि आमची आई आम्हांला सोडून गेली. माझी आई! मला सहाय्य करणारी नौका मला सुखी करण्याच्या अट्टाहासांत शेवटीं स्वतःच डुबली!

आई अर्धांगवायूने गेली, परंतु वास्तविक बाबांचें अर्धांग गेलें

बाबांच्या डोळयातून एक आसूं आलें नाही. आईची ज्या ठिकाणीं गादी होती त्या ठिकाणीं त्या माडींत ते एकटे शेवटपर्यंत झोपत

आई गेल्यावर तिच्या नांवाची पॉलिसी बाबानी माझ्या नांवावर करून दिली. माझ्या लग्नाची ते गुप्तपणें खटपट करीत, पण ती फार गुप्त ठेवावी लागत असल्यामुळे तिला यश आलें नाही हें थोडेंसें कारण आणि शिवाय पुनर्विवाहाला त्या वेळीं तयार असत कोण? सबंध महाराष्ट्रांत दोन की तीन पुनर्विवाह झाले होते. त्या लोकांचा छळ बघून दुसरे कुणीहि पुनर्विवाह करण्यास धजत नसत एकदोन तयार असले तरी संसार आटपलेले असायचे.

माझ्या पुनर्विवाहाची आशा इतक्यांत सफळ होणार नाही हें लक्षात येऊन बाबांची फार निराशा झाली.

आईच्या मागे आमच्या घरांत फार घोटाळा माजला. काकूला कांहीच समजत नसे. वहिनी व्यवहारांत हुषार होती, पण तिच्या हातीं कारभार देणें काका-काकूंना रुचेना.

बाबा पेन्शनचे पैसे मुकाटयाने काकांच्या स्वाधीन करीत.

माझें आता काय होणार, अशी मला भ्रान्ती पडली होती. पण ती माझी काळजी बरीच निष्फळ ठरली.

# प्रकरण १२ वें

बाबांच्या गरीब स्वभावांतच त्यांचें सामर्थ्य साठवलेलें होतें. आता एका शब्दाने त्यांना कुणी दुखवीत नसे. बाबा गरीब होते; पण एकदोन वेळीं काकांना त्यांनी चांगलेंच गप्प बसविलें. जास्त न बोलतां " मी म्हणतों तसं झालं पाहिजे " असें त्यांनी स्वच्छ सांगितलें.

बाबा गरीब होते. उगीच त्यांनी कधीहि कुणाला दुखवलें नाही. परंतु त्याना कोणीं विनाकारण दुखवलें की तें त्यांना सहन होत नसे. काका त्यांच्या या स्वभावाला फार भीत. बाबा एरवीं गरीब होते, पण कांही कारणाने मन विटलें की तें कायम. मग त्यांचा निग्रह कधी ढळायचा नाही. काकानी तशी वेळ आणली असती आणि बाबानी त्याना सांगितलें असतें, की तुझें तोंड मला पाहायचें नाही तर त्यानी तो निश्चय पाळलाच असता.

बाबाच्या निग्रहीपणाबद्दल लक्षांत ठेवण्याजोगी एक गोष्ट आहे. माझ्या जन्मापूर्वी घडली ती बाबांना विडीचें अतिशय दांडगें व्यसन जडलें होतें. मागील दारीं विड्याचा खच पडलेला असे. तोंडात विडी नाही असें कधी होत नसे

एकदा गप्पा चालू असतां बोलण्याच्या ओघांत आई बाबांना म्हणाली, " माझ्या नजरेंतून कांहीएक निसटत नाही. "

बाबा म्हणाले, " परिक्षा घेऊं तुमची ? "

आई म्हणाली, " हो. अगदी खुशाल. "

आईच्या स्मरणांतून हें बोलणें जवळजवळ नाहीसें झालें.

आठ दिवसांनी बाबांनी विचारलें, " तुमच्या नजरेंतून कांही एक निसटत नाही ना ? आता या आठ दिवसांत कोणती विशेष गोष्ट तुमच्या ध्यानांत आली सांगा पाहूं ? "

आईने बरीच आठवण केली, तरी तिला कांही कुठे लक्षांत येईना

बाबा म्हणाले, " परीक्षा नापास. या आठ दिवसांत मीं विडी ओढली नाही हें तुमच्या लक्षांत आलं नाही. "

" अगबाई ! खरंच ! " आईला अतोनात आश्चर्य वाटलें. बाबांनी एकहि विडी ओढली नाही हें एक परमाश्चर्य आणि सतत ती गोष्ट

पाहाण्याचा सराव असून आईच्या ती लक्षांत आली नाही हें एक महदाश्चर्य !

बाबांनी पुन्हा जन्मांत विडीला स्पर्श केला नाही. याप्रमाणे बाबांचें मनःसामर्थ्य होतें. आई गेल्यावरहि त्यांचा लेखनवाचनाचा उद्योग अखंड चालू असे. ते सध्याकाळीं चारपांच मैल फिरून येत. परंतु ते फारच जराग्रस्त दिसत.

मला काय वाटत असे तें मी कसें सांगूं ? कोणत्या शब्दांनी सांगूं ?

मी इंटरच्या परिक्षेंत नापास झालें. पुन्हा मी इंटरच्याच वर्गात बसूं लागलें.



# प्रकरण १२ वें

कॉलेजमध्ये वादविवादसभा होत. त्यांना आम्ही दोघीतिघी मुलीं कधीमधी जात असूं. सभेंतल्या विषयांत राजकारण मुळीच नसे. नुसता 'वंदेमातरम्' हा शब्द उच्चारायची कुणाची छाती नव्हती. ॐ मध्ये परब्रम्ह, त्याप्रमाणे या शब्दांत राजद्रोह भरून राहिला होता. असें कशाला, पण ज्या ज्या गोष्टींविषयी टिळकांच्या केसरींत सहानुभूति दाखविलेली असेल ती गोष्ट राजद्रोहाची अशा गोष्टी आपण बोललों तर आपल्यालाहि शिक्षा होईल म्हणून लोक फार भीत.

वास्तविक त्या वेळीं राजकारण फार रंगत चाललेलें होतें. लाला लजपतराय, गोखले यांनी विलायतेंत जाऊन हिंदुस्थानविषयी चळवळीचे प्रयत्न केले. त्यांना यश येण्याची आशा पार नष्ट झाली होती वंगभंगामुळे सर्व हिंदुस्थानचें वातावरण प्रक्षुब्ध होऊन गेलें होतें. सभांतून स्वदेशीचा पुरस्कार व परदेशी मालावर बहिष्कार अशा घोषणा होऊन परदेशी कापडाच्या होळयाहि पेटविण्यांत आल्या. राष्ट्रीय शिक्षण असावें यासाठी राष्ट्रीय पक्षाने चळवळ सुरू केली तेव्हा नेमस्त पक्षाने राष्ट्रीय शिक्षणाचा अर्थ आम्हांला समजत नाही म्हणून सांगितलें होतें. १९०८ सालीं टिळकांनी मद्यपाननिषेधाची चळवळ सुरू केली. नंतर लगेच त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन त्यांची रवानगी मंडालेला झाली. पुढल्या वर्षी जॅक्सनसाहेबाचा खून होऊन सर्व हिंदुस्थानांत खळबळ उडाली.

परंतु या सर्व गोष्टी घरांतल्या घरांत बोलायच्या असत. शाळाकॉलेजांत राजकारणाला अगदी पूर्णपणें मज्जाव होता. ती वेळच मोठी चमत्कारिक होती.

कॉलेजला तीनचार वर्षें मोठी धाकधुक वाटत होती. एकदा अशी हकीकत घडली, की पांडवलेण्यांत सावरकर आणि त्यांची कांही मंडळी राजकीय चर्चेसाठी बरेच वेळां जमत. पुढे त्याच ठिकाणीं एक साधु राहूं लागला. कांही कॉलेजचीं मुलें त्या लेण्यांत गेलीं असतां हा

साधु म्हणजे सरकारी हेर आहे असे वाटून त्यांनी त्याला चोप दिला. त्या साधूने मुलांनी मारल्याची तक्रार कॉलेजांत गुदरली त्या साधूला ज्या मुलांनी मारलें त्याना शोधून काढण्याच्या प्रयत्नांत कॉलेजच्या अधिकारी-वर्गाला फार त्रास पडला व शिवाय मुलांच्या वागण्यामुळे कॉलेजवर कांही ठपका येतो की काय म्हणून सर्वजण आंतून घाबरले होते. त्या-नंतर बिपिनचंद्र पाल यांच्या अटकेबद्दल निषेधप्रदर्शक सभा भरविण्याचें मुलांच्या मनांत हूतें; परंतु कॉलेजच्या अधिकारीवर्गाने परवानगी दिली नाही. पण अधिकाऱ्यांचें धोरण बरोबरच होतें. कॉलेज सुरक्षित राहावें यासाठी त्या धामधुमीच्या काळात दक्षता घेणें इष्टच होतें अशी एकंदर परिस्थिति असल्यामुळे कॉलेजांतल्या वादविवाद सभेंत 'समाजसुधारणा' हा विषय प्रामुख्याने वादासाठी येई. बालविवाह, परदेशगमन, स्त्रीशिक्षण, निरनिराळीं धर्ममतें, विधवावपन, पुनर्विवाह वगैरे विषयावर व इतरहि कमीजास्त महत्त्वाच्या विषयां-वर मुलें वादविवाद करीत.

स्त्रीशिक्षणासंबंधी सभा झाली, त्यात मुख्य वक्ती मीच होतें. पहिल्या दोन वर्षांत बोलावेंसें वाटत असूनहि मला धैर्य झालें नव्हतें परंतु या वेळी बाबांच्या प्रोत्साहनामुळे मीहि बोलावयास तयार झालें. पहिल्याने मला मुलांची भीति वाटे, तीहि आता दूर झाली होती. कॉलेजांतील वातावरण अंगवळणीं पडून त्यांत गोडीहि वाटूं लागली होती.

एक विद्यार्थिनी बोलणार म्हणून कौतुकाने प्रिन्सिपॉलसह बहुतेक प्रोफेसर्स हजर होते. अध्यक्ष एक प्रोफेसरच होते. त्यामुळेच मुलांनी कांही गडबड केली नाही. प्रथम मी घाबरलें; पण विषय तयार असल्या-मुळे लवकरच अस्खलित बोलूं लागलें.

मी जें काय बोललें तें त्या काळीं फार सुधारलेलें समजलें गेलें. आता ते मुद्दे सांगितले तर हसूं येईल. त्या दिवशीं मात्र विरुद्ध-सुरुद्ध भाषणें होऊन वाद पुष्कळच रंगला अध्यक्षांनी आपलें मत पुढे मांडून चांगलें बोलल्याबद्दल माझें अभिनंदन केलें.

दुसऱ्या दिवशीं मला प्रिन्सिपॉलनी ऑफिसमध्ये बोलावून घेऊन माझ्याजवळ अभिनंदनपर असें ते बोलले.

मला सर्वांत आनंद झाला तो बाबांच्या उद्‌गारांनी पण कौतुकाने बोलतां बोलतांच बाबांच्या डोळ्यांत पाणी आलें- "आता तुझी आई असायला हवी होती."

खरेंच, आई असायला पाहिजे होती !

आणखी आनंदरावहि असते तर ..?

शाळेंत असतांना मला त्यांचा बहुतेक विसर पडला होता पण आता मधूनमधून मला त्यांची आठवण येई. मुंबईहून त्यांनीं जीं पत्रें मला पाठविलीं होतीं तीं कधीकधीं वाचावींशीं वाटत. पत्रें वाचतांना समाधान वाटे. वाचून झाल्यावर मात्र निराशेने मन व्याप्त होऊन जाई.

थोड्याच दिवसांनंतर मीं हीं पत्रें वाचण्याचें सोडून दिलें.

अभ्यासाव्यतिरिक्त माझें अवांतर वाचन खूप चालू असे.

एके दिवशीं कॉलेजच्या लायब्ररींत विवेकानंदांचा व्याख्यान-संग्रह माझ्या हातीं आला. आधीच मला आध्यात्मिक विषयाची गोडी, आणि विवेकानंदांची अति रसाळ आणि बुद्धिवादाला धरून केलेली चर्चा, मी त्या वाचनांत फार रंगून गेलें. प्राणायाम, आसनें करण्यासहि मीं सुरवात केली. कांही काळ याप्रमाणे उत्साहाचा आणि आनंदाचा गेला. विवेकानंद प्रथम वाचायला घेतल्या दिवसापासून पुढे कित्येक वर्षें एक अश्रू माझ्या डोळ्यांतून कधी आला नाही.

मला वाटतें, पुढील दुःखासाठी मनाची पूर्ण तयारी असावी यासाठीच ही योजना होती.

माझ्यावर भयकर आघात व्हावयाचा होता

मी ज्यू. बी. ए. मध्ये गेलें तेव्हाच भाऊ बी. ए. झाला. त्याला पुण्याला नोकरी करण्याची इच्छा नव्हती आणि जरा खटपटीने इंदूर संस्थानांत त्याला चांगली नोकरी मिळाल्यामुळे तो तिकडे गेला होता. त्याने आपली बायको व मुलगा पुण्यांतच ठेवलेला होता. तो नंतर दीड वर्षांने पुण्याला येऊन गेला.

पुढे दिवाळी होऊन माझी बी. ए. ची परीक्षा आटोपली. पास होण्याची खात्री होती. त्याप्रमाणे मी पास झालेंहि.

मी पेढे आणूं नका म्हणत होतें; पण कोणींहि ऐकलें नाही. बाबा म्हणाले, "मी तुझ्या काळजींतून आता मुक्त झालों." काकांनी सांगितलें, "आता हुजुरपागेंत अर्ज टाक." तेव्हा बाबा म्हणाले, "आता इतक्यांत नको नोकरीचा त्रास मागं लावून घेऊं. वर्षभर विश्रांति घे. मग पुढं आहेच नोकरी."

भाऊनेहि पत्रांत माझे अभिनंदन करून तोच सल्ला मला दिला. तो मे महिन्यांत पुन्हा पुण्याला आला. काय असेल तें असो, या वेळीं घरांत बरेंचसें आनंदाचें वातावरण झालें होतें. सर्वांनाच आपापल्यापरी कृतार्थ वाटत होतें. काका-काकूसुद्धा समाधानांत होतीं. त्याना आता पांच मुलें होतीं. काकाची वकिली बरीच चांगली चालत होती.

सर्वांनी मिळून एक महिना आनंदांत काढला. भाऊ मला आणि बाबांना आपल्या नोकरीच्या गावीं कांही दिवस येण्याबद्दल आग्रह करीत होता. आमचाहि विचार तोच चालला होता.

पण तसें व्हायचें नव्हतें.

बाबा एके दिवशीं बाहेरून फिरून आले. आपल्या माडींत जाऊन बसतात तों त्यांच्या छातींत कळ येऊन त्यांनी भाऊला हाक मारली. त्याच क्षणीं हृदयक्रिया बंद पडून त्यांना मृत्यु आला!

भाऊ फार रडला. मला मात्र रडूं आलें नाही. मला वाईट वाटत नव्हतें. मला एक प्रकारची चीड आली होती. दिवसभर कृत्रिम शांततेने माझें रक्त गोठलें होतें. पण रात्रीं बिछान्यावर पडतांच तें सळसळूं लागलें.

मी प्रश्न विचारूं लागलें, "कां असं? कां हें असं? काळानं बाबांना कां ओढून नेलं?

"समजूं लागल्यापासून कीडामुंगीलासुद्धा मीं दुखवलं नाही. वाचेनं, कृतीनं आणि मनानंसुद्धा मीं पाप केलं नाही. असं असतां माझ्यावर वैधव्याची आपत्ति कां कोसळली? माझी आई मला कां सोडून गेली?

गावांतल्या गुंडांनी मला कां छळलं ? माझ्यावर समाजानं रोष करावा असं मीं काय दुष्ट कृत्य केलं ? माझ्यावरल्या या आपत्तीला काय नांव द्यायचं ? नशीब ? पूर्वजन्मींचं पाप ? कुणाचं नशीब ? माझं ? पापाचं फळ ? कुणाच्या ? कुणाच्या पापाची फळं मला भोगावीं लागताहेत ? माझ्या ?

" माझ्या पूर्वजन्मांत जें मन आणि जो देह माझ्या आत्म्याला लाभला होता, ज्या मनानं, ज्या देहाच्या सहाय्यानं दुष्कृत्यं केलीं तें मन आणि तो देह यांतला एक कणहि माझ्याजवळ आज नाही. पूर्व-जन्मीं मीं काय दुष्कृत्यं केलीं त्यांचं मला तिळमात्र स्मरण नाही. अशा परिस्थितींत मीं त्या दुष्कृत्यांचं फळ या जन्मीं काय म्हणून भोगा-यचं ? तान्ह्या मुलानं पायानं दिवा लाथाडून घराला आग लावली म्हणून तो मोठा होऊन जाणता झाल्यावर त्याला शिक्षा करण्या-प्रमाणंच हें होत नाही काय ?

" बरं, कित्येक लोक दुर्वर्तनी असून, लोकांना छळीत असून सर्व सुखं त्यांच्याकडे धाव घेतांना दिसतात. अगदी लोकांच्या नाकांवर टिच्चून हे लोक मजा मारीत असतात. कुणीहि त्यांचं कांही वाकडं करूं शकत नाही. याला काय म्हणायचं ? पूर्वजन्मींची पुण्याई ?

" स्वकष्टानं आंब्याचा वृक्ष लावल्यावर आणि त्याची मशागत केल्यावर त्याला जीं आम्रफळं लागतात तीं त्या माणसाला अनुपम मधुर वाटतात, खरं ना ? आपल्या कष्टांची त्या मनुष्याला जाणीव असते, त्या वृक्षाच्या जोपासनेमुळं तो त्याला विशेषच प्रिय होतो. आणि म्हणूनच ती विशिष्ट गोडी आम्रफळांत येते ना ? ती विशिष्ट गोडी हा त्या मनुष्याच्या भावनांचा विलास असतो ना ?

" मग पूर्वजन्मीं एखाद्यानं जी तपस्या केली तिचं फळ, त्या तपश्चर्येचं मुळीच स्मरण नसतां त्याला मिळण्यांत मोठी कुशारकी ती काय ? उलट वाईट वागूनसुद्धा, पाप करूनसुद्धा आपलं कांहीच वाईट होत नाही अशी खात्री पटून लोक अधिकाधिक दुराचारी नाही का बनणार ? .

" पूर्वकर्मानुसार तसंतसं वागण्याची इच्छा होते असं म्हटलं तर पहिला एक जन्म काय तो महत्त्वाचा, बाकीचे सर्व परिणाममूलक ठरतात. मग अनेक जन्मांचा उपद्व्याप हवा कशाला ? ख्रिश्चन लोकांप्रमाणं एकाच जन्मांत सोक्षमोक्ष करून टाकावा की.

" पण मग काहीच पाप न करतां येणाऱ्या संकटांची उपपत्ति लावतां येत नाही. म्हणून अनेक पूर्वजन्म आणि पुनर्जन्म कल्पावे लागतात.

" मग देवाचा उपयोग काय ? नुसती पापपुण्यांची टिप्पणी ठेवण्याचा ? न्यायाची तागडी हातीं घेऊन पापपुण्याचं वजन भरेल त्याप्रमाणं सुखदु:खांचं माप तो जिवाच्या पदरांत घालतो की काय ? जे कोणी त्या देवाची पूजा-अर्चा, प्रार्थना करतील त्यांच्या वेळेला हळूच दांडीला हात लावून पुण्यफळं अधिक व पापफळं कमी करण्याची तो शिताफी लढवतो काय ?

" असल्या परमेश्वराला न्यायाधीश कसं म्हणायचं ! पाप केलं असतां त्याचीं फळं न भोगतां लाचलुचपतीच्या जोरावर निसटून जाणाऱ्या गुन्हेगाराला किंवा त्याची शिक्षा कमी करणाऱ्या न्यायाधिशाला सज्जन कसं म्हणतां येईल ? एका खुनी माणसाला जन्मठेप दिली तर दुसऱ्याला जन्मठेप दिलीच पाहिजे, नव्हे का ? मग परमेश्वराची पूजा-प्रार्थना करणं लाजिरवाणं ठरतं. असल्या देवाला मी मानीत नाही. मीं जर पापं केलींच असतील तर त्यांचीं फळं भोगायला मी समर्थ आहें. मला कुणाचेहि उपकार नकोत. देवाचेसुद्धा नकोत "

● ● ●

# प्रकरण १३ वें

पंधरा दिवसांनी क्रियाकर्मांतर आटोपल्यावर भाऊ व्यथित चित्ताने माझा निरोप घेऊन वहिनी-मुलांसह आपल्या नोकरीच्या गावीं गेला.

पुढे बाबांच्या विम्याचे पैसे आले ते मीं भाऊच्या हवालीं केले. ते पैसे घेणें मला रास्त दिसेना.

आता घरांत काका, काकू, त्यांचीं मुलें व मी— अशीं राहिलों.

मीं विश्रांतीचा विचार सोडून दिला होता. हुजुरपागेंत मीं अर्ज टाकतांच सहजच मला नोकरी मिळाली व मी कामावर रुजू झालें.

इतक्या वर्षांत शाळेंत मुलींची संख्या कितीतरी वाढली होती. आता साडेपांचशे मुली शाळेंत होत्या आणि शाळेंत सर्व प्रकारच्या सुधारणा तर चालूच होत्या. ड्रॉइंग, ड्रिल, टेनिस, बॅडमिंटन, किंडर-गार्टन पद्धति. सर्वत्र उत्साह भरून राहिलेला दिसे. मिस् भोर हेड-मिस्ट्रेस होत्या.

लवकरच शाळेचा रौप्यमहोत्सव अत्यंत थाटाने साजरा करण्यांत आला. त्याकरिता आधीपासून केवढी तरी तयारी चालू होती. गाणीं, ड्रिल, संवाद तयार करून घ्यायचे; निमंत्रणपत्रिका, बक्षिसें— अशीं शेकडो कामें करतांकरतां आम्हां अध्यापकांचा जीव अगदी दमून गेला होता. पण उत्साह वाटत असल्यामुळे तो शीण जाणवत नव्हता.

समारंभानंतर पुन्हा अभ्यासक्रमाला सुरवात झाली

शाळेंतलें सर्व वातावरण परिचित. मी मात्र फार बदललें होतें. मी पूर्वीसारखी बोलकी राहिलें नव्हतें. स्वभावांत गांभीर्य फार आलें होतें.

मुलींशीं मात्र मला मोकळेपणाने वागतां येई. त्या मुलींच्या निर्व्याज प्रेमामुळे मला फार विरंगुळा वाटे. मला असें कळून आलें, की आपण मुलींवर जितकें प्रेम करावें तितकें अधिक प्रेम त्या आपणांवर करतात. शिक्षकांना त्या आदर्श मानतात. बारीकसारीक गोष्टींत-सुद्धा आवडत्या शिक्षकांची त्या नक्कल करतात. त्यांचा विश्वास एकदा

असला म्हणजे त्यांना शिकवणें व त्यांच्याकडून अभ्यास करवून घेणें फार सोपें जातें. या गोष्टी अनुभवाने मला हळूहळू समजत गेल्या.

मी काकांच्याजवळच राहात असें. आता तीं दोघें माझ्याशीं पुष्कळच चांगलीं वागत. मी पगारांतले पन्नास रुपये आणि कधीमधी जास्तहि पैसे काकांना देत असें. त्यांच्या मुलांना मी थोडेसें घरीं शिकवीतहि असे. त्या मुलांची शिक्षणांत फारशी बुद्धि दिसत नसे, परंतु घरात त्यांचा मोठाच मानमरातब असे.

अडीच वर्षे गेलीं. मला प्रथम जो कांही उल्हास वाटत असे तो या वर्षांत पुष्कळच कमी झाला होता. आयुष्यक्रमाचा एक प्रकारचा सारखेपणा आणि निष्क्रियता मला जाणवूं लागली. बरोबरच्या शिक्षकिणींशीं कितीं संघटन झालें तरी माझ्या मनाचा एकलकोंडेपणा जाईनाच. कामांत बराच वेळ जाई. पण नंतरचा वेळ फार लांब अन् कंटाळवाणा वाटे. ड्यूमा, रेनोल्ड, हेन्री वुड, जेन ऑस्टिन व मराठींतील कादंबऱ्या मीं वाचून काढल्या.

रामेश्वराजवळील सेवासदनांत शनिवारीं सभा होत. चारपांच वेळां मीहि बोललें होतें. प्रौढ स्त्रियांना शिकविण्यासहि मी कधीकधी जात असें. वसंत व्याख्यानमालेंत राजकारणविरहित ज्या सभा होत त्यांना मी जात असें. तरी माझ्या मनाचें औदासिन्य कांही जाईना. याप्रमाणे दिवस चालले होते. माझें दीड वर्ष कांहीतरी बरें गेलें. पण पुढलें वर्ष ..

माझें पुढलें वर्ष कसें गेलें याच्या नुसत्या आठवणींनी सुद्धा माझ्या अंगावर शहारे येतात

मी घरांत कामाशिवाय कोणाशीं बोलत नव्हतें. आई गेल्यापासून आमच्या घरीं आप्त स्त्रिया कुणी फारशा येतच नसत. मला त्या आग्रह करून बोलावीत. मी बहुतकरून जात नसे. अति आग्रह केला तरच जाई. मला बोलण्याचा कंटाळाच आला होता. त्यांची सहानुभूतीहि मला नकोशी वाटे.

मी फारशी वाचीत नसे. दोन दोन तास पलंगावर सुस्तपणें पडून राही किंवा कंटाळा आला म्हणजे फिरावयास जाई. रस्त्यांत कुणी ओळखीची स्त्री भेटली आणि ती आपण होऊन बोलली तर मी बोले.

मागून माझें मलाच केव्हाकेव्हा वाटे— त्या लोकांना वाटत असेल की शिकल्याबरोबर काय पण हिला गर्व झाला पाहा! ओळखसुद्धा दाखवीत नाही!

पण पुन्हा विचार येई, " वाटेना का त्यांना तसं. आणखी का कांही वाटेना! त्यांच्याशीं बोलून माझ्या सुखांत भर पडणार आहे की दु:खांत कमतरता येणार आहे? आणि लोकांनी मला काय कमी दुखवलं? मीं मग त्याना का दुखवूं नये? त्यांना दुखवण्यासाठी मुद्दामच एखादी गोष्ट कां करूं नये?"

अशा प्रकारच्या मनोभावनांचें धुकें माझ्याभोवती पसरलें होतें. तेंहि वर्ष गेलें. एके दिवशीं मी आठवड्याच्या परिक्षेचे पेपर्स तपाशीत बसलें असता एक इसम मला भेटावयास आले.

पस्तिशीच्या सुमाराचे असावेत ते. त्यांचें नांव मला नंतर कळलें, तें विठ्ठलराव पराजपे असें होतें.

" नमस्कार, या बसा " झाल्यावर ते म्हणाले, " माझं नांव परांजपे. मी भवानी विरूपाक्ष मंडळाचा सभासद आहें. आपण आमच्या मंडळाचं नांव ऐकलंच असेल?"

" काही आठवत नाही ऐकल्याचं. डेक्कन सभा, सार्वजनिक सभा, हिराबागेंतला क्लब वगैरे नावं ऐकलीं आहेत. पण हें नांव कांही आठवत नाही. किती वर्ष झालीं मंडळ निघून?"

" आता तीन वर्षं झालीं आमच्या मंडळाला. महिन्यापूर्वीच वार्षिक संमेलन झालं. ज्ञानप्रकाशांत आला होता ना रिपोर्ट छापून. '

" मग म्हणूनच तर पुण्यांत कुणाला कांही माहिती नाही या मंडळाबद्दल."

पराजपे जरा ओशाळून हसले. नंतर त्यांनी सांगितलें, " आमच्या बोर्डांत कांही नेमस्त लोक आहेत. केसरींत कांही छापायला देण्याच्या विरुद्ध आहेत ते. सर्व कांही आमचे रिपोर्ट ज्ञानप्रकाशांत जातात. तरीहि आमचं मंडळ फार लोकप्रिय होत चाललं आहे. त्यावरूनच मीं म्हटलं तुम्हाला माहीतच असेल म्हणून."

"त्याचं खरं कारण असं आहे, की मी तीन वर्ष हुजुरपागेंत आहे. कामकाजांत मला गावांतल्या हकीकती फारशा कळतच नाहीत मुळी. सभासद किती आहेत ?"

"फारच उत्तम चाललं आहे आमचं मंडळ. तीन वर्षांत शंभराजवळ सभासदांचा आंकडा गेला आहे. पुष्कळ मोठमोठे लोक सभासद झाले आहेत आणि विशेष म्हणजे कांही स्त्रीसभासदहि येत असतात."

ही माहिती ऐकून मी उत्सुकतेने कोण कोण बायका येतात म्हणून नांवें विचारली. परांजप्यांनी नांवें सांगितली, परंतु ती सर्व मला अपरिचित वाटलीं.

नंतर प्रश्नार्थी मुद्रेने मी परांजप्याकडे पाहिलें.

"मी अशाकरिता आपल्याकडे आलों, की आमच्या मंडळांत मधूनमधून आम्ही सन्मान्य व्यक्तींची व्याख्यानं करवतों. खाडिलकर, परांजपे, केळकर, रँग्लर परांजपे, झालंच तर कृष्णाबाई टाकूर अशा पुष्कळच मोठया विद्वानांचीं व्याख्यानं पूर्वी आमच्याकडे झालेलीं आहेत. तेव्हा आपलंहि एक व्याख्यान व्हावं असं फार मनांत आहे."

"मग इतके मोठे लोक व्याख्यानाला मिळत असतां मीं काय तिथं बोलणार ?"

"वा: ! असं कांही नाही. आपण फार चांगलं बोलता हें कॉलेजांतल्या लोकांना माहीत झालं, त्याप्रमाणंच सेवासदनांतल्या आपल्या व्याख्यानांचाहि फार बोलबाला झाला आहे. आपण अगदी आलंच पाहिजे. नाहीतर आमची निराशा होईल."

मग बुधवारीं संध्याकाळीं साडेपांच वाजतां व्याख्यानाचें नक्की झाल्यावर परांजपे जावयास निघाले. जातांजातां त्यांनी "मी आपल्या वडिलांचा विद्यार्थी होतों. फार उत्तम शिकवणं होतं त्यांचं. फार सज्जन !" अशी माहिती दिली.

तितक्यांत काका आले. त्यांचीहि दोघांची थोडी ओळख होती. औपचारिक बोलणें झाल्यावर परांजपे निघून गेले.

" कशाला ग तो गावगुड आला होता तुझ्याकडे ? " काकांनी मला विचारलें.

मीं सांगितल्यावर ते म्हणाले, " कांही जाऊं नको तिथं. गावगुडांचं अक्षमंडळ' असं लोक म्हणत असतात त्या विरूपाक्ष मंडळाला. "

" लोक कशाला चांगलं म्हणतात ? हिंगण्याबद्दल लोकांनी किती वाईट नांवं ठेवलीं आहेत ! आणि शिवाय मी व्याख्यानाचं कबूल करून चुकलें. "

" बरं जा " असें तिरस्काराने म्हणून काका निघून गेले. सेवासदनांत कशाला शिकवायला जातेस आणि वेळ घालवतेस असेंसुद्धा काका मला बोलत मग मीं कशाला ऐकूं त्यांचं ?

पेपर तपासून सोमवारीं मी मोकळी होतांच दोन दिवस व्याख्यानाचा विषय तयार केला व बुधवारीं मंडळाने पाठवलेल्या व्हिक्टोरियात बसून मी शुक्रवार पेठेंतील एका भव्य जुन्या वाड्यात विरूपाक्ष मंडळ होतें तेथे गेलें. ( नवीन रस्ता पाडल्यामुळे हल्ली हा वाडा जमीनदोस्त झाला आहे )

सेक्रेटरींनी मला दिवाणखान्यात नेऊन स्त्रिया बसल्या होत्या तेथे बैठकीवर बसवलें आणि त्यांच्याशीं त्यांनी माझी ओळख करून दिली. सातआठ बायका होत्या. औपचारिक हसण्यापलीकडे कोणी कांही बोलेनात मीं कांही प्रश्न विचारले तेव्हा चारपांचजणी कुत्सितपणें उगीचच एकमेकींकडे बघून हसल्या. दोघीतिघींनी मात्र सभ्यपणाने उत्तरें दिलीं व मग थोडें बोलल्याहि.

दिवाणखाना प्रशस्त असून पेशवाई बैठकीवर सुमारें पन्नास मंडळी बसली होती. पानतंबाखूचीं तबकें सर्वत्र फिरत असून पलीकडच्या माडींत जाऊन लोक धूम्रपान करीत त्याचा धूर मधूनच दिवाणखान्यांत प्रवेश करीत असे. हा फक्त सभेच्या वेळचा शिष्टाचार होता, हें मला मागून कळलें. एरवीं बैठकीवरहि धूम्रपान चाले.

मंडळांत पूर्वी कोणकोणत्या विषयांवर भाषणें झाली हें मी विचारून घेतलें होतें. ते विषय टाळून मी माझा विषय निवडला होता. तो म्हणजे– " कादंबऱ्यांचा जुना व नवा जमाना. " पूर्वीच्या 'मंजुघोषा' वगैरे कादंबऱ्या आणि नंतरच्या हरिभाऊ आपटे वगैरेंच्या कादंबऱ्या.

हरिभाऊ आपटयांनी आपल्या कादंबऱ्यांनी त्या वेळीं महाराष्ट्राला जें वेड लावलें तें अपूर्व. अगदी पोथ्यांप्रमाणे देवघरांत कादंबऱ्या ठेवण्याइतकी त्यांनी मान्यता मिळविली. ती मान्यता आणि तें वेड म्हणजे खरोखरीच न भूतो न भविष्यति. कारण त्या काळीं लोकांना कादंबऱ्या फार थोडया वाचावयास मिळत. आता वाटेल तितक्या चांगल्यावाईट कादंबऱ्या प्रसिद्ध होत आहेत. म्हणून आपटयांच्या कादंबऱ्या म्हणजे उपाशी पोटीं मिळणाऱ्या पंचपक्वान्नाच्या भोजनाप्रमाणेच होत्या.

व्याख्यानानंतर दहाबारा पोक्त मंडळी, बारापंधरा तरुण मंडळी आणि चारपांच स्त्रिया एवढयाच राहिल्या. बाकी सर्व निघून गेली.

मला सेक्रेटरींनी बसवून घेतलें होतें. काही मंडळींसह शेजारच्या खोलींत मला अल्पोपहार देण्यांत आला. या वेळी या उरलेल्या स्त्रिया आंत आल्या होत्या. त्यांनी माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्नहि केला नाही. त्या पुरुषांशीं मात्र बोलत, हसत होत्या. कांही पुरुष तेवढे माझ्याशीं बोलले. सेक्रेटरी प्रधान यांनी मला नंतर पुन्हा आपली व्हिक्टोरिया पोचविण्यास दिली. त्यांनी मला सभासद होण्यासाठी आग्रह केला व माझ्या हातीं सभासदत्वाची नियमपत्रिकाहि दिली.

• • •

# प्रकरण १४ वें

शुक्रवारीं सकाळीं परांजपे सेक्रेटरी प्रधान यांच्यासह पुन्हा घरीं आले. बसतांबसतां परांजपे म्हणाले, " सहज इकडून चाललों होतों तेव्हा म्हटलं विचारावं सभासद होण्याबद्दल काय विचार ठरला तें. "

" पण सभासद होऊन मंडळांत यायला मला वेळ कुठं आहे ? "

" मधूनमधून वेळ होईल तेव्हाच या. " सेक्रेटरी म्हणाले.

" बरं बघूं. "

" आमच्या स्त्री-सभासदांची फार इच्छा आहे तुम्ही यावं म्हणून. " सेक्रेटरी म्हणाले.

" असं ? परवा तर त्या—" इतकें बोलून मी थांबलें.

माझ्या मनांतला अर्थ परांजप्यांनी ओळखला असावा. ते म्हणाले, " मंडळांतल्या बायका फार चांगल्या आहेत. तुम्ही शिक-लेल्या म्हणून जरा बिचकतील त्या प्रथम; पण एकदा ओळख झाली, तुम्ही मनमोकळेपणानं बोलतां असं समजलं, की मग फार गोड वागणं आहे सगळयांचं. "

मला वाटलें, असेंच असलें पाहिजे. थोडयाच वेळांत त्या दोघांनी सभासदत्वाचा फॉर्म माझ्याकडून भरून घेतला.

मग प्रधान म्हणाले, " आता सभासद झाल्यावर नेहमी यालच, त्यांत कांही सांगायला नको. पण शुक्रवारीं आमच्या मंडळांत संध्या-काळीं सहाला भजन होत असतं. आजहि भजन आहे. तेव्हा आज जरूर या. कोणी मैत्रिणी आल्या तरी हरकत नाही. शुक्रवारचं भजन हें आमच्या मंडळाचं वैशिष्टय आहे बरं का. "

" बरं येईन. " म्हणून म्हटल्यावर ते दोघे निघून गेले.

मी मंडळांत गेल्यावर ज्या चारपांच बायका माझ्याशीं फारशा बोलत नव्हत्या त्या अचानक मोकळेपणाने बोलूं लागलेल्या पाहून मला फार आश्चर्य वाटलें ! मी सभासद होणार ही बातमी त्यांना कळलीच होती ! आज पंधरावीस स्त्रिया जमल्या होत्या.

भजनाला सुरवात झाली. एका वृद्ध सभासदांनी गीतेंतला एक श्लोक वाचून दहा मिनिटें प्रवचन केलें व नंतर सर्व मंडळींनी उठून उभें राहून टाळ्या वाजवून भजन करण्यास सुरवात केली. ज्यांनी प्रवचन केलें तेच गृहस्थ ईशभक्तिपर अभंग, ओव्या म्हणत होते. त्यानी एकेक ओळ म्हणावयाची व इतरांनी तीच पुन्हा म्हणावयाची असें चाललें होतें.

पुढे कांही मंडळी भजन करतां करतां जेव्हा नाचू लागली तेव्हा मला अतिशय हसूं येऊं लागलें. चांगले सुशिक्षित लोक आणि कांही बायकासुद्धा नाचत होत्या. त्यांतल्या त्यांत एक अम्मा म्हणून बाई काळी, खूप लठ्ठ आणि ठेंगणी होती. नाचणाऱ्या अस्वलाचीच आठवण झाली मला. नाचतांनाचतां खूप लठ्ठ मांड्या एकमेकांना घासून जरा त्रास झाला की पट्दिशीं अम्मा गुडघ्यांत वाकत नी क्षणभरांत पुन्हा सरळ होत.

अर्ध्या तासांत भजनाचा कार्यक्रम खलास झाला नंतर बत्तासे व चुरमुरे वांटण्यांत आले.

चुरमुरे खातां खातांच मंडळी आता खेळू लागली. कामाची घाई असल्याकारणाने बहुतेक बायका निघून गेल्या होत्या.

उरलेल्या सातआठ बायका व कांही पुरुषमंडळी दिवाणखान्याच्या एका अंगाला बसून पत्ते खेळू लागली. एकजणांना सर्व " गिड्डूसाहेब, गिड्डू " अशा हाका मारीत. ते गृहस्थ, परांजपे, अम्मा व मलाहि परांजप्यांनी बोलावल्यामुळे मी, असों आम्ही चौघे बिझिकचा डाव खेळूं लागलों.

दिवाणखान्यांत चारपांच ठिकाणीं पत्त्यांचा डाव चालू होता. दोघेजण बुद्धिबळें खेळत असून त्यांच्याभोवती इतर मंडळींचा गराडा पडला होता. त्यांचा आरडाओरडा, गप्पा, हसणें बरेंच चाललें होतें. आंतल्या खोलींत बिलियर्ड चाललें होतें.

पानतंबाखू, विड्या, सोडालेमन वगैरे पेयें यांची गडबड चालूच होती.

मीं आजपर्यंत मिश्र समाज पाहिलेला होता, परंतु या मंडळांत कांही स्त्रिया अतिशयच मोकळेपणाने हसतबोलत होत्या. मलासुद्धा कांहीकांही वेळां चमत्कारिक वाटलें. पुरुष बायकांच्या देखत कांही वाईट वाक्यें उच्चारीत आणि मग पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियाहि हसत! पुरुष मोठयाने हसत तर या गालांतल्या गालांत हसत, इतकाच फरक! मला कांही वाक्यांचा अर्थ कळलाच नाही. घरीं विचार केल्यावर मग गर्भित अर्थ ध्यानांत आला.

एकदा तर खेळतांखेळतां गिड्डूसाहेबांनी अम्मांच्या पाठीवर थाप मारून "काय अम्मा, राणीबिणी देतां की नाही?" असें म्हटलें

त्याबरोबर अम्मांनी गिड्डूसाहेबांच्या मांडीवर तितक्याच जोराने थाप मारली. माना मुरडीत, तिरकस पाहात, लाडक्या स्वरांत त्या उद्गारल्या, "इश्श! हें काय हें गिड्डूसाहेब! लागलं मला!"

"काय लागलं? कांहीसुद्धा लागलं नाही." असें म्हणून गिड्डूसाहेब हसूं लागले व अम्मा, परांजपे हेहि हसले.

गिड्डूसाहेबांची बायको सुंदराबाई पलीकडे खेळत होती. गोरीगोमटी असून वरून दिसायला ती शेळपट नी मिळमिळीत दिसे.

आम्ही खेळत असतां परांजप्यांच्याकडे बघून मधूनमधून ती स्मित करीत असे व कधीकधी दोघांची दृष्टादृष्ट झाली की लाजून ती मान खाली घाली. हा त्यांचा दृष्टीचा खेळ किती वेळां तरी झाला.

हा खेळ गिड्डूसाहेबांना दिसत होता की नाही कोण जाणे! स्वाभाविकपणें दिसायला हवा होता. परंतु त्यांनी एकदाहि तसें पाहिल्याचें दाखविलें नाही. दारूमुळे खेळण्यापुरतेंच त्यांना ध्यान असावें.

तो खेळ पाहाणारी आणखी एक व्यक्ति होती. माझ्या शेजारीं तारिणीबाई म्हणून एक सुंदर तरुण स्त्री आमचा पत्त्यांचा डाव बघत बसली होती. आणि माझ्या ध्यानांत तो खेळ येत असल्याचें तिला पूर्णपणें समजत असावें. ती माझ्याकडे प्रत्येक वेळीं बघे, त्या वेळीं तिच्या मनांत काय भावना आहेत हें एक मला गूढच वाटूं लागलें तिच्या स्मितांत स्नेहभाव होता की सहानुभूति होती की रोष होता हेंच मला परतें कळेना! तारिणीबाई सुंदराबाईकडे तिरस्काराने पाही

तर परांजप्यांच्याकडे पाहातांना तिच्या नेत्रांत मधुर भाव उमटत. एकदा माझ्या मनांत विचार येऊन गेला आणि मला किंचित् हसूं आलें. तो विचार म्हणजे, अक्ष म्हणजे जुगार आणि डोळे. ज्या मंड-ळांत नजरेचे खेळ चालतात तें ' अक्षमंडळ.' परांजपे मात्र या दोघींच्या-कडे पाहातांना कोणतेच विकार दाखवीत नव्हते. त्यांच्या स्मितांचा वर्षाव फक्त माझ्यावर चालू होता.

अम्मांच्या लक्षांत सर्व गोष्टी आल्या असून त्या तिकडे दुर्लक्ष करीत होत्या.

डाव संपल्यावर मी घरी जायला निघालें तेव्हा सेक्रेटरी प्रधान दारापर्यंत आले. ते म्हणाले, " काय, सोडूं का घरीं? मी पण निघालों."

मीं म्हटलें, " कांही नको. जाईन मी चालत. तेवढाच व्यायाम होईल."

मला मंडळांत फारसें जातां येणार नाही असें मला वाटत होतें. पण पुढील वर्षांत मी पुष्कळच वेळां मंडळांत गेलें. प्लेगच्या दिवसांत शाळा चार महिने बंद होती. चुलतभावंडें आजोळीं गेलीं होतीं. घरांत मी, काका, काकू आणि तान्ही चुलत बहीण एवढींच होतीं. मुलें नसल्यामुळे घरांत कसा शुकशुकाट वाटे. मला भाऊने बोलावलें होतें; पण मीं जाण्याचा कंटाळा केला. या चारसहा महि-न्यांत तर मी मंडळांत रोज जात असे. त्या अवधींत मंडळाच्या आंतील वस्तुस्थितीची मला बरीच जाणीव झाली आणि बरींचशीं कोडींहि डोक्याला त्रासवूं लागलीं.

मंडळांत दोनतीन महिन्यांनी एखादें व्याख्यान होई. शुक्रवारचीं प्रवचनें व भजनें मात्र नियमित होत. त्या भजनासाठी गावांतल्या सभासद नसलेल्या मंडळींनाहि बोलावण्यांत येई. भजनासाठी हौसेने कुणी येत नसे. कांही प्रसादासाठी येत. बायकांची तेवढी जरा गर्दी होई.

याशिवाय जेवणसमारंभ वगैरे मोठ्या थाटाचे होत. खूप गर्दी होई या प्रसंगीं. एरवीं मात्र मंडळांत सातआठ बायकांखेरीज कुणीहि येत नसे. पुरुषदेखील मोजकेच येत.

सभासद पुष्कळ व्हावेत; परंतु ते वर्गणीपुरते, असेंच कांहीं लोकांचें धोरण असे.

चारपाच बायकांचें वर्तन आणि बोलणें तर इतकें उर्मट व कुचकें असे, की दोन महिन्यांपेक्षा अधिक दिवस कुणीहि नवीन स्त्री मंडळांत टिकत नसे. डॉ. प्रधानाच्या बायकोलासुद्धा या स्त्रियांची चेष्टा करून करून मंडळांत येणें नकोसें केलें होतें. तरीहि प्रधान न रागावतां यांच्या पुढेपुढें करीत. माझ्याशीं देखील त्या बायका बरेच वेळा तशाच वागत. गिड्डूसाहेबांच्या पत्नीने तर पहिल्यापासूनच माझ्यावर दात धरला होता. ती आपण होऊन माझ्याशीं बोलायला येई आणि कांहीतरी कुजकें बोलल्यावर तिचें समाधान होई.

कांहीं कांहीं वेळां मी बरीच लवकर मंडळात जाई. काळे म्हणून एक गिड्डूसाहेबांचे परम मित्रहि असेच केव्हाकेव्हा लवकर येत. त्यांना ड्रिंक्स घेण्याचा फार नाद. मंडळांत आले की ते प्रथम सोडा, लेमन मागवीत आणि जे कोणी एकदोन सभासद हजर असतील त्यांनाहि देत. मी तेथे चारपांच वेळां होतें तर त्यांनी मलाहि लेमन दिलें. सबंध वर्षांतले हे चारपांच प्रसंग होते.

त्यांत विशेष असें कांहीच नव्हतें. सुंदराबाई किंवा दुसरी कुणीहि स्त्रीसभासद तेथे असतां तिलाहि ते ' कांही हवं का ? ' म्हणून विचारून ड्रिंक देतच परंतु दोनदा आमचें ड्रिंक घेऊन होतें तों सुंदराबाई आली. काळ्यांनी माझ्याशीं बोलावें, मला ड्रिंक द्यावें हें तिला सहन झालें नाही. तिसऱ्या खेपेला आमचें ड्रिंक घेऊन झालें होतें, काळेहि बिलियर्ड खेळायला म्हणून निघून गेले, त्याबरोबर सुंदराबाई म्हणाली, " काळे नेहमी तुम्हाला ड्रिंक्स देत असतात. " शब्द साधेच; पण ते बोलण्याची पद्धत अशी कांही खोचदार आणि स्वर इतका उपरोधाने भरलेला होता, की पुन्हा केव्हाहि काळ्यांनी ' ड्रिंक हवं का ? ' म्हणून विचारलें तर मी 'नको' म्हणून म्हणत असे.

ही ड्रिंक्सची हकीकत व दुसरींहि सुंदराबाईची बोलणीं मीं एकदा परांजप्यांना सांगितलीं. ते सुंदराबाईला त्याबद्दल कांही म्हणाले

की काय कोण जाणे पण ती मला जास्तच बोलूं लागली. मग मात्र दोनतीन वेळां मी तिला तोंडीस तोंड उत्तरें दिलीं. अन् मग काय असेल तें असो, सुंदराबाई माझ्याशीं एकदम नरमाईने वागूं लागली. हें वागणें वरवरचें होतें हें मला मागून कळलें. ती लोकांत कांगावा करीत होती, की " मी सुमतीबाईचं असं काय केलंय् म्हणून त्या मला सारख्या घालूनपाडून बोलतात!" सुंदराबाई स्वतः मला काय काय बोलली तें कोणालाहि न सांगतां मी काय बोललें ते मात्र ती सर्वांना डोळयांत पाणी आणून सांगत असे.

सुंदराबाई माझ्याविषयींच्या मत्सराने नुसती जळत होती.

कारण –

अलीकडे पराजपे माझ्याकडे मधूनमधून गप्पा मारावयास येत ते फक्त इंग्रजी चारपांच यत्तांपर्यंत शिकलेले होते. परंतु सुशिक्षित लोकांत वावरणें असल्यामुळे त्यांच्या वागण्याबोलण्यांत सुसंस्कृतपणा आलेला होता. त्यांचे अवगुण दोन होते. ते म्हणजे, छाकटे कपडे वापरण्याची हौस आणि सुरेखपणाची घमेंड, आणि ओघानेच बायकां-बद्दल बोलणें व माझी अमुक बाईशी फार ओळख, मला त्या नेहमी घरीं बोलावतात पण मी जात नाही, मला मुळीच तसं वागणं आवडत नाही, अशा प्रकारची फुशारकी मारणें या गोष्टी. अशा प्रकारचें बोलून लगेच ते हसून मला म्हणत, " मला फक्त इथं यायला आवडतं. "

माझ्या सभेंत बोलण्याची, पत्ते खेळण्यांतल्या हुषारीची, शाळेंत फार सुरेख शिकवता म्हणून ऐकतों अशी व अमुक लुगडीं तुम्हाला छान दिसतात अशी ते माझी वरचेवर तारीफ करीत.

मीं एकदोन वेळां त्यांना सुचवलेंसुद्धा, की " परांजपे, तुम्ही इतकी माझी स्तुति करतां की मला वाटूं लागतं, तुम्ही माझी चेष्टा तर नाही ना करीत?"

यानंतर त्यांनी माझी अफाट स्तुति करणें बंद केलें जास्त ओळखी-नंतर अधूनमधून मीं त्यांना कपड्यांबद्दलहि सूचना दिल्या ते कधी कधी सूट घालून येत, तेव्हा आपली हॅट डोक्यावर ठेवूनच बसत आणि

थट्टयांचा पायजमा घालून खुशाल मंडळात येत. रेशीमकाठी धोतर, गुलाबी कापडाचा कोट, गंधर्व कॅप, अत्तराचा घमघमाट व लॉकेटसह जाकिटावर लावलेली घड्याळाची चांदीची साखळी असा त्यांचा बहुत-करून पोषाख असे.

माझ्या सूचनांचा परिणाम आश्चर्यकारक झाला. त्यांच्या बोल-ण्यांतली फुशारकी फारच कमी झाली. साधी काळी टोपी, बारीक किनारीचें धोतर वगैरे सर्व प्रकारची पोषाखांतहि त्यांनी सुधारणा केली. अत्तराच्या घमघमाटाची सोबत त्यांनी वर्ज्य केली. खरोखर अलीकडे ते एखाद्या सुशिक्षितासारखे दिसत या दोन्ही गोष्टींमुळे मला अतिशयच आनंद झाला.

कारण मला एकंदरींत परांजप्यांचा स्वभाव फार आवडू लागला होता निरनिराळ्या विषयांवर आमच्यीं बोलणीं होत. त्यांच्या भाषणांत फार गोडी होती. ते स्वतः इतके मोकळेपणाने बोलत, की त्यांच्याजवळून कांही चोरून ठेवणें मलासुद्धा शक्य होत नसे. प्रश्न टाकून ते सर्व विचारूनहि घेत. त्यांच्या बोलण्यात अति गोडवा होता. मला वाटे, परांजपे म्हणजे अत्यंत मोकळ्या मनाचा व उदार हृदयाचा मनुष्य आहे. लोक त्यांच्याबद्दल वाईट बोलतात त्यांत कांहीएक अर्थ नाही. ते दुष्ट तर नाहीतच, उलट थोडे भोळेभाबडेच आहेत.

हळूहळू परांजपे घरी चार दिवस आले नाहीत तर मला चैन पडे-नासें झालें. मी फिरावयास जाई तेव्हा पुष्कळ वेळां हिंगण्याच्या बाजूला वळत असे. आणि तिकडे वळलें, की अलीकडे परांजपे सायकलवरून नेमके त्या बाजूला येत. याप्रमाणे चारपांच वेळां आमची माझी गाठ पडली होती.

संध्याकाळीं मडळांत न जातां ते फिरावयास येत. "कंटाळा आला म्हणून फिरावयास आलों तों तुम्ही दिसलां" अशी प्रथम त्यांनी बतावणी केली. परंतु ती खरी मानण्याइतकी मी भोळी नव्हतें. मात्र त्याबद्दल परांजप्यांचा मला राग न येतां मनांतून सूक्ष्म असा आनंदच होई. परांजप्यांची बायको एका वर्षापूर्वी वारली होती. ते विधुर असल्यामुळे माझ्या विचारांना नवीन आशामय फाटे फुटत होते.

मंडळांत जाण्यापेक्षा फिरावयास जावेंसें मला जास्त वाटूं लागलें. माझे पाय हिंगण्याच्या रस्त्याला वळत आणि डोळे परांजप्यांना शोधीत.



## प्रकरण १५ वें

मी अशीच एकदा घरून फिरावयास म्हणून निघालें होतें. तारिणीबाई नुकत्याच माझ्याकडे येऊन गेल्या होत्या. त्यांची माझी हल्ली बरीच मैत्री जमली होती. म्हणजे त्यांनीच खरी जमवली होती. त्या माझ्या घरींहि तीनचार वेळां आल्या होत्या त्याच्याबद्दलच माझे विचार चालले होते.

तारिणीबाईंच्या स्वभावांत विरोधी गुणावगुणांचें मिश्रण फार दिसे वास्तविक अतिशय गरीब, निरुपद्रवी, प्रेमळ आणि आनंदी स्वभाव. परंतु डोळयांत औदासिन्याची छटा कायमची असे. बोलतां बोलतां आंतले गूढ मनोविकार मुखावर गर्दी करीत व नेत्रांतून संतापाच्या ठिणग्या टाकीत तोंडांतूनहि उपहास व तिरस्काराचे शब्द निघत. परंतु एरवीं बोलणे मधुर व विनोदी. कोणत्याहि गोष्टींत कुणाच्या उपयोगी पडण्याची वेळ आली की हौसेने त्या मदत करीत. केव्हाकेव्हा मला भास होई, की त्या अतिशय सहानुभूतीने माझ्याकडे बघतात. मला वाटे, माझ्या परिस्थितीबद्दल ही सहानुभूति असावी. केव्हा केव्हा वाटे, त्यांना माझ्याजवळ कांही विशेष गोष्ट बोलावयाची आहे; पण त्याना धीर होत नाही. मीं तर्क केला, की पुनर्विवाहाबद्दल त्या मला कांही सुचवणार असाव्या.

तारिणीबाईंचा नवरा कित्येक वर्षें एका सर्कशींत पळून गेला होता. तो एकटाच मुलगा असल्यामुळे सासूसासऱ्यांच्या मागे तारिणीबाईकडे घर व इतर इस्टेट आली होती. घरभाडें पुष्कळ येत असून तारिणीबाई श्रीमंती व स्वातंत्र्य या दोहींचा उपभोग घेत होत्या. त्यांचा चुलतचुलत दीर घरांत येण्याला पाहात होता, पण तारिणीबाईंनी माहेरच्याच नात्याच्या दोन मुलांना संभाळलें होतें. त्यामुळे तो चुलत दीर त्यांना नित्य त्रास देत असे.

अशा प्रकारचें निष्प्रेम व कंटकमय, पण सुखानुकूल आयुष्य असल्यामुळेच त्यांचा स्वभाव विरोधी बनला असावा असें, अनुमान मी बांधीत असें.

विचार करीत असतां परांजपे व तारिणीबाई यांच्याबद्दल माझे विचार चालू झाले.

दोन महिन्यांपूर्वी तारिणीबाई माझ्याकडे येऊन बसल्या असतां परांजपे आले. त्यांनी तारिणीबाईच्याकडे अशी कांही जरबेची नजर टाकली! एक क्षण नव्हे, पाव क्षण! त्यांनी विचारलें, "इथं येत असतां वाटतं तुम्ही?" त्या बोलण्यांतहि किंचित् तीक्ष्णपणाचा भास झाला मला

भास नव्हे, खरेंच असलें पाहिजे तें. कारण तारिणीबाईच्या मुद्रेवर भीतीचा एक ढग आपली छाया पाडून गेला. कातर स्वरांत त्या म्हणाल्या, "नाही, आज पहिल्यानंच आलें मी." तारिणीबाई खोटें बोलल्या. नंतर दोनतीन मिनिटांत माझा निरोप घेऊन गेल्या.

परांजपे त्या गेल्यावरहि जरा अस्वस्थ झालेले होते. तेहि लवकरच निघून गेले.

त्यानंतर आठ दिवस तारिणीबाई मंडळांत आल्या नाहीत. परांजपे मंडळांत आले तरी माझ्याशी बेताने बोलत. मीं मग एक दिवस त्यांना "घरीं कां आलां नाही?" म्हणून विचारलें; तेव्हा एकदम त्यांचा चेहरा उजळला! "उद्या जरूर येतों. ग्रामोफोनची ऑर्डर आली होती त्या कामांत वेळ गेला. दुकानांतहि गर्दी असते." अशी सबब त्यांनी मला सांगितली.

दुसऱ्या दिवशीं ते आले तेव्हा बोलण्याच्या भरांत मीं त्यांना विचारलें, "तारिणीबाई कां येत नाहीत मंडळांत? आजारी आहेत की काय?"

तो प्रश्न ऐकतांच परांजप्यांचा चेहरा पार बदलला. त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या व नजरेंत तिरस्कार दिसूं लागला. ते मला म्हणाले, "त्या बाईबरोबर जरा जपून मैत्री ठेवा बरं का. फार भयंकर बाई आहे ती."

"ती कशी काय?" मीं आश्चर्यचकित होऊन विचारलें.

"फार वाईट चालीची आहे ती. माझ्यावर तिचा फार राग आहे एवढं लक्षांत ठेवा."

नंतर परांजप्यांनी तो विषय बदलून लढाईतली एका नवीनच विनाशिकेची बातमी आली होती ती ते मला सांगू लागले.

दुसऱ्या दिवसापासून तारिणीबाई मंडळांत येऊं लागल्या होत्या. त्या माझ्याशीं पहिल्यासारख्याच वागूं लागल्या; परंतु मीं बोलावलें असून दोन महिन्यात त्या माझ्या घरीं आल्या नाहीत, पण आज अचानक आल्या; पण फारसें न बोलतांच घाईघाईने निघून गेल्या. त्या जरा अस्थिरचित्त दिसल्या

"परांजप्यांच्याबरोबर फिरायला जाता का तुम्ही?" असा त्यानी मला प्रश्न केला. मी "हो" म्हणतांच दोनतीन वेळां त्यानी कांही बोलण्याचा प्रयत्न केला. नंतर कांहीतरी गुळमुळीत बोलून त्यांनी माझा निरोप घेतला.

या सर्व गोष्टी मला कोड्याप्रमाणे त्रासवीत होत्याच पण आणखीहि एक कोडें मला पडलें होतें. सुंदराबाई खोचून बोलतात ही गोष्ट मात्र मी सहज म्हणून परांजप्यांना सांगितली. त्यानंतर कांही दिवस सुंदराबाई मला जास्तीच खोचून बोलूं लागल्या. "परांजपे आज आले होते, मला ते अमुक म्हणाले, माझं अमुक पातळ त्यांना फार आवडतं, ते उद्या मुंबईला जाणार आहेत" अशा प्रकारें त्या बोलत. मला मत्सर वाटावा हा हेतु त्यांत उघड होता. मी यावर उत्तर काय देणार? मुकाट्याने "हो का? असं का?" म्हणून मी बोलत असें.

आणि या महिन्यांत सुंदराबाई माझ्याशीं एकदम गोड वागूं लागल्या होत्या या गोड वागण्याची कारणपरंपरा जरी माझ्या नीटशी ध्यानांत आली नाही तरी मला त्याबद्दल अतिशय आनंद झाला. कारण त्या बाईच्या बोलण्यापासून स्वतःचें रक्षण करण्यासाठी सदा बुद्धीची ढालतरवार पाजळीत बसल्यामुळे ताण पडल्यासारखें होई. मंडळांत जाण्याचासुद्धा त्यामुळे मला कंटाळा वाटूं लागला होता अन् अशा परिस्थितींत सुंदराबाईंनी आपल्या जिभेचा काटा आंत घातला, तेव्हा मला मोकळेंमोकळें वाटूं लागलें होतें.

सुंदराबाईचा माझ्यावरचा राग इतका मावळला होता, की तिने दोनतीन वेळां मला घरीं येण्याबद्दलसुद्धा आग्रह केला आणि मीं या दोनचार दिवसांत जाण्याचें ठरवून टाकलें होतें.

लकडीपुलावरून नदीच्या दोन्ही बाजूंचा विस्तीर्ण प्रवाह, जवळ-दूरच्या देवळांचीं शिखरें व कळस, थोडयाशा झोपडया आणि डावीकडे दूर पर्वतीची टेकडी व तिच्यावरील देवळें आणि अगदी दूर असा सिंहगड दिसत होता. सिंहगडच्या एका बाजूने आरक्त सूर्यबिंब खाली खाली येत चाललें होतें. त्याच्या वरच्या बाजूला एक काळसर ढग घोरपडीसारखा दिसत असून तिच्या सहाय्यानेच जणू तो खाली उतरत होता आणि त्या श्रमाने त्याचें तोंड लाल झालें होतें.

सायंसमयीन आरक्त प्रभेने नदीचें पाणी तांबूस पिवळसर झालें होतें. एका बाजूला काठाशीं दहापांच पांढरींतांबडीं कमळें उगवलेलीं असून त्यांच्या आसपास तीनचार बदकें पोहत होतीं.

पुलाच्या जवळपासचें पाणी मात्र काळसर दिसत होतें. तें बघून माझ्या मनांत अचानक विचार आला, " हा पलीकडला सोनेरी मुलामा दिखाऊच तर ? अन् हा इकडे काळा ! मग खरं काय ? "

मी लकडी पूल ओलांडून डावीकडे वळलें. हिंगण्याचा रस्ता त्या वेळीं फार खराब असून प्लेगच्या दिवसांत राहाण्यासाठी बांधलेल्या कांही झोपडीवजा बहुतेक बंद असलेल्या इमारती, त्याच्यामागे माळरान व नदीच्या बाजूला शेते, पेरू-संत्र्यांच्या बागा असा देखावा दुतर्फा दिसत असे. वस्ती नसल्याने रस्ता ओसाड वाटे. फक्त फळें, भाज्या किंवा इतर मालांनी भरलेल्या बैलगाडया, गवताचे भारे, मोळया व भाजीफळें विकावयास नेणारे मराठेमावळे, फळें, भाजी, रानशेण्या व गोवऱ्या नेणाऱ्या पाटीवाल्या, विळा-कोयता कमरेला लावून गवताचा भारा घेऊन चाललेली उग्र वडारीण अशांची रस्त्यांत वर्दळ असे. त्या रस्त्याने फार लांब जाण्याची सोय नसे. माझ्याबरोबर काकू, माझीं चुलत भावंडें अशीं असलीं तर मी जरा लांब जात असे, नाहीतर मी झोपडीमागील दगडावर जाऊन निवान्तपणें बसत असे. ही जागा पुला-जवळच होती. तेथून लोक मला दिसत, मी मात्र दिसत नसे.

पुलावरून वळल्यापासूनच परांजपे दिसतात की नाही हें मी पाहात होतें.

आणि मी त्या झोपडीच्या बाजूने वळणार तितक्यांत ते मला दिसले. आज त्यांनी रुमाल बांधला होता. किती सुरेख दिसत होते ते !

आम्ही दोघें झोपडीमागल्या फत्तरावर जाऊन बसलों

मंडळांतील सभासदांबद्दल आमचें बहुतकरून बोलणें होईच. परांजपे ज्या लोकांशीं अतिशय मैत्री ठेवून वागत त्यांची माझ्या-जवळ मनसोक्त निंदा करीत.

अम्मा, सुंदराबाई वगैरे बायका आणि गिड्डूसाहेब, प्रधान यांच्याविषयी ते चिडल्यासारखे बोलत. पण मंडळांत ते सर्व भेटले, की " अम्मा-अम्मा, अरे गिड्डू, अरे प्रधान " असें त्यांच्या तोंडां-तून प्रेमाचे फवारे निघत.

मंडळांतील तीनचार बायकांबद्दल ते मला म्हणत, " आम्हीं त्या बायकांना पुष्कळ वेळां सांगितलं, की तुम्हीं इतर बायकांशीं नीट वागलं पाहिजे. त्यामुळं सभासद वाढून मंडळाचा फायदा होतो. पण त्या ऐकत नाहीत. "

आजहि आमचें याबद्दल बोलणें झालेंच. नंतर मी म्हणालें, " पण अलीकडे ती सुंदराबाई माझ्याजवळ फारच चांगली वागते. मला तिनं दोनतीन वेळां घरींसुद्धा बोलावलं. केवढं हें माझं भाग्य ! "

" नाही, ती बाई तशी चांगली आहे फार. "

हें परांजप्यांच्या तोंडचें अनपेक्षित वाक्य ऐकतांच मी आश्चर्यानें त्यांच्याकडे पाहूं लागलें. छे ! ते कांही चेष्टा करीत नव्हते.

मग हे आज असें कसें बोलले ?

किती वेळां त्यांनी सुंदराबाईची माझ्याजवळ चेष्टा केली होती ! ते सुंदराबाईबद्दल बोलतांना " ती पांढरी पाल " असें म्हणत. आणि मी तिला कुजकें बोलून लोकांच्या भावना कुरतडणारी उंदराबाई म्हणे.

आणि आज अचानक ती चांगली बाई झाली अं ? मला चीड आली. मीं परांजप्यांना अगदी सहज स्वरांत मुद्दाम विचारलें, " त्या सुंदराबाई

चारपांच महिन्यापूर्वी डॉ. प्रधानांच्याबरोबर साताऱ्याला गेल्या होत्या का हो? चार दिवस दोघं तिथं राहून आलीं हें खरं का हो ?"

शेजारीं बॉबगोळा फुटून मनुष्य हतबुद्ध होऊन जावा तशी अगदी क्षणभर परांजप्यांची अवस्था झाली! त्यांच्या मुद्रेवर भीतीची व काळजीची भावना उमटून गेली. नंतर त्यांनी जरा तीव्र स्वरांत विचारलें, "तुम्हाला कसं कळलं तें? तारिणीबाईनं सांगितलं की काय?"

"छे छे, त्या माझ्याकडे आताशा मुळीच येत नाहीत." मीं घाईघाई करून उत्तर दिलें. तारिणीबाई नुकत्याच माझ्याकडे येऊन गेल्या होत्या, परंतु ती गोष्ट परांजप्यांना कळली तर तें तारिणी-बाईना अहितकारक होईल एवढें माझ्या ध्यानांत आलें होतें.

माझ्या उत्तराने परांजप्यांचा चेहरा बराच उजळला, तरी त्यांना मूळ प्रश्न डिवचीतच होता

"मग कुणीं सांगितलं हें तुम्हाला? कारण तुम्हांला कळलेली बातमी चुकीची आहे."

"असं ?" मीं खोचिक स्वरात म्हटलें. "मला तर वाटतं, ती बातमी अगदी खरी असावी. कारण भामाबाईच्या तोंडून मला ती ऐकायला मिळाली, आणि पुन्हा त्यांनी मला नाही ती सांगितली. आप-आपसांत भामाबाई, कृष्णराव आणि विष्णुपंत यांचीं बोलणीं चाललीं होतीं तीं मला अचानक ऐकायला मिळालीं."

"तीं कशीं ?"

"काल मी गेलें होतें आंतल्या खोलींत कांही मासिकं पाहण्या-साठी. मंडळांत अजून कोणीच आलं नव्हतं, तेव्हा मी त्या खोलींत असलेली कुणालाच माहीत नव्हतें. तितक्यांत हीं तिघं शेजारल्या बिलि-यर्ड रूममधे येऊन बोलूं लागलीं. भामाबाईच्या मनांत भाऊसाहेबांच्या-बरोबर मुंबईला जायचं होतं. त्यांचं माहेर आहे ना मुंबईला? मला वाटतं, काल रात्रींच गेल्या असतील त्या."

"हो, हो. पण मग पुढं बोलणं काय झालं ?" परांजप्यांच्या काळजीची जागा आता उत्सुकतेने घेतली होती. मंडळांतील व्यक्तींच्या

खाजगी गोष्टी समजून घेणें हा त्यांचा एक छंदच होता. या संग्रहाचा त्यांना वेळप्रसंगीं एखाद्या शस्त्रासारखा उपयोग होई हे मला मागाहून कळलं. मी सांगूं लागले,

" भामाबाई चार दिवस मुंबईला राहून येणार आहेत. भाऊसाहेबांनाहि मुंबईला कामाकरिता जायचं असल्यामुळं दोघांनी रात्रीच्या गाडीनं बरोबर जायचा बेत केला तें कृष्णरावांना खपलं नाही. ते बायकोला सांगत होते, की ' तूं आज रात्रीं भाऊसाहेबांच्याबरोबर जाऊं नको. उद्या सकाळीं जा ' शेजारीं विष्णुपंत होते, तेहि भामाबाईंना सांगत होते, की ' तुम्ही कांही भाऊसाहेबांच्याबरोबर जाऊं नका. तुम्ही उद्या सकाळच्या गाडीनं जा. आम्ही तुमच्या चुलत्यांना तशी तार करतों. ' यावर भामाबाई हट्टाला पेटून म्हणाल्या, ' तुमचं तरी काय इतकं ? मी जाणार भाऊसाहेबांच्याबरोबर. ' यावर कृष्णराव म्हणाले, ' माझं कांही म्हणणं नाही. पण लोक वाईट बोलतात. ' "

" हं हं. मग भामाबाईंनी ऐकलेलं दिसत नाही. त्या भाऊसाहेबांच्याबरोबरच गेल्या काल आणि परतसुद्धा दोघं मिळूनच येणार आहेत. " परांजप्यांनी माहिती दिली.

" त्यांनी स्वच्छच मुळी सांगितलं, की चारपांच महिन्यांपूर्वी सुंदराबाई साताऱ्याला प्रधानांच्याबरोबर जाऊन आल्या त्यांना कां नाही कुणीं उपदेश केलांत ? अन् आम्हालाच कां 'नको' म्हणतां ? यावर पुन्हा विष्णुपंतांनी त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, की सुंदराबाई आणि प्रधान साताऱ्याला जाऊन आलीं त्याबद्दल गावांत फार चर्चा झाली. म्हणूनच फार जपलं पाहिजे. पण नाही, भामाबाईंनी सांगितलं, की मी मुळी आज भाऊसाहेबांच्याबरोबर जाणारच. मग तुमचं तुम्हाला कसं काय जपायचं तें जपा. "

" असं झालं होय ? तरी म्हटलं हल्ली चारपांच दिवस हा इतका चिडखोर कां झालाय् ? "

" कां बरं चिडूं नये त्यांनी ? नाहीतरी भाऊसाहेब-भामाबाईंचं डोळ्यांवर येण्यासारखंच वागणं होतं. दोघं म्हणे बरोबर

पेटीच्या क्लासाला जातात आणि भाऊसाहेब सारखे मुळी त्यांच्या घरीं पडलेले असतात ! "

" अंहंहं ! तसा कांही तुम्ही वाईट अर्थ मनांत आणूं नका बरं का ! अगदी मानलेलीं भाऊबहीणच आहेत तीं म्हणा ना. " परांजपे सर्व सावरून घेऊं लागले

" अन् मग कृष्णराव कां चिडतात हो ? "

" लोक बोलतात म्हणून ! दुसरं काय ? '

" असं होय ? बरं, कांही का असेना. सुंदराबाई डॉ. प्रधानांच्याबरोबर साताऱ्याला जाऊन आल्या एवढं तरी खरं ना ? "

परांजपे खुबीदारपणाने हसून म्हणाले, " मीं सुंदराबाईला चांगली म्हटलं त्याचा काय पण राग आलाय् एका माणसाला. खरं ना पण ? मीं मुद्दामच राग येतो की नाही ती परीक्षा घेण्याकरितांच बोललों, हें बी. ए. झालेल्यांच्या लक्षांत यायला हवं होतं "

परांजप्यांच्या आर्जवी स्वराने माझा राग कुठल्या कुठे पळाला ! मनांत उल्हास उत्पन्न झाला

मीं हसून विचारलें, " परीक्षा ? अन् ती काय म्हणून ? माझी असली परीक्षा घेण्याचं तुम्हांला काय प्रयोजन ? "

" सुमतीबाई, तुम्ही निव्वळ वेड घेऊन पेडगावला जातांहां. सर्व कांही तुम्हाला समजतं आहे. मला मात्र वेड लावलं आहेत खरं. "

परांजपे काय म्हणत होते तें मला चांगलें कळत होतें, नव्हे, कळत होतें असें मला त्या वेळीं वाटत होतें.

ते जवळ असले म्हणजे मला मोह पडल्यासारखें होई; परंतु त्यांच्या स्वभावांतल्या कांही गोष्टी मला उमगत नसत. मला वाटलें, हे असें संदिग्धपणें कां बोलतात ?

मी कांही बोलत नाही असें पाहून परांजपे पुन्हा म्हणाले,

" लोकांची भीति वाटते ? "

" छे छे ! विठ्ठलराव, मी आता लोकांना भीत नाही. उलट समाजाला कांहीतरी करून दुखवावं असंच मला वाटत असतं. पण माझ्या मनाचा मला विचार केला पाहिजे. मनावर संस्कार झालेले

एकदम तुटत नाहीत. मागून पश्चात्ताप होऊं नये म्हणून जपायचं. दुसरं कांही नाही."

परांजप्यांचा चेहेरा आशांकित झाला. "म्हणजे तुम्हांलाहि माझ्याबद्दल कांहीतरी वाटतंय् तर?"

"कांहीतरी वाटल्याशिवाय का इथं तुमच्याबरोबर बोलत बसतें? काका मला थोडं बोलले तुमच्यावरून."

परांजप्यांचें तोंड एकदम गोरेंमोरें झालें. "काय बोलले?"

"ऊं:! त्यांत विशेष कांही नाही."

असें मीं उत्तर दिलें; पण वास्तविक काकांचं आणि माझें भांडणच झालें होतें. लोक फार बोलतात, घराण्याची अब्रू जाते, असें काका पुष्कळ बोलले होते.

पण मीं त्यांना "लोकांना काय होतं बोलायला? नुसतं गप्पा मारायला काय हरकत आहे?" असें उत्तर दिलें होतें.

परांजप्यांनी भीतियुक्त आवाजांत विचारलें,

"मग मी तुमच्या घरीं जरा बेतानंच येऊं की काय?"

"तसं कांही नाही." मीं गुळमुळीत उत्तर दिलें. मनांतून मला ... "हे पुनर्विवाहाबद्दल कां बोलत नाहीत? मग काका काय ... यांना! का यांचाहि अजून विचार ठरत नाही? पण त्यांचं ... बरंच नाही का? त्यांचे आईवडील आहेत. मुलांचीं लग्नकार्य व्हायचीं."

परांजप्यांनी मला विचार करूं न देतां एकदम विषय पालटला. "काय, मग तुम्ही सुंदराबाईना भेटायला जाणार की नाही?"

"जाऊं का?"

"हो, जा ना त्यांनी एवढं बोलाविलं आहे."

मीं मान हालवून संमति दर्शविली.

"मग केव्हा जाणार?"

"केव्हा जावं? शनिवारीं-रविवारीं जाईन."

मग थोडया अवांतर गोष्टी बोलल्यावर मी घरीं येण्यास उठलें. माझें मन खिन्न झालें होतें. कुठेतरी कांहीतरी शल्य टोचत असल्याची मला जाणीव होती; पण तें शल्य कसलें आहे हें मला समजत नव्हतें आणि तें बरोबर कुठे बोचतें हेंहि मला सापडत नव्हतें !

तें शल्य दुसऱ्या दिवशीं मला सापडलें. तें शल्य साधें नव्हतें. त्याला जहर लागलें होतें. परंतु तें मला कुठे ठाऊक होतें ? पावसाळा सुरू होण्यापूर्वी उगीचच ढग येतात. आपल्याला त्यांचें कारण उमगत नाही पुढे पाऊस पडणार असतो त्याचें तें चिन्ह असतें.

माझ्या खिन्नतेचें कारण मला नीटसें उमगलें नव्हतें. दुसऱ्या दिवशीं तें उमगलें तरी पुढल्या पावसाळ्याची मला अणुमात्र कल्पना झाली नाही. कसला पाऊस तो ! विजांचा डोळ्यांना अंध करणारा लखलखाट, भीतीने हृदय हादरून सोडणारा कर्णकटु कडकडाट, धो-धो कोसळणाऱ्या निष्ठुर पावसाच्या धारा, जमिनीवरचा गुडघ्याइतका चिखल-- यांतून मला पुढील मार्ग आक्रमायचा होता !

पण मला त्याची कुठे कल्पना होती ? मी आपली नुसत्या मळभीचाच विचार करीत होतें !

• • •

# प्रकरण १६ वें

दुसऱ्या दिवशीं मी एका नात्याच्या घरीं लग्नानिमित्त जेवायला गेलें होतें. आग्रह फार झाल्यामुळे जाणें भागच होतें. मला शेवटला तास मोकळाच होता, तेव्हा शाळेंतून मी साडेतीन वाजतां परस्पर घरी गेलें. विहिणींची पंगत माडवांत बसलेलीच होती. मी जातांच माजघरांत माझें पान टाकून मला वाढण्यांत आलें. माझा खोळंबा झाला नाही. त्यामुळे जेवण आटोपून, मुलीच्या हाती पांच रुपये देऊन मी निरोप घेतें तों फक्त सव्वाचार झाले होते. इकडून घरीं जातांना वाटेंतच गिड्डूसाहेबांचें घर होतें. तेव्हा मला वाटलें, की आताच त्यांच्याकडे कां जाऊं नये! मी सुंदराबाईना केव्हातरी दोनचार दिवसांत येईन म्हणून सांगितलें असून त्या मला "अगदी वेळ मिळेल तेव्हा या" असेंच म्हणाल्या होत्या.

गिड्डूसाहेबांचें कापडाचें दुकान होतें. ते बरेच श्रीमंतअसावेत. निदान घरचा टांगा-घोडा संभाळण्याइतके ते श्रीमंत होते.

गिड्डूसाहेबांचें घर जुनेंच तिमजली होतें. मीं रस्त्यावरून घरांत शिरलें आणि तांदूळ निवडीत बसलेल्या एका विधवा बाईला— मीं तर्क केला, की ती गिड्डूसाहेबांची आईच असावी— सुंदराबाई आहेत का म्हणून विचारलें

त्या बाईने कांही चमत्कारिक मुद्रा केली, मानेला वर हिसडा देऊन ती तिरस्काराने बोलली,

"आहेत वर. त्या जिन्यानं जा. तिसऱ्या मजल्यावर असतील."

मला वाटलें, सासूसुनांचें असेंच चालायचें. सासू खाली काम करते आणि सून माडीवर, तेव्हा सासूबाईना राग यायचाच! मनांत मला हसूं आलें.

मी दुसरा जिना चढतें तों कानांवर फोनोग्राफमधून "प्रेमभावें जीव जगिं या नटला" ही ओळ कानांवर पडली. दार बंद होतें. मीं टक्टक् केलें; पण तें आंत ऐकू गेलें नसावें. म्हणून मीं थोडें दार उघडलें आणि जें कांही दृश्य मला दिसलें—

ग्रामोफोनजवळ सुंदराबाई आणि परांजपे उभे असून सलज्ज हसणाऱ्या सुंदराबाईंनी आपले हात त्यांच्या खांद्यावर ठेवले होते. परांजपेहि हसतमुखाने पुढे वाकले आणि त्यांनी सुंदराबाईंच्या गाला-वर ओठ टेकले.

पाहिलेल्या प्रकाराने मी इतकी स्तंभित झालें होतें, की झट्कन् निघून जाण्याचेहि मला स्मरण राहिलें नाही.

"परांजपेच का हे? काल माझ्याजवळ प्रेमयाचना करणारे, जवळ जवळ वर्षभर माझ्यापुढं स्तुतिपाठ करून माझ्याशिवाय यांना कोणाची किंमत नाही असं वाटायला लावणारे हेच का ते? माझ्याकडे आदरानं आणि प्रेमानं पाहाणारी यांची नजर इतकी विषयी कशी होऊं शकते? शी:! कसल्या नजरेनं दोघं एकमेकांकडे पाहाताहेत तरी!"

क्षणभरांत हे विचार माझ्या मनांत येऊन गेले, अन् लगेच आपण निघून गेलें पाहिजे ही मला जाणीव झाली.

आणि तितक्यांत परांजप्यांनी वर पाहिलें. मला पाहातांच ते दचकले. नंतर चिडल्याप्रमाणे चेहरा करून त्यांच्या नेत्रांवाटें क्रोध-किरण बाहेर पडले. त्या किरणांना मूर्त स्वरूप असतें तर त्यांनी माझें शरीर शतशः विद्ध केलें असतें पण ते मूर्त नसले तरी त्यांनी माझ्या हृदयावर जखमा केल्याच. हृदयावर ठिणग्यांनी वर्षाव केल्याप्रमाणे आगीआग झाली. क्षणांत ऊष्ण रक्त अंगभर धावल्यासारखें होऊन दुसऱ्या क्षणीं हृदय गोठल्याप्रमाणे हातपाय गार वाटून घाम आला.

हतबुद्ध होऊन मी उभी होतें

आणि मग सुंदराबाईंनी माझ्याकडे पाहिलें. बेपर्वाई, विजयाचा आनंद अशी ती दृष्टि होती.

कसलेंतरी घोगरें हसणें माझ्या घशांतून निघालें. मग त्यांत भीतीचें विवळणें होतें, दुःखाचा हुंदका होता, निराशेचा सुस्कारा होता की सुंदराबाईंबद्दल तिरस्काराचा हुंकार होता हें माझें मलाच समजलें नाही!

इतक्यांत मला भास झाला, की परांजप्यांनी माझ्याकडे येण्यासाठी थोडी हालचाल केली. तेव्हा मी खरी भानावर आलें. चट्दिशीं मागे वळून मी धाडधाड जिन्याच्या पायऱ्या उतरून खाली आलें. खालची बाई 'काय हो' म्हणून बोलली की काय कोण जाणे, मीं तिकडे लक्षच दिलें नाही. मी सरळ रस्ता गाठून घरीं आलें. मीं मागेसुद्धा वळून पाहिलें नाही. जणू परांजपे माझा पाठलाग करणार होते!

मी घरीं गेलें आणि शेल्फांत पुस्तकें टाकून टेबलावर डोकें टेकून पडलें संवेदनाशून्य मनःस्थितींत मी किती वेळ तरी बसलें होतें. माझ्या चुलतभावाने येऊन मला म्हटलें,

"सुमाताई, किती वेळ अंधारांत बसलीस?"

तेव्हा मी उठून दिवा लावला आणि पलंगावर पडलें. अर्धवट गुंगींत मी पडलें होते. त्यांतून जागी होऊन पाहातें तों अकरा वाजले होते. मीं उठून दिवा मालवला व पुन्हा पलंगावर पडलें. मला जरा झोप लागली. तींत कांहीतरी स्वप्न पडत होतें, पण त्या स्वप्नांतल्या एका व्यक्तीचे अचानक परांजपे बनले आणि ते माझ्याकडे रागारागाने पाहूं लागले. मीं डोळे मिटले किंवा पळून गेलें तर त्या दृष्टींतून इतक्यांत बाहेर पडणाऱ्या खऱ्याखुऱ्या बाणापासून मी सुटेन ही मला खात्री वाटत होती. पण माझे डोळे मिटेनात आणि माझे पाय तर दगडासारखे निश्चल झाले.

मी अशी कांही घाबरलें! आणि शेवटीं जागी झालें तों मला दरदरून घाम आला होता आणि हृदयाचे ठोके जोरांत चालले होते.

त्या भीतीचा परिणाम अर्ध्या तासाने नाहीसा झाला. पुन्हा मला झोप लागली तों पुन्हा मी अशीच भिऊन जागी झालें. पहाटेपर्यंत असाच वेळ गेला. पहाटे मी उठलें आणि वेणीफणीला लागलें.

मी किती वेगळीच दिसत होतें! पांढुरकें तोंड, तारवटलेले डोळे आणि सुस्त झोपेने गांगरल्यासारखी मुद्रा. मला आरशांत बघवेना!

शाळेंत कसेंतरी शिकवलें मीं. नंतर घरीं येऊन टेबलाशीं गेलें तेव्हा एक पाकीट त्यावर पडलें होतें. पाकिटावरलें हस्ताक्षर परांजप्यांचेंच दिसत होतें.

थरथरणाऱ्या हातांनीच मीं पाकीट फोडून आंतली चिठी बाहेर काढली आणि त्याच क्षणीं संतापाच्या भरांत चुरगळून टाकली. हातांत विंचू धरल्याप्रमाणे तिचा स्पर्श मला असह्य झाला. मीं तीं दूर फेकून दिली.



# प्रकरण १७ वें

परंतु दुसऱ्या क्षणीं मनांत अनिवार कुतूहल उत्पन्न झालें. आता हा मनुष्य मला चिठी तरी काय लिहितो तें पाहावें असें वाटून मीं चिठी कोपऱ्यांतून उचलून घेतली, ती उलगडून सरळ केली आणि वाचूं लागलें—

" आज नेहमीच्या ठिकाणीं फिरावयास यावें. माझी अवस्था फार विलक्षण झाली आहे. कालची रात्र मला कशी गेली तें माझें मलाच ठाऊक ! अगदी जरूर यावें.

तुमचा सहस्रशः अपराधी,

वि. वा. परांजपे. "

मीं खाली जाऊन स्टोव्ह पेटवला व चहाचें आधण टाकले. मी मनाला बजावीत होतें—

जायचें नाही त्या बाजूला ! मुळीच त्याला भेटतां कामा नये ! तुझा तुला जरा कांही स्वाभिमान असेल तर जाऊं नको !

परांजप्यांची चिठी आल्यापासून माझ्यावरलें भीतीचें दडपण दूर होऊन त्या जागीं काल पाहिलेल्या प्रसंगामुळे जे कांही वाजवी मनोविकार मनांत उद्भवणें साहजिक ते स्पष्टपणें उमटूं लागले.

परांजप्यांचा दुटप्पी व विश्वासघातकी स्वभाव कळल्यामुळे मला त्यांची चीड आली. मला त्यांच्या व इतरांच्या वागण्यांतल्या ज्या गोष्टींचा अर्थ समजत नव्हता तो आता समजला.

दोन महिने सुंदराबाई नीट कां वागली ? माझा राग करण्याचें कारण तिला उरलें नाही. विजय मिळाल्यामुळे मत्सराला जागा उरली नव्हती.

मला घरीं बोलावण्याइतकें तिचें मन उदार होऊं शकलें. त्या-पूर्वी परांजप्यांचें आणि तिचें मला ती कुजकें बोलते यावरूनी भांडण

झालें, तेव्हा ती माझ्याशीं जास्तच बिथरल्यासारखी वागूं लागली. पण परांजप्यांना तिने वठणीवर आणलें. सुंदराबाईला चांगली म्हणण्या-पर्यंत त्यांची मजल गेली!

आणि तारिणीबाईना माझ्या घरीं येण्याला त्यांनीच बंदी केली असली पाहिजे

कां भितात हे तारिणीबाईना? तारिणीबाई परांजप्यांच्यावर प्रेम करते. मग— मग भिण्यासारखें कांहीतरी घडलें असलें पाहिजे.

तारिणीबाईदेखील परांजप्यांना भिते. कां? तारिणीबाईची मान परांजप्यांच्या हातांत आवळलेली आहे म्हणून?

बस्, नाहीच भेटायचें त्यांना! 'कालची रात्र मला कशी गेली हें माझें मलाच ठाऊक!' हुंः! माझी रात्र कशी गेली हें त्या सद्‌गृहस्थाला माहीत आहे?

मी एकटीच फिरायला निघालें आणि माझी विवेचकबुद्धि परोपरीने बजावीत असतां माझी पावलें भावनेच्या आहारीं जाऊन पुलावरून डावीकडे वळलीं.

कशाला जायचें तिकडे? काय करायचें परांजप्यांना भेटून? पण नाही. मी मंत्रमुग्ध बाहुलीसारखी झोपडीमागे गेलें. तिथे जमिनी-सरपट पसरलेल्या प्रशस्त शिळेवर मी बसतें तों परांजपे आले.

त्यांचा तो निष्पाप दिसणारा हसरा चेहरा पाहून मला वाटलें, की काल मी सुंदराबाईकडे गेलें हें खरें का? की जेवून घरीं येऊन झोपलें अन् त्या झोपेंतच मला तें स्वप्न पडलें? पण मग ती चिठी कशाला? 'सहस्रशः अपराधी' अशी सही कां? आणि अपराधी असून हे इतके निष्पाप कसे दिसतात? सरळ आणि गोड कसे हसूं शकतात? मला अजूनहि त्यांचा मोह कां पडतो?

परांजपे माझ्या शेजारीं बसले. नेहमीपेक्षा जवळच बसले. आर्ज-वाने ते बोलले, " सुमतीबाई, कालच्या प्रकाराबद्दल मला किती वाईट वाटतं म्हणून सांगूं?"

मीं विरक्तपणाने म्हटलें,

" विठ्ठलराव, काय करायचं तें बोलून आता ? "

" नाही. तुम्हाला माझं सगळं ऐकून घेतलंच पाहिजे. तुम्हाला सगळं कळलं म्हणजे तुम्ही खचित माझ्यावरला राग सोडून द्याल."

विठ्ठलरावांच्या स्वरांत चूक झाल्याच्या जाणिवेने पश्चात्ताप उमटला तसेच निरपराधित्वहि उमटलें.

" पण तुमच्यावर रागावण्याचा मला अधिकार काय ? अन् मला कांही वाटलं तरी तुम्हांला त्याची पर्वा करायचं कारण काय ? मी कुणाजवळ कांही सांगणार नाही, कांही नाही. "

परांजपे कांही चमत्कारिक स्वरांत म्हणाले, " तुम्हीं कुणाला कांही सांगू नये हेंच बरं. तुम्हालाच बरं !"

" म्हणजे काय ? " मी चमकून विचारलें.

" नाही. तसं कांही नाही. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, की तुम्ही त्या गोष्टीवर विश्वास ठेवू नये हेंच बरं. कालचा प्रसंग घडला त्याला कारण ती पांढरी पालच. पांढऱ्या पालीइतकंच माझं तिच्यावर प्रेम आहे. पण सुमति, तुझ्यावर माझं किती प्रेम आहे तें तुला कसं पटवून देऊं ? तुझ्यावांचून माझा जन्म अगदी वाया होईल. "

" तुम्ही असं वचन द्याल की पुनर्विवाहानंतर अगदी कधीहि अशी गोष्ट घडू देणार नाही म्हणून ? "

" सुमति, त्या प्रश्नामुळंच तर काल माझं डोकं ठिकाणावर नव्हतं. मीं परवा रात्रीं घरीं बोलणं काढलं, तेव्हा माझ्या आईनं मला स्वच्छ सांगितलं, की 'तूं जर असं कांही करशील तर मी विष खाऊन प्राण देईन ' म्हणून. वडील म्हणाले, ' मी चौपदरी हातीं घेऊन यात्रेला जाईन. ' चार तास मी त्यांना तुझी योग्यता पटवून देत होतों, पण नाही ! आणि त्या निराशेच्या भरांत कालचा प्रकार माझ्या हातून घडला. ती सुंदराबाई माझ्यावर फार प्रेम करते. मी तरी पुरुषच आहें. पण तूं मला क्षमा केलीच पाहिजेस. मला तुझ्यावांचून जगणं-सुद्धा असह्य झालं आहे. "

" विठ्ठलराव, तुम्हांला कांही वाटत नाही हें असलं बोलतांना? मला कोण समजतां तुम्ही?"

परांजप्यांचा चेहरा एकदम बदलला.

" कोण समजतों? तूं खरी आहेस तीच समजतों तूं कॉलेजमधे काय काय गोष्टी केल्यास तें मला माहीत नाही होय? तूं चांगली असतीस तर माझ्याबरोबर अशी फिरायला आली असतीस का?"

संतापाने माझ्या अंगाचा नुसता तिळपापड उडाला. त्याला शिव्या द्याव्या असें वाटू लागलें; पण तोंडांतून शब्द निघेना!

तितक्यांत परांजपे पुन्हा प्रेमळ स्वरांत म्हणाले, "खरोखर निराशेमुळं मी वेडा बनलो आहे. मी काय कुणाला बोललों तें माझं मलाच समजत नाही! तूं माझी प्रेमदेवता आणि तुलाच मी वाकडं बोललों. काय करूं मी? तुला नाही ना माझी दया येत, सुमति? आपण चार दिवस कुठं तरी परगावीं जाऊन येऊं. येशील? येशील ना?"

परांजप्यांनी माझा हात धरला. मला विंचू डसल्याप्रमाणे होत असूनहि हात दूर करावासें वाटेना. कसलें आकर्षण हें? हा माणूस किती नीच आहे हें पुरतें कळत असूनहि मला त्याचा मोह कसा पडतो? यांच्या मनाचें आकर्षणसामर्थ्य केवढें असलें पाहिजे? आपल्या या सामर्थ्याची या असल्या लोकांना पुरेपूर जाणीव असते. त्या सामर्थ्याचा अनादर त्यांना सहन करवत नाही.

शेवटीं माझ्या बुद्धीचा विजय झाला. मीं माझा हात परांजप्यांच्या हातांतून सोडवून घेतला. मी उठून उभी राहिलें. "हे पाहा विठ्ठलराव, मला कांही ही गोष्ट कबूल नाही. यापुढं आपण आपली मैत्री तोडावी हेंच बरं."

परांजपेहि उटले. "पाहा बरं. नीट विचार केलांत?"

"हो, हो, केला."

"बराय्, पाहून घेऊं!"

परांजप्यांच्या कपाळाला आठया पडल्या. वाईट वाटण्यापेक्षा त्यांना रागच जास्त आला होता. पराजयाचा त्वेष त्यांना आला

होता. त्यांची मोहिनीविद्या निष्फळ ठरल्यामुळे ते माझ्यावर चिडले होते.

मी घरीं आलें. माझ्या दुबळ्या मनोवृत्तीची मला लाज वाटत होती. मी आज त्यांच्या चिठीप्रमाणे वागलें आणि कालचा प्रसंग बघूनसुद्धा पुनर्विवाहाला कबूल झालें. अरेरे ! किती लाजिरवाणी गोष्ट ! आता मात्र यापुढे असें कधी होणार नाही. माझें मन मला बलवान् बनवलेंच पाहिजे.

धूळ खात पडलेलें विवेकानंदांचें पुस्तक मीं साफसूफ करून वाचावयास घेतलें.

पुस्तक वाचतांवाचतांच मीं निश्चय केला— आता दोनचार महिने मंडळांत जायचेंच नाही. परांजपे दृष्टीला पडतां कामा नयेत



# प्रकरण १८ वें

पुढल्या चार महिन्यांत मी मंडळाकडे फिरकलें नाही. काकू, मुलें किंवा कुणी मैत्रीण बरोबर असली तर घराबाहेर पडायचें, नाहीतर घर नी शाळा यांपलीकडे कांही पाहायचें नाही असें मी ठरवून टाकलें होतें.

मागल्या वर्षांत माझें वाचन किती कमी झालें होतें. क्षुल्लक निंदा-कुटाळकीत परांजप्यांच्या बरोबरीने मी कशी बोलूं लागलें होतें आणि अम्मा, सुंदराबाई या बायकांचें भलतेंच महत्त्व मला कसें वाटत होतें, या गोष्टींची मला नीट जाणीव होऊं लागली. चालू महायुद्ध, टिळक मंडालेहून आल्यावर त्यांनी चालवलेलें राजकारण या गोष्टी मी वाचीत असून त्या माझ्या मनाला पूर्वीप्रमाणे चालना देत नसत सामाजिक कार्य करण्याची महत्वाकांक्षा पार लुप्त होऊन व्याख्यानें देणें, प्रौढ स्त्रियांना शिकविणें या गोष्टीसुद्धा मीं सोडून दिल्या होत्या.

माझे सर्व विचार विठ्ठलमय होऊन गेले होते.

बस्स! आता एम्. ए. चा अभ्यास करायला सुरवात करावी, म्हणजे या सर्व गोष्टींचा मला विसर पडून मन ताजेंतवानें होईल; बुद्धीवर चढलेली बुरशी निघून जाईल.

मी मंडळांत जात नाहीसें पाहून काकांना फार बरें वाटलें होतें. माझा एम् ए. चा विचार तर त्यांना फार पसंत पडला. मे महिन्याच्या सुट्टीनंतर हेडमिस्ट्रेसची परवानगी घेऊन एम्. ए. च्या अभ्यासाला सुरवात करायची असें मीं नक्की ठरवून टाकलें.

आध्यात्मिक वाचन, प्राणायाम, आसनें, चांगल्या पुस्तकांचें वाचन यांमुळे माझी मनःस्थिति फार शांत झाली होती, मनोबळ चांगलें वाढलें होतें, प्रकृतीहि सुंदर झाली होती.

जूनची दुसरी तारीख आली असून ५ तारखेला शाळा उघडणार होती. मीं जरी माझ्या विचारांचा लगाम ताब्यांत ठेवला होता तरी

मंडळासंबंधी व विठ्ठलरावांसंबंधी विचार केव्हाकेव्हा मनांत येतच. कारण विठ्ठलरावांनी माझी मनधरणी करण्याकरिता व त्यांना भेटावयास जावें म्हणून तीन पत्रें लिहिलीं होतीं व मीं त्यांना उत्तर पाठविलें नव्हतें. अतिशय निग्रह करून मी त्यांना भेटावयासहि गेलें नव्हतें. तारिणीबाई माझ्याकडे येतील असें मला वाटलें होतें, परंतु त्या मुळीच आल्या नव्हत्या. मंडळासंबंधी हकीकत समजावी असें वाटे. आपणच तारिणीबाईंच्याकडे जावें असेंहि एकदा मनांत आलें. पण मीं तो विचार सोडून दिला. कारण तारिणीबाई परांजप्यांच्या भीतीमुळेच जर आल्या नसल्या तर आपण त्यांच्या घरीं जाऊन त्यांना संकटांत कां घाला, असें माझ्या मनांत आलें.

आणि मग एके दिवशीं अकस्मात् तारिणीबाई माझ्या खोलींत आल्या तेव्हा मला अतिशय विस्मय तर वाटलाच; पण आनंदहि झाला.

त्यांच्या खांद्यावर हात ठेवून मीं हसतहसत म्हटलें, " ओहो-हो ! किती दिवसांनी माझी आठवण झाली ही तुम्हाला ? बसा ना. "

तारिणीबाई बसल्या; पण जणू दुसऱ्या क्षणीं त्यांना उठावयाचें असल्यासारख्या बसल्या होत्या त्या

त्या गडबडीने हलक्या स्वरांत म्हणाल्या, " फार बसायला वेळ नाही मला. मी आपली तुम्हाला सूचना करायला आलें, की तुम्ही मंडळांतून नांव काढून टाका. "

" तें काय म्हणून ? "

" त्यांतच तुमचं हित आहे मी आपली मैत्रीखातर तुम्हाला सूचना करतें आहे. " तारिणीबाई अजीजीने बोलत होत्या.

" पण कारण काय त्याला? मला वाटलं तर काढीन नांव, नाहीतर नाही. " असें मीं बोललें खरी; तरी मनांतून मी चमकलें होतें.

" मला तें तुम्ही कांही विचारूं नका. मला त्याचं उत्तर देणं अशक्य आहे. पण खरंच माझं ऐका तुम्ही. " तारिणीबाई मला विनवीत होत्या.

" बरं पाहूं. " मीं बेपर्वाई दाखविली.

तारिणीबाईंना निराशा वाटली असावी. दोनतीन मिनिटें त्या हातांतील बांगडीकडे बघत ती भराभर फिरवीत विचार करीत होत्या. नंतर एक उसासा टाकून त्या उठल्या.

" बरं, जातें मी."

" पण मला सांगा ना सर्व कांही समजावून."

तारिणीबाई जिकिरीने म्हणाल्या,

" नाही मला सांगता येत. पण पुन्हा एकदा सांगतें तुम्हाला, की तुम्ही मंडळांतून नाव काढून टाका. काढाल ना ?" शेवटला प्रश्न त्यांनी आशांकित होऊन विचारला.

माझे रक्त उसळून आलें, " नाही काढणार नांव. परांजपे-सुंदराबाईचा अतिप्रसंग माझ्या दृष्टीस पडला हा कांही माझा गुन्हा नव्हे !"

" असं झालं होय ? मला वाटलंच होतं असं कांही असणार म्हणून. आणि ही गोष्ट लपवण्याकरिता ते उलट तुमच्याबद्दल वेडं-वाकडं सांगताहेत !"

" काय सांगताहेत ?"

" की तुमचं त्यांच्यावर प्रेम आहे. आणखी वाटेल तें बोलतात ते. म्हणून म्हणतें, तुम्ही नांव काढा."

" अस्सं काय ! मग मी उलट उद्यापासून रोज मंडळांत येणार !" संतापातिरेकाने मी बेभान झालें होतें.

तारिणीबाई हसल्या. दिव्यावर झाप टाकणाऱ्या पतंगाकडे बघून शहाणा मनुष्य हसतो तसें हसणें होतें तें.

पण माझा निश्चय त्यामुळे दुणावलाच !

मी दुसऱ्या दिवशीं मंडळांत गेलें तों खास कंपूंतील वीसपंच-वीस लोकांची विद्युद्वेगाची नेत्रपल्लवी झाली. इतरहि मंडळी जरा आश्चर्यानेच बघत होती.

नंतर डॉ. प्रधानांनी पुढे येऊन विचारलें, " कां ? बरेच दिवसांनी आळांत ?"

परांजपे माझ्याकडे गुरकावून पाहात होते. सुंदराबाईंनी माझ्याकडे डोळा घालून परांजप्यांना खुणावलें व एक कुचेष्टापूर्ण स्मित हास्य केलें. बायकाबायकांतहि थोडी कुजबुज झाली. मला वाटलें, उभें राहून सगळ्यांना कारण विचारावें, परांजप्याबद्दल खरें सांगावें. पण मी मोठा निग्रह करून गप्प बसलें.

परांजपे, सुंदराबाई, डॉ. प्रधान व अम्मा लॅडिस खेळत होतीं. परांजपे मधूनमधून बोलत होते, " वा सुंदराबाई, काय आताशी बहारीचं खेळता तुम्ही ! " अन् सुंदराबाई तिरप्या नजरेने हसून आभार मानीत होत्या. माझ्याशीं फारसें कोणी बोललेंच नाही. कुणीं मला खेळायलाहि घेतलें नाही.

अपमानित होऊन मी क्षुब्ध चित्ताने घरीं निघालें होतें; तितक्यांत मागून परांजपे येऊन म्हणाले, " उद्या संध्याकाळीं मला जरूर भेटा. फार महत्त्वाचं बोलायचं आहे. "

मी दुसऱ्या दिवशीं मुद्दामच झोपडीमागे गेलें.

मी दगडावर बसून सूर्यास्त बघत होतें व हाताने खडे उडवीत होतें. परांजपे शेजारीं येऊन बसले तरी मीं त्यांच्याकडे बघितलेंच नाही.

जरा वेळाने परांजपे म्हणाले,

" कां ? बरेच दिवसांनी मंडळांत आलांत काल ? कसं काय वाटलं ? "

" तुमच्यासारखा मित्र मिळाला म्हणजे काय होतं तें कळलं मला. "

" काय हो–" परांजपे खुनशीपणाने डोळे बारीक करून म्हणाले, " तुम्ही सुंदराबाईंच्या घरीं आलां होतांत त्या गोष्टी तुम्ही तारिणीबाईंच्याजवळ सांगितल्यात. तुम्हांला कांही वाटत नाही ? "

" कुणाला ? मला म्हणतां हें ? "

" हो हो, तुम्हांला. "

परांजप्यांचा वरला ओठ खाली पडला होता. नाक फेंदारून श्वास जोरांत चालला होता. डोळे वटारले होते. भयंकर खुनशी दिसत होते ते.

पण ते इतके चिडले यांतच मला एक प्रकारचा सूडाचा आनंद मिळत होता. मी तिरस्काराने हसलें. स्वरांत आणवेल तितका उपहास आणून मीं विचारलें,

" मीं नुसती तो गोष्ट सांगितली. ती गोष्ट करणारांना जर त्याचं कांही वाटत नाही तर मला कांही वाटायचं कारण काय? आणि तुम्ही तर माझ्याबद्दल खोटया गोष्टी मंडळांतल्या लोकांना सांगत सुटलां आहां, तेव्हा मीच तुम्हांला विचारतें, की असं वागतांना तुम्हांला कांही वाटत नाही ?"

" तारिणीबाई हें असं करायला लागली काय?" मान वरखाली हालवीत परांजपे दात आवळून बोलले. सापाच्या फूत्कारासारखा तो आवाज वाटला मला.

" फारच चांगली बाई आहे ती." मी मुद्दामच परांजप्यांना आणखी चिडवण्याकरिता बोललें.

पण मी सापाला डिवचीत होतें !

परांजपे दोनचार मिनिटें अगदी स्तब्ध बसले. नंतर माझ्याकडे ते हसून पाहूं लागले

आजपर्यंत त्यांनी असल्या प्रकाराने माझ्याकडे कधी बघितलें नव्हतें. सुंदराबाईकडे ज्या नजरेने पाहात त्याच विषयी नजरेने त्यांनी माझ्याकडे पाहिलें. त्या क्षणींच त्यांची माझ्यावर जी भुरळ पडून राहिली होती ती नष्ट झाली.

मला परांजप्यांची किळस आली. मला नकळत मी जरा बाजूला सरकलें.

"– सुमतीबाई" परांजपे अत्यंत आर्जवाने बोलूं लागले, "तुमचंमाझं प्रेम अशा प्रकारानं तुटावं अशी माझी मुळीसुद्धा इच्छा नाही. मी निराशेच्या भरांत तुमच्यावर रागावलों आणि लोकांजवळ बोलूं

नये तें बोलून गेलों. चार महिन्यांपूर्वी तुम्ही 'हो' म्हणालां असतां तर कशाला मी कांही बोललों असतों ? "

" हें पाहा, आता या असल्या बोलण्याचा माझ्यावर कांही· एक परिणाम व्हायचा नाही. झालं ? हेंच ना बोलायचं होतं तुम्हाला ? मग मी जातें तर. "

परांजपे पुन्हा कपाळाला आठया घालून रागाने फणफणत म्हणाले,

" काल मंडळांत इतका प्रत्यक्ष अनुभव घेतलांत तरी अजून डोळे उघडलेले दिसत नाहीत ! "

" मी आजपर्यंत कुणाला भ्यालेली नाही. तुम्हालाहि मी भीत नाही. जा, काय करायचं असेल तें करून घ्या "

मी कमालीच्या तिरस्काराने आणि उपहासाने बोललें, त्यामुळे परांजप्यांचे हात जणू मला मारण्यासाठी वळवळूं लागले. पण तें शक्य नव्हतें. नुसतें धमकावणें शक्य होतें

" मी मनांत आणीन तर पुण्यांत तुम्हाला तोंड काढूं देणार नाही. माझ्यासारखा मनुष्य एकदा डेस्परेट झाला म्हणजे काय करील तें समजलेलं नाही तुम्हाल ! " ते जहरी स्वरांत बोलले.

" बघूं या ना काय पराक्रम आहे तुमच्या अंगांत ! "

मी इतकें बोलून त्यांना चिडवण्यासाठी मोठयाने हसलें आणि चालू लागलें.

मला एक प्रकारें स्फुरण चढलें होतें. परांजप्यांचें युद्धाचें आव्हान मीं स्वीकारलें होतें.

पण मला हें समजलें नाही, की मी सत्याग्रह करणार असून परांजपे असत्याग्रह करणार होते.

आणि लोकांना सत्य की असत्य हें तोलायचें नसतें. त्यांना फक्त दुर्बळ आणि सबळ हें पाहायचें असतें. सबळ त्याची बाजू सत्य हें समाजाचें उरापोटाशीं आवळलेंलें तत्त्व असतें.

मी रोज मंडळांत जात होतें. कुणी कधी खेळायला घेई. बहुतेक नाहीच. कुणी बोले, बहुतेक कुणी बोलत नसत. पण या गोष्टी मुद्दाम

होताहेत असें स्वरूप नसून सहजगत्या होताहेत असें ते सर्व लोक दाखवीत.

रोज अपमानित होऊन मी घरीं येत होतें. रात्रीं विचारांनी डोकें भणभणून गेल्यामुळे मला झोपसुद्धा येत नव्हती.

तरी मी मंडळांत जातच होतें. पंधरा दिवसांनी मला मंडळांतील वातावरणांत कांही विलक्षणच बदल वाटला. मंडळांत जे कांही मूठभर सज्जन लोक होते त्यांनी जेव्हा मी येतांच माझ्याकडे तिरस्काराचा दृष्टिक्षेप केला तेव्हा मला कसेसेंच झालें! क्षणभर मीं डोळे मिटले; पण ते तिरस्काराचे दृष्टिक्षेप डोळ्यांसमोरून हालेनात. तसेंच परत वळून माघारीं फिरावें असें वाटलें.

परंतु तितक्यांत डॉक्टर प्रधान हसून बोलले, "या खेळायला. चौथं कुणी नाही आम्हांला."

सात वाजतां मी घरीं निघालें तों डॉ. प्रधान आले. "चला, मी तुमच्याच बाजूनं जातों आहे. सोडतों तुम्हाला."

"कांही नको, जाईन मी चालत." असें म्हणून मी चालू लागलें.

मला विचार पडला होता, की परांजप्यांनी माझ्याविरुद्ध आणखी कसला सैतानी डाव टाकला असावा! की हे सज्जन लोकसुद्धा त्यांनी माझ्याविरुद्ध वळविले?

पण नुसता विचार करून मला तें कसें समजणार! मुळी कल्पनातीतच गोष्ट होती ती!

एक गोष्ट माझ्या लक्षांत आली होती. ती ही, की तारिणीबाई मंडळांत येत नव्हत्या.

परंतु अचानक एक वेगळीच घटना घडून आली.

मंडळांतून बाकीची सभासद मंडळी निघून गेल्यानंतर रात्रीं गिड्डूसाहेब, परांजपे वगैरे दहाबारा सभासदमंडळी व बाहेरलीहि कांही मंडळी पत्ते, फासे यांचा जुगार खेळत, हा सुगावा पोलिसांना लागून पोलिसांनी छापा घातला. इतकी बातमी बाहेर फुटली. प

ग काय झालें कोण जाणे! या लोकांना आधीच जप्तीची
ातमी लागून पोलिसांना पुरावा सापडला नाही. नंतर सर्व दाबादाबी
रण्यांत आली. मंडळांतले मोठमोठे लोक मध्ये पडले होते.
मंडळाची प्रतिष्ठा त्यांनी राखून ठेवली.

कांही दिवस परांजपे, सुंदराबाई खेरीजकरून सर्व मंडळी
ाझ्याशीं चांगली वागत होती. परांजपे, सुंदराबाई आणि अशाच दोन-
ीन जोडयांचा प्रेमविलास चालूच असे. इतर लोक या गोष्टीकडे
घडउघड कानाडोळा करीत.

तारिणीबाई मंडळांत पुन्हा येऊं लागल्या असून परांजपे
यांच्याशीं सलोख्याने वागत.

तारिणीबाई माझ्याशीं आपण होऊन बोलत नसत. मी बोललें
री औपचारिकपणें उत्तरें देत. मी त्यांच्याशीं न बोलेन तर बरें असें
या दाखवीत.

● ● ●

# प्रकरण १९ वें

परांजपे, गिड्डसाहेब, डॉ. प्रधान वगैरे मंडळी जुगाराच्या छाप्यापासून चांगलीच दबकली. मंडळांतील प्रतिष्ठित सदस्यांनी त्यांचे चांगले कानच उपटले असावेत.

पण अट्टल जुगारी ते. एकेकाच्या घरीं जमून ते जुगाराची हौस भागवूं लागले.

जुलैनंतर मीं मंडळांत जाण्याचें सोडून दिलें. कारण मीं एम्. ए. च्या अभ्यासाला सुरवात केली होती. शिवाय परांजप्यांनी मागे पाऊल घेतल्यासारखे दिसत होतें. अगदी खास कंपूतील मंडळीदेखील माझ्याशीं चांगली वागत होती. त्यांचा त्यांत डाव होता. माझें मन स्वस्थ रहावें, मला कांही संशय येऊन मी विरुद्ध हालचाल करूं नये म्हणूनच दिसायला कुचकामाचें फाशाचें दान त्यांनी टाकलें होतें.

एखादे दिवशीं मी मंडळांत गेलें की प्रधान माझ्याशीं बोलायला येऊन बसत. बराच लाघवीपणा असे त्या बोलण्यांत. आणि मी घरीं निघालें की ' गाडींतून चला ' म्हणत. परांजपे या गोष्टी बघत असत; पण त्यांना प्रधानांचा कधी राग आला नाही

असें तीनचार वेळां झालें. तेव्हा मी एके दिवशीं कंटाळून "बरं" म्हणून व्हिक्टोरियांत बसलें. दिवेलागणीची वेळ असून गाडींत बराच अंधार होता. आणि बोलत असतां हळूहळू जवळ सरकत येऊन प्रधानांनी माझा हात धरून प्रेमयाचनेला सुरवात केली.

तेव्हा मीं नीटपणें, " असं कांही मला आवडत नाही " असें सांगितलें, तेव्हा " बरं, आता नाही असा वागणार " असें म्हणून ते दूर झाले व त्यांनी निमूटपणें मला घरीं सोडलें.

यानंतर प्रधान माझ्याशीं फार सभ्यपणाने व औपचारिक वागत.

याहि गोष्टीला चार महिने होऊन गेले. यंदा दिवाळीच्या सुट्टीला भाऊ सहकुटुंब आला होता. एकंदरींत सुट्टी चांगली गेली. सुट्टी संपण्याला दोन दिवस अवकाश असतांच भाऊ आपल्या गावीं निघून गेला.

भाऊ गेल्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी माझ्या खोलींत कांही वाचीत बसलें असतां परांजपे आले.

त्यांना बघून मला प्रथम आश्चर्य वाटलें. नंतर चीड आली. त्यांना 'चालते व्हा' म्हणून सांगावेंसें वाटलें. असें मनांत आलें, की कोपऱ्यांतल्या लाल जोडयाने...परंतु घरी आलेल्याला 'जा' म्हणवेना.

परांजपे आपण होऊनच आपले बसले. पान खाऊन रंगलेले दात दाखवून हसत हसत त्यांनी आपल्या पायांतली एक वहाण काढून माझ्यापुढं धरली, " ही घ्या. मनांतून आम्हाला प्रसाद द्यायचा असला तर देऊन टाका."

आता या माणसाला हसावें की रागवावें असा विचार क्षणभर मनांत येतो तों वहाण खाली टाकून परांजपे गंभीरपणाने म्हणाले, " गिड्डूसाहेब आणि एकंदरींतच मंडळांतले लोक तुमच्यावर फार चिडले आहेत."

मीं खोचिक स्वरांत विचारलें, " कां? तुमचं मी ऐकत नाही म्हणून?"

माझी खोच लक्षांत न घेतां परांजपे म्हणाले, " नाही. चारसहा महिन्यांपूर्वी गिड्डूसाहेबांच्याकडे कांही निनांवीं पत्रं आलीत."

भारल्याप्रमाणे मी परांजप्यांचें बोलणें ऐकत होतें. त्यांचें सर्व कपटनाटक माझ्याविरुद्ध होतें हें मला नक्की समजत होतें. पण तें त्यांनी कसें रंगवलें होतें तें नीट सर्व एकदा समजून घेण्याचीहि तीव्र उत्सुकता मनाला लागली होती.

" कसलीं पत्रं? काय मजकुराचीं?" मीं विचारलें.

" मी सुंदराबाईकडे नेहमी जातों, त्यांचा-माझा वाईट संबंध आहे, अशा मजकुराचीं आहेत तीं. आणि गिड्डूसाहेबांची खात्री आहे, की तीं तुम्हींच लिहिलीं असलीं पाहिजेत."

माझें रक्त एकदम उसळून आलें. काय नीच लोक हे! " कुणीं? मीं लिहिलेलीं निनांवीं पत्रं?"

" हो. नाहीतर दुसरं कोण लिहिणार?"

" दुसरं कोण लिहिणार ? तुम्ही जर सारखे सुंदराबाईकडे ज असतां तर तें पाहून कुणीहि गिड्डूसाहेबाला सावध करण्यासा म्हणून लिहिलीं असतील. आणि गिड्डूसाहेबाला सावध करण्याकरि निनांवीं पत्रं मी कशाला लिहीन ? झोपलेल्याला जागं करतां ये पण जागा असलेल्याला जागं करण्याचा मूर्खपणा कोण करील ? तरी खचित करायची नाही. "

" हे तुम्ही अगदी भलभलते आरोप करतांहां आमच्यावर. अगदी कामाव्यतिरिक्त कधीहि गिड्डूसाहेबांच्या घरीं गेलेला नाही.

" कामासाठी जातां ना ! मग झालं तर. आणि तुमचं क काय असतं तें मीं प्रत्यक्ष माझ्या डोळयांनी पाह्यलंय् त्या दिवशीं.

" खरोखर सुमतीबाई, एक दिवस जरा चुकलों आम्ही केवढा हा पराचा कावळा करतां तुम्ही ? कां बरं तीं निनांवी प लिहिलीं तुम्हीं ? " परांजपे विव्हलता दाखवीत होते.

" पुन्हा माझ्यावर आरोप करतां ? कांही वाटत नाही तुम्हाला ?

" मी नाही करीत तुमच्यावर आरोप. मंडळांतल्या सगळ लोकांची तशी खात्री झाली आहे. मुळी मंडळांतल्या सगळ्याच सभ सदांकडे तुम्हीं निनांवीं पत्रं पाठवीत सुटलां आहां. अशीं पांचस सभासदांच्याकडे पत्रं गेलीं आहेत. तुमच्यावांचून हें काम झालेलं नाही ही सर्वांची खात्री आहे. "

" ती कशी काय खात्री झाली ? "

विठ्ठलराव तिरस्काराने हसले. त्या हसण्याने माझें रक्त गोठ गेलें. परांजपे म्हणाले, " खरोखर, तुम्ही अशा असाल ही म कल्पना नव्हती. काय हो, मी इतकी मनधरणी करीत असतां मो सतीसावित्रीचा आव आणलांत आणि त्या डॉक्टर प्रधानांच्यामा लागून त्यांच्या शिम्प्राममध्ये सारख्या फिरायला जात होतां ! "

" असं सांगताहेत होय डॉ. प्रधान ? आणखी काय म्हणताहे ते ? "

" आता आणखी काय म्हणायचं राहयलं ! "

" मीं त्यांच्याशी अतिप्रसंग केला, त्यांचा विनयभंग केला, असं नाही का ते आणखी म्हणत ? अं ! बेशरम ! बदमाष ! " मी संतापाने आता थरथर कापत होतं. बोलत असतां धाप लागल्या· सारखें होऊं लागलें. संतापाश्रूंनी डोळयांत गर्दी करून सोडली.

" विठ्ठलराव, तुम्हीं माझ्याविरुद्ध हें नीच कारस्थान रचलंत होय ? पण तुम्हीं कितीहि असल्या बातम्या उठवल्यात तरी त्यावर विश्वास कोण ठेवील ? "

" हं: ! विश्वास कोण ठेवील ? तरी बरा तुम्हालाच नीट अनुभव आला आहे. प्रत्येक सभासद म्हणतो आहे, की ही बाई मंडळांत न आली तर बरी. त्या सुंदराबाईंना सारख्या तुम्ही खोचून बोलत होतां ना ? ती गरीब बिचारी बाई तुमच्या बोलण्याची आठवण काढून रडत बसते. "

" अहाहा ! काय पण गरीब बिचारी ! अन् विठ्ठलराव, ती सुंदराबाई मला घालूनपाडून नेहमी बोलत असे तें मी तुम्हाला सांगत होतें ना ? मी तिला आपण होऊन कधीहि वावगं बोललेली नाही. तिच्या वावग्या बोलण्याला मीं फक्त उत्तरं दिलीं. पण बरोबर आहे, आपलं माणूस ना ! आता तुम्हाला सुंदराबाईच्या बाजूनं बोललंच पाहिजे ! "

" हें पाहा, हीं असलीं बोलणीं मला कांही समजत नाहीत. मी आपला साधाभोळा माणूस आहें. "

" वा वा ! सुंदराबाई गरीब बिचारी आणि तुम्ही साधेभोळे ! पण विठ्ठलराव, मी मात्र कांही गरीब बिचारी नाही नी साधीभोळीहि पण नाही. तुम्हाला भिऊन मी गप्प बसणार नाही. मी बोर्डाकडे तक्रार करीन याबद्दल, की तीं निनांवीं पत्रं पोलिसांत तरी द्या, नाहीतर हे गिड्डू-साहेब वगैरे लोक माझी गावभर बेअब्रू करताहेत ती तरी थांबवा. "

बोर्ड म्हणेल, " आम्हांला निनांवी पत्रांची कांही माहिती नाही. आणि तुमची कुणीं बेअब्रूहि केलेली नाही. " परांजपे हसून म्हणाले. माझ्या चिडण्यामुळे त्यांना एक प्रकारच्या सूडाचा आनंद लाभत होता.

मी चिडून जवळजवळ किंचाळत बोललें, "मग तर मग मी सर्व चांगल्या सभासदांना जाऊन भेटेन. सर्व खऱ्याखुऱ्या घडलेल्या गोष्टी आणि तुम्हीं रचलेलीं दुष्ट कारस्थानं मी त्यांना पटवून देईन."

"हळू बोला. ऐकेल कुणी. पण मी म्हणतों, असले हे जहाल उपाय हवेत कशाला?" विठ्ठलरावांच्या स्वरांत मृदुपणा उमटूं लागला.

"पुन्हा तुम्ही नीट विचार करा. मी तुमचा शत्रु नाही, मित्र आहे. तुमच्यावर अजून माझं प्रेम आहे. ऑनेस्टली सांगतों मी हें. मनांत आणीन– म्हणजे तुम्ही मला हो म्हणायचा अवकाश, की मी तुमच्यावर आलेली ही तोहमत सहज दूर करीन"

"ती कशी?"

"तुम्ही मत्सरग्रस्त होऊन गिड्डूसाहेबांकडे पत्रं पाठवलीत अशी लोकांची खात्री आहे. पण त्याच कारणाकरिता तारिणीबाईंनी पत्रं लिहिलीं अशीहि लोकांची खात्री पटवून देतां येईल त्यांच्याबद्दल लोकांना जास्तच खरं वाटेल"

"विठ्ठलराव, तुम्ही कोण सैतान आहांत का त्यापेक्षाहि कुणी वाईट आहां?"

"हें पाहा, असलं कशाला बोलतां? मी तुमच्याकडे आलों तों जोडायला आलों, तोडायला आलों नाही. सुमती, ऐक माझं. माझं तुझ्यावर किती प्रेम—"

"शट् अप्! इतक्या या असल्या माझ्याविरुद्ध गोष्टी करून पुन्हा हें वर बोलतां? गेट आऊट गेट आऊट यू स्काउंड्रल!"

"आता दाखवतों तुम्हाला माझा स्काउंड्रलपणा! मग पस्तावाल."

इतकें बोलून परांजपे उठले व खुनशीपणाने हसत चालते झाले.

मंडळांतल्या सभासदांचें एकदा कडू, एकदा गोड असें वागणें कां घडलें तें माझ्या लक्षांत आलें सगळें. माझ्याविरुद्ध खोटयानाटया गोष्टी सांगून प्रथम विठ्ठलरावांनी सर्व मंडळींचें मन कलुषित करून टाकलें. त्यांना वाटलें मी भिऊन त्यांना कबूल होईन. पण उलट मी जास्तच चिडून तारिणीबाईंना त्या दोघांतला गिड्डूसाहेबांच्या वरील

घडलेला प्रसंग सांगून टाकला. तारिणीबाईंनी त्याबद्दल परांजप्यांना जाब विचारला असावा. त्यामुळे त्यांनी झोपडीपाठीमागे भेट घेऊन पुन्हा एकदा माझें मन वळवण्याचा प्रयत्न केला आणि झालेल्या भांडणामुळे चिडून त्यांनी आपलें पाप झाकण्यासाठी व माझ्या नकाराबद्दल माझा सूड उगवण्यासाठी निनांवीं पत्रांचा व्यूह रचला आणि आपणां दोघांवरच, म्हणजे सुंदराबाई–परांजपे यांच्यावरच सर्वांचें लक्ष वेधू नये, गिड्डूसाहेबांकडेच अशी पत्रें कां आलीं याचा विचार कोणीं करूं नये, म्हणून आणखी पत्रें त्यांनी लिहिलीं किंवा पत्रें आलीं नसतांनाच अशी पत्रें येत असल्याचा त्या विशिष्ट कंपूने खोटा गवगवा केला. डॉ. प्रधानांनी मला वळवण्याचा प्रयत्न केला तोहि फसला. त्यावर मुद्दामच मीच त्यांच्यामागे लागलें अशी त्यांनी रंगसफेती केली. (की शेणगोळा फिरवला?) असलें हें दुटप्पी वागणें कशासाठी? तो सबंध कंपू माझ्याविरुद्ध आहे. कां? ते लोक मला जमीनदोस्त करूं पाहाताहेत तें का? ते मला भीत असले पाहिजेत. नाहीतर माझ्या एकटीविरुद्ध हे वीसपंचवीस लोक कां कांगावा करताहेत?

भेटलें पाहिजे कुणाला तरी आणि माझ्यावर आलेली ही तोहमत घालवलीच पाहिजे.

दुसऱ्या दिवशीं सकाळपासून मंडळांतील तीन लोकांना मी भेटलें. एकांनी घरांत असून वेळ नाही म्हणून सांगितलें; दुसऱ्यांनी मुळीच आम्हाला ही भानगड कांहीच माहिती नाही असें म्हटलें. “निनांवीं पत्रं आलीं आहेत व ते माझ्यावर घालताहेत” असें सांगतांच त्यांनी विचारलें, “निनांवी पत्रं आलींत होय? कुणाला? कशाबद्दल?”

मग काय मी बोलणार? “मला वाटलं, तुमच्या कानांवर आलं असेल म्हणून विचारायला आलें होतें.” असें बोलून माझी बाजू न सांगतांच मी तिसरीकडे गेलें.

ते म्हणाले, “मीं सर्व ऐकलं आहे. पण तुम्ही खऱ्या की ते खरे या गोष्टी बघून आम्हाला काय करायचंय्? या खाजगी भानगडींत

आम्ही कसे पडणार? आपलं दोन घटका मंडळांत जिवाची जरा करमणूक करून घ्यायला आम्ही जातों तिथंहि अशा भानगडी सुरू झाल्या म्हणजे संपलंच!"

"मीं नाही या भानगडी केल्या. त्या कंपूनं हें सगळं कारस्थान रचलेलं आहे. तुम्ही इतर लोक त्या कंपूला भीत असलां तरी निदान तुम्हीं त्यांना तीं पत्रं पोलिसांत द्यायला सांगा, म्हणजे स ं उलगडा होईल."

"छे छे:, तें कसं शक्य होईल? त्यांत सर्वांची अब्रू जाते. मुख्य म्हणजे मंडळाची अब्रू जाते."

"पण ते लोक खोटयानाटया गोष्टी सांगून गावभर माझी बेअब्रू करताहेत त्याला कांही उपाय?"

"तें पाहा बुवा तुमचं तुम्हीच! अन् इतके दिवस तुम्ही गप्प बसलांत त्यामुळं त्या लोकांनी सांगितलेलं आम्हाला तरी खरं कां वाटू नये?"

"पण माझ्याविरुद्ध त्यांनी काय काहूर उठवलं तें जर मला आत्ता कळलं तर मी करूं काय?"

त्या गृहस्थांनी असहाय्यता दाखविण्यासाठी हात पसरले व ते हसले. "आम्ही इतर लोक त्या बाबतींत कांही करूं शकत नाही. तो तुमचा खाजगी प्रश्न आहे. आम्ही कसं त्या लोकांना कांही सांगणार?"

मी निराशेने घरीं आलें.

गिड्डूसाहेब, परांजपे वगैरे मंडळींनी माझ्याभोवती मोठी भिंत रचली होती. माझ्यावर बेअब्रूचा चिखल लिंपून त्यांनी ती भिंत बांधली होती. कां? तर तुलनात्मक दृष्टीने ते लोकांना अब्रूदार भासावे म्हणून. बेअब्रूच्या भिंतींत त्यांनी मला चिणून घातलें होतें आणि इतर लोक स्वस्थपणें सर्व कांही बघत होते. त्यांना बाहेरला चिखल तेवढा दिसत होता.

तो चिखल कुणीं कालवला होता हें बघून लोकांना काय करा-यचें होतें ?

सर्वांत जास्त मोठ्याने ओरडेल तो खरा !

सुंदराबाई आणि विठ्ठलराव यांचा जो प्रेमप्रसंग मीं पाहिला तो कुणाला मीं सांगितला तरी खरा वाटू नये इतकी त्या मंडळींनी माझ्या-विरुद्ध बाजू चितारली होती. त्यांचे माझ्याविरुद्ध आरोप ऐकून ऐकून लोकांचे कान दुसरें कांहीएक ऐकायला आता तयार नव्हते.

माझें पाप काय ? तर सुंदराबाई-विठ्ठलरावांचा प्रेमप्रसंग मी पाहिला, विठ्ठलरावांना झिडकारलें आणि प्रधानांनाहि झिडकारलें.

विठ्ठलराव मला मागे म्हणाले होते, "पुरुष एकदा डेस्परेट झाला, की तो काय करील त्याचा नेम नसतो !" मला आता पटलें, की नेम नसतो खराच !

रात्री कसेंबसें जेवल्यासारखें करून मी हातीं पुस्तक घेऊन बसलें, पण तळमळत होतें नुसती. माझ्या मनाला जसा सर्पदंश झाला होता. मध्येच दार वाजलें म्हणून वर बघतें तों दारांत तारिणीबाई उभ्या.

अशा रात्रीच्या वेळी तारिणीबाईंना पाहून मला आश्चर्य वाटण्यापेक्षा माझ्या काळजांत धस्स झालें ! त्या बाईंचा मला उगीचच राग आला.

"परांजप्यांनी पाठवलं वाटतं ?"

वर्मी घाव बसावा तसें तारिणीबाईंनी केलें. त्यांचा चेहरा पांढराफटक पडला. एक जोराचा हुंदकेवजा श्वास त्यांनी घेतला.

"सुमतीबाई, तुम्ही असं मला बोलतां ? मीं तुमच्याकरिता माझ्या स्वतःवर केवढी आग पाखडून घेतली आहे त्याची तुम्हांला कल्पना नाही !"

मला परांजप्यांचे शब्द आठवले. "तारिणीबाईंनी पत्रं लिहिलीं अशीहि लोकांची खात्री पटवून देतां येईल" असें ते म्हणाले होते. मी अस्वस्थ झालें. तारिणीबाईंचे हात धरून त्यांना पलंगावर बस-वून मीं उतावळीने विचारलें,

" तारिणीबाई, काय झालं तरी काय ? त्या सैतानानं केलं तरी काय तुम्हांला ? "

" तशा भिऊं नका तुम्ही. तसं मला त्यांनी कांहीच केलं नाही. म्हणजे नवीन कांही केलेलं नाही. थोडीशी भर झालं ! "

" भर कशांत ? मला कांहीच समजत नाही. अन् इतक्या रात्रीं कशा आलां तुम्ही ? "

" रात्रीं येण्याचं कारण असं, की मी आलें हें कुणाला समजू नये. आज शनिवार. स्वयंवर आहे गंधर्वाचं. तेव्हा एका मैत्रिणीबरोबर नाटकाला जायचं निमित्त करून आलें. गड्यानं इथं आणून सोडलं. आता पहाटे उठून जाईन मी घरीं. आणि मी येण्याचं कारण म्हणजे, आज मी तुम्हांला मंडळाचीं अंतस्थ रहस्यं समजावून देणार आहे. पण इथं जवळच्या माडीत कुणी नाही ना ? " तारिणीबाईंनी साशंकपणें इकडेतिकडे बघत विचारलें. तरी त्या बोलत होत्या हळू स्वरांतच.

" नाही, कुणी नाही. हा शेजारला दिवाणखाना रात्रीं रिकामा असतो आणि या इकडल्या खोलींत सामानसुमान पडलेलं आ त्या अलीकडच्या माडींत काका आहेत, पण हळू बोललों तर कांही तिकडे ऐकूं जाणार नाही. "

तितक्यांत काकांनी मना हाक मारली. तारिणीबाईंना बसायला सागून मी गेलें, तेव्हा काकानी मला कोण बाई आली आहे म्हणून विचारलें

" कुणी नाहीं शाळेंतल्या ओळखीच्या आहेत. त्यांच्या घरी कुणी मोबतीला नाही. मंडळी गावाला गेली आहेत म्हणून त्या आपल्याकडे आल्या आहेत. "

काकांचं समाधान झालें. मग मी माझ्या खोलीत येऊन दिवा बारीक केला, दारं लावून घेतली व मी तारिणीबाईच्या शेजारीं पलंगा-वर बसलें.

तारिणीबाई काय सांगणार तें ऐकण्यासाठी मी अगदीं अधीर-चित्त झालें होतें. कांहीतरी विलक्षण आपल्या कानांवर पडणार आहे ही माझी खात्री झाली होती.

● ● ●

# प्रकरण २० वें

"सुमतीबाई--" तारिणीबाई हलक्या आवाजांत सांगू लागल्या, "माझी थोडीबहुत हकीकत मी पूर्वी तुम्हाला सांगितलीच आहे. आणि मी सांगितली नसून एक गोष्ट तुमच्या ध्यानात आलीच असेल, ती म्हणजे माझं विठ्ठलरावांवरील प्रेम.

"मी आठ वर्षांची असतांना माझं लग्न झालं. हे बारा वर्षांचे होते. एक वर्षानंतर ते घरातून निघून गेले. मी माहेरी मजेंत होतें. लहर लागली तर शिकतहि असें. आई मला पोटाशी धरून कां रडे तेंहि मला कळत नव्हतं. माझ्या तेराव्या वर्षी माझी आई वारली. वडिलानी दुसरं लग्न केलं. आई गेल्यापासूनच मला माझ्या परिस्थितीची जाणीव होऊं लागली होती, ती सावत्र आईनं नीट चांगली ध्यानात आणून दिली. लवकरच सासूबाईनी मला बोलावणं पाठवलं आणि मग कुठं तरी हाल काढायचे तर आपल्या सत्तेच्या घरी तरी काढावे असा विचार करून मी सासरी आलें सावत्र आईनं मोठ्या आनंदानं माझी पाठवणी केली. सासरी येतांच मला कळून आलं, कीं माझी भीति व्यर्थ होती. सासूबाई अन् मामंजी फार सज्जन माणसं. त्यांनी मला मुलीप्रमाणं वागवलं. पुढल्या दहा वर्षांत मुलाला घरी आणण्यासाठी त्यांनी हरप्रयत्न केले. परंतु ते सर्व निष्फळ झाले! ती दोघं मुलाच्या दुःखानं फारसं वय झालं नसतांना एकदोन वर्षांच्या अंतरानं वारलीं. मीं माझ्या भावाच्या दोन मुलांना सोबतीकरिता माझ्याजवळ आणलं.

"नंतर लवकरच माझे वडीलहि वारले. आता दोन भाचे काय ते माझ्याजवळ राहिले. तीं दोन्हीं मुलं शाळेंत जात असतात.

"माझी सर्व इस्टेट माझ्याच ताब्यांत आहे. मामंजीची ती स्वकष्टार्जित असल्यामुळं त्यांनी मृत्युपत्रात ती मला बक्षीस म्हणून दिली. अर्थात् हे घरी आले तर तें बक्षीसपत्र रद्द ठरेल. परंतु तोंपर्यंत मी इस्टेटीची मुखत्यार आहें.

" यासाठी माझ्या चुलत दिरांची फार इच्छा आहे, की मीं त्यांच्या मुलाला दत्तक घ्यावा. निदान मीं त्यांच्या मुलांना संभाळावं, माहेरच्या मुलांना संभाळू नये ती दोघं नवराबायको मला त्या बाबतीत फार त्रास देतात. मोठी आपमतलबी आणि दुष्ट माणसं आहेत ती मी ऐकत नाहीसं पाहून त्यानी मला नाना प्रकारांनी या चारपांच वर्षांत छळलं आणि त्यापूर्वी मामंजीनाहि छळलं. मामंजीनी मला बजावून ठेवलं होतं, की ' त्याला एक कवडी देऊं नकोस. '

" अशा प्रकारं पंचविसाव्या वर्षापासून मी श्रीमंती व स्वातंत्र्य भोगू लागलें.

" मला एकदा ग्रामोफोन घेण्याची लहर आली. लगेच मी तो परांजप्याच्याकडून घेतला आमच्या ओळखीची सुरवात अशी सहजासहजीं झाली.

" माझी परिस्थिति त्या धूर्त माणसानं तेव्हाच अजमावली आणि माझ्याभोवती त्यानं प्रेमाचं जाळं पसरलं. विठ्ठलरावांची पत्नी त्या वेळी हयात होती पण ते सांगत, की ' ती जुन्या मतांची आहे. देवधर्म, घरकाम आणि मुलं यापलीकडे तिला कांही मुळी सुचतच नाही. ती माझ्याबरोबर कुठं येत नाही, कांही शिकत नाही, त्यामुळं माझं आयुष्य निराशामय आहे. असल्या बायकोवर मी प्रेम कसं करणार ? '

" माझ्यावरल्या प्रेमाची ते मला ग्वाही देत ती मला अगदी खरी वाटे. मला वाटतं, हे मधुकरवृत्तीचे लोकसुद्धा थोडा काळपर्यंत का होईना पण प्रेम करूं शकतात. मला वाटतं, विठ्ठलरावानी वर्ष दीड वर्ष माझ्यावर प्रेम केलं. शनि अकरावा आला म्हणजे कल्पवृक्षाप्रमाणं लाभदायक आणि सुखकारक होतो ना ? विठ्ठलरावांसारख्या लोकांची कृपादृष्टि असली, की त्यांच्या तात्कालिक प्रेयसीला ते तसेंच सुख देऊं शकतात. असले हे लोक म्हणजे खरोखरीच पापग्रहांप्रमाणं असतात. हे जसं आत्यंतिक सुख देतात तसंच आत्यंतिक दुःख देऊं शकतात. स्त्रियांविषयी त्यांच्या अत्यंत अनुदार कल्पना असताना स्त्री ही निर्वळ भोग्य वस्तु असं हे समजत असून त्या या लोकांसाठी

सर्वस्व सोडायला तयार होतात त्याचं कारण तरी हं तात्कालिक सुखच. पण शनि पुढल्या राशीकडे झुकला की आधीच्या राशीला छळल्याशिवाय कध्धी सोडायचा नाही! आपण या पूर्वराशीकडे कृपादृष्टीनं पाहात होतों याची त्याला मुळीच आठवण नसते. जणू दिलेल्या सुखाची त्या पापग्रहाला लाज वाटून तो दुःख देऊन सर्व फेडून घेतो आणि ज्या राशीवर कृपादृष्टि असेल तिला सुखदायी होतो. अर्थात् तात्कालिक

"विठ्ठलरावांची कृपादृष्टि माझ्याकडे वळली होती. मी तर काय, त्यांच्या प्रेमानं वेडी बनलें होतें. खरोखर, पुढलं वर्ष मीं स्वर्ग-सुखांत काढलं. कुणीं कांही बोललं तरी मीं लोकांची पर्वा केली नाही. पुढल्या साडेसातीची मला कल्पना असती तर! .. पण नाही. साडेसाती पुढं नशिबांत असते म्हणूनच शनि प्रथम अकरावा येतो. नशीब कुणाला चुकलं आहे का?

"विठ्ठलरावांनीच मला नुकत्याच निघालेल्या भवानी-विरुपाक्ष मंडळांत नेलं. थोडे दिवस जातात तों आम्हांला गिड्डूसाहेब वगैरे मंडळींनी अंतस्थ मंडळांत घेतलं."

"अंतस्थ मंडळांत म्हणजे काय?" मीं विचारलं.

"तेंच तर सांगायचंय् तुम्हाला. पण तुम्ही कुणाजवळ बोलणार नाही ना? वचन द्या मला. नाहीतर ते लोक माझं काय करतील तें सांगवत नाही!" तारिणीबाई शहारल्यासारखें करून म्हणाल्या. कुणी अदृश्य व्यक्ति खोलींत संभाषण ऐकत असावी असा जणू संशय येऊन डोळे ताणून त्यांनी खोलीभर नजर फिरविली.

"नाही, मी अगदी कुणाला सांगणार नाही. तुम्ही खुशाल विश्वास ठेवा माझ्यावर."

एवढ्याने समाधान होऊन तारिणीबाई बोलूं लागल्या. त्या इतकें हळू बोलत होत्या, की मला पुढे वांकावें लागत होतें.

"सुमतीबाई, तुम्हाला हा जो भवानी विरुपाक्ष मंडळाचा बाहेरला भव्य देखावा दिसतो आहे तो निव्वळ बाहेरला

डोलारा आहे. ताबुताच्या मध्यभागीची थडगी आंत अदृश्य असतात. त्या थडग्यांप्रमाणंच हें अंतस्थ मंडळ लोकांच्या दृष्टींतून लपलेलं आहे. नव्हे, मुद्दाम लपवलेलं आहे. बाहेरले लोक निव्वळ पैसा आणि प्रतिष्ठा यांसाठी आहेत. त्या सज्जन लोकांना आंतली कांहीसुद्धा माहिती नाही. हे खास वीसपंचवीस लोक पुढं पुढं करून दहाबारा प्रतिष्ठित लोकांना संभाळून ठेवतात व त्या प्रतिष्ठित लोकांच्या नांवांवर बाकीची खोगीरभरती व द्रव्यभरती होत असते. या वीस-पंचवीस लोकांचा पुष्कळांना संशय येतो; परंतु त्यांना कांही कळत नाही. भजनं, प्रवचनं आणि कधीमधी व्याख्यानं हीं यांची लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याची साधनं आहेत. कुणाला संशय आला तरी एकी असल्यामुळं या अंतस्थ मंडळाला इतरांवर अव्याहत सत्ता गाजवतां येते."

"पण तारिणीबाई, या कंपूत तरी खरी एकी आहे कुठं? विठ्ठलराव तर त्यांच्यांतली भांडणं मला नेहमी सांगत. ते लोक जणू एकमेकांवर सुऱ्या उगारून आहेतसं वाटतं! ती सुंदराबाई अम्मांवर जळते नुसती. विठ्ठलरावच सांगत असत हो."

"मग खरंच आहे तें. आता तुम्हीच मला सांगा, गिड्डु-साहेबांना विठ्ठलरावांचा राग येत नसेल असं वाटतं का तुम्हाला? गिड्डुसाहेबांनी नवा ग्रामोफोन घेतला त्यांत विठ्ठलरावांनी पस्तीस-चाळीस रुपयाचा तोटा सोसला तो काय गिड्डुसाहेबांच्या स्नेहाखातर? गिड्डुसाहेबांना या गोष्टी कळत नाहीत की काय! पण ते बोलूं शकत नाहीत."

"कां बरं बोलू शकत नाहीत?" मला भामाबाई आणि भाऊ-साहेब यांची मुंबईची सफर आठवली. कृष्णरावांना ती आवडली नव्हती त्याचेंहि मला स्मरण झालें.

"कारण अंतस्थ मंडळांतील पंचवीस लोकांनी अत्यंत भयंकर अशा शपथा घेतल्या आहेत."

भयंकर शपथा म्हटल्याबरोबर मला एकदम कालिकामूर्तीतल्या मठाची आठवण झाली.

" असं आहे होय ? म्हणूनच ते लोक मला इतके घाबरले. त्यांना वाटतं आहे, की मला या सर्व गोष्टी कळल्या असाव्या, म्हणजे मला संशय आला असावा आणि त्यांनी माझ्याविरुद्ध जं काहूर उठवलं त्याचं कारण हें, की या गोष्टी बाहेर फुटू नयेत. मनुष्याला किंवा पशूला बळी देतांना त्याच्या किकाळ्या ऐकूं येऊं नयेत म्हणून एकदम पुष्कळशी ढोलगी मोठमोठ्यानं वाजवतात निनावी पत्रांचा व्यूह रचण्यांत त्यांनी एका धोंड्यानं दोन पक्षी मारले डॉ. प्रधान आणि परांजपे यांची मी निराशा केल्याबद्दल त्यानी माझी गावभर बेअब्रू करून सूड घेतला आणि शिवाय अंतस्थ मंडळाची अब्रु झाकून ठेवली. कसंहि करा, पण आम्हांला नीतिमान म्हणा, अशा अट्टाहासानं त्या अंतस्थ मंडळानं ही तोंडाची ढोलगी वाजवण्याचा उपक्रम केला होता प्रतिष्ठितपणाची शालजोडी पांघरून त्याना नवीन मावजं मिळत हें कारण होतं "

प्रकाश-किरणाप्रमाणे हे विचार क्षणा अर्ध्या क्षणात माझ्या डोक्यांत प्रकाश पाडून गेले. नंतर मी तारिणीबाईना विचारलें, " तारिणीबाई, तुम्हीदेखील शपथ घेतली आहे ? कसली शपथ ? काय नियम आहेत ? "

" तें सर्व नाही सांगत मी. पण थोडं सागतं कारण मी शपथ मोडून सर्व कांही तुम्हांला सांगितलं असं त्यांना वाटतंच आहे अन् त्याबद्दल..."

तारिणीबाई थांबल्याचं पाहून मी अधीरपणें विचारलें, " त्या-बद्दल काय ? त्रास दिला त्यांनी तुम्हांला ? "

क्षणभर तारिणीबाई चलितचित्त झाल्या. नंतर घाईने म्हणाल्या, " नाही, नाही ! पण ऐका ना. या अंतस्थ मंडळांतील पंचविसांपैकी दर वर्षी निवडलेल्या पांचांची जी कांही आज्ञा होईल ती इतरांनी पाळ-लीच पाहिजे. आणि या पंचविसांनी कांही झालं तरी आपसांतील सलोखा सोडायचा नाही हा अगदी महत्त्वाचा नियम आहे. "

" पण तुम्ही विशेष अशा कांही गोष्टी करतां की काय ? इतक्या या शपथा नी सलोख्याचे नियम हवे कशाला ? "

" सांगतं तुम्हांला. दर शुक्रवारी मंडळाची प्रवचनं नी भज होतात हें माहीतच आहे तुम्हाला ? इतर सर्व मंडळी घरोघरीं गेल्य नंतर दहा वाजतां ही अंतस्थ मंडळी अिथं किंवा दुसऱ्या कुणाच्य घरीं जमतात आणि मग अभक्ष्यभक्षण, अपेयपान या गोष्टींचा रात्रभ धुमाकूळ चालतो आणि शाक्तपंथी लोकांप्रमाणं नैवेद्य म्हणून ग गोष्टींचा स्त्रियासुद्धा स्वीकार करतात ! आणि यानंतर काय प्रक ओघानं होत असतील तें तुम्ही तर्कानंच घ्या ! तें सांगण्यांत काही मोठ मजा नाही ! "

" मग बरोबर आहे ते लोक इतके का भितात तें ! या गोष्ट जर बाहेर फुटल्या " मीं बोलणें अर्धवटच सोडलें.

तारिणीबाई हसल्या. किती गूढ अर्थ भरला होता त्यान ! प मला तो उमगला नाही.

तितक्यांत तारिणीबाई पुढे सागू लागल्या, " मला विठ्ठल रावानी या मंडळांत आणलं आणि माझं सुख संपलं. विठ्ठलराव दारू जुगार या व्यसनांत सापडले. मी त्यांना परोपरीनं विनवलं; पण ते ऐके नात. 'तुला बोलायचा अधिकार काय' म्हणून उलट मलाच रागावत मात्र जुगारांत पैसे हरले की माझ्याजवळ पैसे मागत. प्रथम प्रेम खातर आणि नंतर धाकदपटशा घालून त्यांनी माझ्याकडून आठ हजा रुपये घेतले. कांही महिन्यांपूर्वी त्यांनी पांच हजारांची प्रॉमिसर नोट माझ्याकडून लिहून घेतली. "

" अगबाई ! काय भयंकर हें सर्व ! तुम्हीं इतके हे पैसे दिलेत कसे ? ती प्रॉमिसरी नोट कां दिलीत ? "

" कारण माझी अब्रू त्यांच्या हातीं आहे. मला पैसे देणं भाग पडलं. ते पांच हजार अंतस्थ मंडळानं दंडादाखल मागितले. "

" दंडादाखल ? मला तुम्हीं सांगितलंत या संशयावरूनच ना ?

मीं कृतज्ञतेने तारिणीबाईंचा हात हातीं घेऊन म्हटलें, " तारिणी बाई, मला वाटतं तुम्ही नुसत्या मला सूचना देऊन थांबलां नाही त माझ्याकरिता विठ्ठलरावांचा राग तुम्हीं आपल्यावर ओढवून घेतल

खरं ना पण? माझ्याकरिता तुम्ही आपल्यावर हा भूर्दंड ओढून घेतलांत."

तारिणीबाई कांही न बोलतां नुसत्या हसल्या नंतर त्यांचे डोळे एकदम पाण्याने भरून आले. "सुमतीबाई, एखाद्या माणसाविषयी मला जिव्हाळा वाटू लागला म्हणजे मी काय काय करीन त्याचा नेम नसतो. तुमची आता या मंडळींनी जी बेअब्रू केली त्यांतून तुम्हाला वांचविण्याकरिता मीं अतिशय प्रयत्न केले, पण ते वाया गेले. तुम्हाला विठ्ठलरावांनी मंडळांत व्याख्यान देण्यासाठी आणलं तेव्हापासूनच त्यांचा पुढला डाव मीं ओळखला होता. मला विठ्ठल-रावांचा सूड घ्यायचा होता आणि तुमच्यावर कांही संकट येऊं नये असं मला फार वाटू लागलं. माझ्या मनाची अशी आपली एक भावना झाली, की तुम्हाला मी या लोकांच्या कचाटयांतून सोडवलं की माझ्या पापांचं अंशतः तरी क्षालन होईल. पण नाही तें माझ्या नशिबीं! मामंजींनी निढळाच्या घामानं इतकी संपत्ति कमावली आणि मी ती या लोकांच्या पायांशीं ओततं आहे."

तारिणीबाई हुंदकेवजा हसल्या. डोळ्यात साचलेली आसवें त्यांनी पदराला जोराने पुसली. त्या स्वतःवरच चिडल्या होत्या.

कृतज्ञता आणि सहानुभूति या दोन्ही भावना माझ्या हृदयांत उचंबळून आल्या. मीं तारिणीबाईचा हात हाती घेतला. शाब्दिक आभारांना त्या वेळीं किंमत नव्हती.

नंतर पांच मिनिटें आम्ही दोघी स्वस्थ बसलों. डोक्यांत मात्र विचारचक्रें चालूच होतीं. विचार करतां करतां अचानक एक विचार माझ्या डोक्यांत आला. मीं तारिणीबाईंना प्रश्न केला,

"पण तारिणीबाई, ते लोक तुमच्यावर रागावले असून तुम्हाला अंतस्थ मंडळांतून काढून कां टाकीत नाहीत?"

"कारण मला त्यांच्या फार गोष्टी कळल्या आहेत. मंडळांतून मीं निघालें की मी त्या बाहेर बोलल्यावांचून राहाणार नाही. गिड्डूसाहेब, परांजपे, प्रधान वगैरे सर्वच मंडळी लौकिकाला फार जपतात. प्रतिष्ठित नागरिकांत मोडतात ते. मग त्यांचीं कारस्थानं बाहेर फुटून फसं

चाचलेल ' विठ्ठलरावांना माझी इस्टेट गिळंकृत करण्याची इच्छा आहे. ते माझ्या मागं लागले आहेत की मला किंवा माझ्या एखाद्या मुलाला दत्तक घ्या म्हणून किंवा तें जरी मी ऐकलं नाही तरी ते माझ्याकडून पैसे घेतातच. "

विठ्ठलरावांचें एकंदर आंतलें काळेंकुट्ट स्वरूप पाहून माझ्या अंगावर शहारे आले ! ' वरुनी दिसे गोजिरवाणा, परी अंतरी पिशाच्च जाणा. '

" असले का आहेत विठ्ठलराव ? किती प्रथम भोळेभाबडे नी प्रेमळ वाटतात ! मला त्याचा वाईट अनुभव आला, पण अगदी इतके ते असे असतील ही नव्हती कल्पना ! "

" मग तर आणखी ऐका त्याची कृष्णकारस्थानं " तारिणीबाई तिरस्काराने हसून म्हणाल्या.

" 'माझ्यासारखी कशी होशील ?' हं वाक्य पुरुष नेहमी बायकाच्या तोंडी कोंबतात ना ? पण खरोखरी व्यसनी लोकांच्या बाबतींत तें वापरणं अतिशयच सयुक्तिक दिसेल व्यसनी माणसांना नेहमी लोक आपल्यासारखेच व्यसनाधीन केव्हा होतील अशी घाई झालेली असते आणि ' आपणांसारिखे करिती तात्काळ' हेंदेखील संतांपेक्षा व्यसनी लोकच जास्त अंमलांत आणतात. गिड्डूसाहेब, डॉ. प्रधान हे असलेच व्यसनी लोक आहेत या बाबतीत गिड्डूसाहेबाला सुंदराबाईचा अतिशय उपयोग होतो नवीन नवीन मंडळी जुगाराच्या अड्ड्यांत ओढण्याला सुंदराबाई हें एक आमिषच आहे मुळी. "

मीं जुगुप्सा दाखविली; परंतु तारिणीबाई बोलतच होत्या, " जितके जुगार खेळणारे अधिक तितका पैसाहि अधिक खेळता राहातो. शिवाय कुणीं कितीहि पैसे जिंकले तरी गिड्डूसाहेब आणि प्रधान हे दोघे त्याच्यांतून आपला नेमलेला वांटा काढून घेत असतात. कारण यांच्याच जिवावर जुगाराचा अड्डा चालू आहे. गिड्डूसाहेबांचं कापडाचं दुकान म्हणजे निव्वळ देखावा आहे ! तिथं खरोखरी या जुगारासंबंधीच व्यवहार चालतो आणि शिवाय मादक द्रव्यांच्या सिगरेट, कोकेनसारखीं मादक द्रव्यं हींहि चोरूनमारून मिळतात.

गिड्डूसाहेबानं पुण्यांतल्या प्रतिष्ठित डॉक्टर-वकिलांना भुलवून आपल्या जुगाराच्या अड्ड्यांत सामील करून घेतलं आहे."

"आणि प्रतिष्ठित लोक त्यात गुतलेले असल्यामुळंच मला वाटतं सर्व आबादाबांत चाललं आहे."

"अगदी खरं आहे तुमचं म्हणणं. आणि त्या कंपूचे एकमेकांच्या पायांत पाय कसं गुतले आहेत हेंहि तुमच्या लक्षांत आलं असेल."

मला शहारे आले

"काय ग बाई तरी ! ही माणस की सैतानाचे वंशज !"

तारिणीबाई हसून उत्तरल्या, "कौरवांना झालेल्या दासीपुत्रांचे असतील."

जरा वेळाने मी विचारलें, "सर्व कांही माझ्या ध्यानांत आलं. पण तारिणीबाई, या मंडळांतील इतर प्रतिष्ठित लोकांनी या अंतस्थ मंडळाचे खेळ मनसोक्त चालू द्यावे हें नाहीं पटत मला. माझ्या बाबतींत त्यानी असा कानाडोळा का करावा ?"

"सुमतीबाई, जगाची रीतच आहे ती. कौरवांनी भरसभेंत द्रौपदीची विटंबना केली तेव्हा भीष्म, द्रोण, विदुर हे स्वस्थच बसले की नाही ? तुम्ही येण्यापूर्वी अशीच थोडीशी हकीकत घडली. अम्मा, सुंदराबाई वगैरे बायकांनी एका कुलीन घरंदाज बाईला पन्नास लोकांसमक्ष उणंदुरं बोलून तिच्या डोळ्यांतून पाणी काढलं; पण एकानं त्या बायकांना तुम्ही करतां तें अयोग्य असं म्हटलं नाही ! सुमतीबाई, तुम्ही थोडे दिवस तरी मंडळांत नीटपणानं निभावलांत ते त्या विठ्ठलरावांची तुमच्यावर मर्जी होती म्हणून ! त्या बायका त्यामुळं जरा दबकून होत्या. मला निभावून घेणं त्यांना भागच पडतं मुळी !"

एकाएकी सर्वांग रागानें कापूं लागलें. डोळ्यांत मात्र दुःखाचे अश्रु थरथरत होते. मुठी आणि दात आवळले असतांच मीं उद्‌गारलें, "या लोकांना देव शासन कसं करीत नाही ?"

तारिणीबाईनी माझ्या पाठीवरून हात फिरवला. "नका वाईट वाटून घेऊं सुमतीबाई. याला कांही इलाज नाही. त्यांच्या सद्दीचा

जोर संपला नाही तोवर त्यांचं कांही वाकडं होणार नाही हेंच खरं. मी तुम्हाला या सगळ्या गोष्टी सांगायला आलें याचं कारण तुमचा पराभव झाला यांत तुमचा स्वाभिमान दुखावला जाऊं नये म्हणूनच! झाल्या गोष्टी अगदी पार विसरून जा. ते लोक पंचवीस तोंडांनी बोलतात. तुम्ही एकटया आहांत. तुमच्या बाजूला कुणी नाही. तेच लोक भेकड आहेत. कारण त्यानी तुम्हाला भिऊनच हें सगळं केलं."

पण माझें मन शांत होईना! माझ्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

मग तारिणीबाईनाहि स्वस्थितीच्या जाणिवेनं मन आवरेनासं झालें. त्याहि रडूं लागल्या.

जरा वेळाने अंधुक उजेड खोलीत आला तेव्हा आमचं घडयाळा-कडे लक्ष गेलें, तों चार वाजले होते.

तारिणीबाई लगबगीनं उठल्या. मी त्याचे पुनःपुन्हा आभार मानले आणि त्यांनी मला धीर देण्याचा प्रयत्न केला. मग "पुन्हा कधी देवदयेनं भेट होईल तेव्हा भेटू" असें बोलून त्यांनी उदासपणें माझा निरोप घेतला. त्या गेल्या तेव्हा मलाहि फार वाईट वाटलें

● ● ●

## प्रकरण २१ वें

मीं मंडळाचा राजीनामा लिहून पाठवला
विठ्ठलरावांनी आणखी मला भुळीला मिळवायचा शेवटला प्रयत्न केलाच पण तो फसला !

शाळा सुरू झाल्यावर त्यांनी हेड मिस्ट्रेसला भेटून माझ्याविरुद्ध कांही सागण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांना चार वाक्यांपलीकडे बोलू न देतां हेड मिस्ट्रेसनी " गेट आऊट ! " म्हणून संतापून सांगितलें

त्यानी मला बोलावून ही हकीकत सागितली मी घाबरून त्यांना सर्व सांगू लागलें तेव्हा ममतेने त्या म्हणाल्या, " कांही काळजी करूं नको तूं. हे असले लोक मी ओळखून आहे आणि त्यांची भीतीहि मनात धरूं नको."

एकदा काकांनी मला प्रश्न केला, " काय ग सुमती, त्या दिवशीं तुझ्या खोलींत झोपायला बाई आली होती ती तारिणीबाईच नव्हे का ? "

मीं दचकून विचारलें, " कां ? तुम्हाला कसं कळलं ? "

काकांनी उत्तर दिलें, " त्या बाईच्या गड्यानं परांजप्यांना सांगितली ती माहिती. ती त्यांनी मला सांगितली. खरोखर सुमती, त्या वाईट बाईशीं तूं मैत्री करून शेवटी आपलं नांव मात्र खराब केलंस. " काका आणखी मला बोलूं लागले तेव्हा मीं त्यांना गप्प केलें.

चार दिवसात मीं काकांचें घर सोडलें आणि बोर्डिंगांत राहायला गेलें.

काकांची आणि परांजप्यांची पुढे फार दोस्ती जमली.

इतके दिवस मी नुसती अबोल होतें. आता आणखी कुढेपणा आला. मला चिडल्याप्रमाणे झालें होतें. अभ्यासांत माझें मुळीच लक्ष लागत नसे. काम मात्र मी मनापासून करी. त्यांत काय वेळ जाई तेवढाच चांगला. बाकीच्या वेळाची मला भीतीच वाटे !

जगांतलें युद्ध संपलें होतें. माझेंहि संपलें होतें आणि मीं अपजय घेतला होता. जगांत शांतता नांदूं लागली होती; परंतु माझ्या डोक्यांत रणधुमाळी चालत असे.

मीं काकांच्या घरून जरी बोर्डिंगांत राहायला आलें तरी मीं महिन्याने एकदा त्यांच्याकडे जाण्याचा नियम ठेवला होता. अगदी औपचारिक भेट.

त्या वेळीं रस्त्याने जाताना ओळखीचे लोक मला टाळतात की काय असा मला संशय आला. विठ्ठलरावांनी आपली प्रतिज्ञा खरी केली होती. त्यांच्या बोलण्यावर लोकांचा पूर्ण विश्वास होता! मजा ही, की कोणीहि येऊन मला पत्रासंबंधी खरा प्रकार काय म्हणून विचारलें नव्हतें! मंडळांतल्या चाळीस-पन्नास लोकांच्या तोंडून बाहेर पडणारी गोष्ट खोटी कशी म्हणायची!

माझी अनसूया नावाची शाळेंतली मैत्रीण होती आणि तिचें आईच्या खटपटीमुळे लग्न जमलें होतें. ती इतके दिवस पुण्याला कधी आली की मला भेटत असे. या खेपेला मात्र ती मला भेटायला आली नाही. तिला आता माझ्याशी ओळख ठेवण्यांत कमीपणा वाटत होता. तिच्याविरुद्ध आणि तिच्या आईविरुद्ध पूर्वी लोकांनी आम्हांला सुच-वलें असून मी मात्र तिच्याशी मैत्री कायम ठेवली होती! जग हें असें आहे.

पोत्यांची रास रचलेली असते. जातांजातां एखाद्या पोत्याला धक्का लागून तें खाली अंगावर कोसळतें. सर्व शक्ति खर्चून तें दोन्ही हातांनी सावरावें तों दुसरीहि पोतीं अंगावर कोसळून येतात. संकटांचें तसेंच आहे. एक संकट येऊन थांबत नाही. एकामागोमाग तीं येतच असतात. जीव गुदमरला तरी तीं येनातच!

मला इन्फ्ल्युएंझा झाला. त्यांतून मी चार दिवसांत उठलें. आणि मग मला एक दिवसाआड मलेरिया लागला.

बाकी पुष्कळजणींना इन्फ्ल्युएंझा झाला; पण त्या सर्वजणी नीट ब-या झाल्या.

शरीर आणि मन दोन्हींच्या यातना मी भोगीत होतें. वाळवंटा-वरच्या मासळीसारखी मी तडफडत होतें. इतर जलचर लाटांबरोबर मजेंत डुबतांना माझ्या तारवटलेल्या डोळ्यांना दिसत होते.

कधीकधी अति विचारांनी पाठीमागल्या मेंदूचा भार वाटूं लागे. सबंध मेंदूवर दुःखाचे चरे उमटत असल्याचा भास होई. मग मला

भीति वाटे— मी वेडी तर नाही ना होणार ? अंग शहारून जाई ! भीतीने काळीज धडधड उडे !

आणि एकदा सहज नुसती बसलें असता नकळत टेबलावरच्या कात्रीशीं खेळतांना मांडीवरल्या लुगडयाचा दोन इंच लांबीरुंदीचा तुकडा कापल्याचें जेव्हा माझ्या लक्षांत आलें तेव्हा मात्र मी फारच घाबरलें !

मग मनाचा अगदी निग्रह केला, कीं असं नाहीं उपयोगी. झाल्या गोष्टींसंबंधी विचार मनांत येऊं लागला कीं मी गीतारहस्य घेऊन बसे. एम्. ए. च्या अभ्यासाचा नाद केव्हाच सुटला होता. आता मीं कुराण, गीता. बुद्ध धर्मावरील मराठीतली दोनतीन पुस्तकें, थिऑसफी या निरनिराळ्या धर्ममार्गांचा अभ्यास करण्यास सुरवात केली. शिवाय प्राणायाम, ध्यान आणि शारीरिक व्यायाम याहि गोष्टी सुरू केल्या यामुळे माझी शरीरप्रकृति आणि मनःस्थिति दोन्ही सुधारलीं

प्राणायामक्रियेवर माझा अत्यंत भरंवसा बसलेला आहे. कोकेन घेतल्यानंतर किंवा बेताचें मद्य घेतल्यानंतर एक प्रकारच्या आनंदलह-रींनी मन आंदोलित होत असतें वगैरे वर्णनें मी वाचलेली आहेत. मला वाटतं, की प्राणायामाने एक प्रकारच्या शांत आनंदाने मन भरून जातं. त्यात उच्छृंखल विचार, उच्छृंखल आचार तर होत नाहीतच आणि प्रकृतीवरहि इष्ट तो परिणाम होतो. दुःखविस्मृती-साठी म्हणून जे कोणी मादक पदार्थांचा उपयोग करण्याची इच्छा करतात आणि त्या व्यसनांच्या नादाने पैसा व आयुष्य यांची खराबी करून टाकतात त्यांनी प्रथम प्राणायाम जरूर अभ्यासावा असं मला वाटतें.

वरील सर्व धार्मिक पुस्तकें वाचून मीं विचारान्ती निष्कर्ष काढला तो हा, की देव मुळीच नाही. जग उत्पन्न करणारी एक महा-सामर्थ्यवान् शक्ति असलीच पाहिजे. परंतु प्रत्येक मनुष्याचें हितान-हित कमीजास्त करण्याचें सामर्थ्य तिच्यांत नाही.

पण—

आपण चांगलें वागलों तर आज ना उद्या देव आपलें चांगलें करील, तो आपल्यावर प्रेम करतो, तो आपलें रक्षण करतो आणि संकटसमयीं त्याचा धावा केला म्हणजे तो सहाय्यार्थ धावतो, दुःख भोगण्याचें सामर्थ्य देतो, अशी निःसीम श्रद्धा अंतःकरणांत नंदादीपाप्रमाणे तेवत राहाणें म्हणजे मोठी समाधानाची गोष्ट असते. ती श्रद्धा मनाला शांत आणि सोज्वळ प्रकाशाने समाधानांत ठेवूं शकते.

या श्रद्धेमुळे आत्यंतिक निराशेपासून मनाचा बचाव होतो. मनुष्य पापापासून अलिप्त राहातो आणि त्यामुळे त्याचें व समाजाचें कल्याण होतें.

श्रद्धाळु मनुष्य त्रासदायक प्रश्नांमागे कधी लागत नाही. अनीतिमान लोकांना प्रायश्चित्त कां मिळत नाही? नीतिमान्, निष्पाप लोकांच्यामागे संकटें हात धुऊन कां लागतात? कौरव इतके पापरत असून त्यांचा सबंध जन्म वैभवांत आणि आरामांत गेला. शेवटीं त्याना वीरोचित मरण आणि स्वर्गलाभहि झाला.

पाडवाना अपरंपार दुःखें, संकटें, अपमान वगैरे भोगावी लागून शेवटीं जय मिळाला तो अधर्मयुद्ध करून. पुन्हा जन्मांत एकदा, तें-सुद्धा कृष्णाच्याच सांगण्यावरून धर्मराज खोटें बोलला तरी त्याचा रथ जमिनीवरून चालू लागला व शिवाय नरक पाहावा लागला. कां असें झालें?

कुणाला याचें उत्तर सापडले आहे? श्रद्धाळु मनुष्य अशा प्रश्नाच्या वाटेला जातच नाही. फार शहाणपणाचें आहे तें. नाहीतर उगीच डोकें पिकवण्यांत काय अर्थ?

केवळ करमणुकीखातर या विषयाचा विचार ज्याला करतां येत नाही त्याने तो विचार करूंच नये.

"कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु, मा विचारेषु कदाचन।"



# प्रकरण २२ वें

दोन वर्षांतच मला बोर्डिंगांत राहाण्याचा कंटाळा आला. घंटेबरोबर चहा, घंटेबरोबर जेवण, रात्रीचें जेवण सहा वाजतां व सदैव मुलींच्या नजरेखाली राहायचें या गोष्टी पुढे पुढे मला जाचक होऊं लागल्या.

माझी दूरची एक विधवा बहीण होती. वीस वर्षांचंच वय, पण दुःखानुभवानें पोक्तपणा अंगी आलेला होता. तिला मी पुण्याला बोलावून घेतलें आणि मी सदाशिव पेठेंत चांगलीशी जागा घेऊन राहूं लागलें. यामुळें मला सोबत होऊन जेवणाखाणाची उत्तम सोय लागली. माझी बहीण ताई हिला सासरच्या हालांतून काढल्याबद्दलच माझे मोठे उपकार वाटत होते. त्यातच मी तिच्या नांवें महिना दहा रुपये बॅकेंत ठेवीत असल्याचें ऐकून तिला फारच कृतज्ञता वाटूं लागली. पतिपुत्रनिधनाच्या दुःखानें पोळलेलं तिचं मन आपोआप समाधानी होऊन तिचा मूळचा आनंदी आणि बालका स्वभाव बाहेर उमटूं लागला. ती माझ्याजवळ हौसेनें मराठी शिकूं लागली. दोन वर्षें आम्ही दोघींनी मोठ्या मजेंत काढली

सन १९१८ ते सन १९२२ यामधील काळ हिंदुस्थानच्या इतिहासांत अतिशय महत्त्वपूर्ण आहे फार चांगला, फार वाईट आणि एकंदरीत खळबळ उडवून सोडणारा तो काळ गेला.

हिंदुस्थानचे अनभिषिक्त राजे लोकमान्य टिळक हे इंग्लंडहून परत आले. पुण्यांत त्यांची केवढी थाटाची मिरवणूक निघाली! मी मुद्दाम तेवढ्यासाठी काकांच्याकडे राहायला आलें होतें.

आणि नंतर १९२० साली हिंदुस्थानच्या ऐन आणीबाणीच्या वेळी तो लोकनायक हिंदुस्थानला सोडून गेला! टिळकांच्या अस्थींची मिरवणूक पुण्यांत निघाली तीहि अभूतपूर्वच! मिरवणुकींत त्या दिवशी जनसंमर्द नव्हता— माणसें म्हणजे शोकसागराच्या लाटा होत्या.

टिळकांच्याकरिता तीन लाखाचा पर्सफंड जमला. त्यांच्या देहावसानाच्या वेळी त्यांचा प्राण वांचावा म्हणून आपले प्राण द्यायला

तयार असणाऱ्यांची मोजदाद केली असती तरी मला वाटतं तीन लाख भरली असती!

त्यानंतर गांधींचं असहकारयुग चालू झालं.

मूठभर लोकांनी नोकऱ्या सोडल्या आणि पसाभर लोक देशी कपडे वापरीत होते. घरोघरीं चरखे फिरूं लागले होते.

मलाहि वाटे, द्यावी नोकरी सोडून. पण लगेच विचारान्ती त्यात काही अर्थ नाहीसें वाटे. कारण पुरुषांना दुसरा उद्योगधंदा करतां येतो, पण स्त्रियांनी काय करायचं?

देशी कपड्यांवर सरकारी कटाक्ष. काळी व तपकिरी पातळें देशी म्हणून निघाली होती, ती कुचकी व विटकीं निघतच, शिवाय ती देशी नसून जपानी आहेत, त्यावरील देशी छाप मारलेले खोटे आहेत, अशाहि बातम्या कळूं लागल्या तेव्हा सर्वांची फार चमत्कारिक परिस्थिति झाली होती. देशी कापड व इतरहि वस्तु वापराव्या अशी इच्छा असूनहि त्यांचा पुरवठा होत नव्हता.

माझ्यापुरती मी एक तोड काढली होती गेल्या मे महिन्यांत मी भाऊकडे इंदूरला गेलें होतं. तेथे मी इतकी शिकलेली आहे वगैरे कळतांच निरनिराळ्या संस्थांतून, विशेषतः मुलींच्या शाळेंत, माझीं व्याख्यानें झाली होती या लोकप्रियतेचा फायदा घेऊन मीं वशिला लावून खास दोन लुगडी काढविण्याची व्यवस्था केली होती त्या लुगड्यांचें सूत, वीण, रंग सर्व देशी घ्यावयाचें होतं

तीच देशी लुगड्याची जोडी तयार होऊन आज दसऱ्याच्या सुमुहूर्तावर माझ्या हाती पडली होती. परंतु आज टिळक पंचांगाचा दसरा होता. मी शाळेंतून नुकतीच आलें होतें, तों पार्सल येऊन पड-लेंच होतें.

इतके महिने मीं अधीरपणें त्या लुगड्यांची वाट पाहिली होती. आता वरल्या दोऱ्या सोडीपर्यंत मला धीर निघेना. मीं खचाखच दोऱ्या चाकूने कापल्या व कागद घाईघाईने बाजूला केले.

काय सुंदर लुगडीं होतीं पण! पोताला जरा जाड असूनहि दिसायला नाजुक दिसत होतीं. एक पारव्या काठ्यांचें आणि एक काळी चंद्रकळा. खवले काठ तीनतीन बोटांचे आणि पदर साधा रेशमी.

पण किंमत कांही कमी नव्हती पडली ! दोन लुगड्यांचे पंचा-ऐशीं रुपये झाले होते !

चंद्रकळेची मीं तावडतोब घडी मोडली.

त्याबरोबर ताई आणि वाड्यांतल्या दुसऱ्या बायकांनी "किती सुरेख दिसतेय् तुम्हाला ही चंद्रकळा !" म्हणून माझी स्तुति केली. लुगडीं देशी असल्याचें ऐकून तर सर्वांनी कौतुक केलें.

मग त्या सर्वजणी निघून गेल्या ताईदेखील बाजारहाट करण्या-करिता गेली.

मी एकटीच घरांत बसलें होतें. इतका वेळ माझी वृत्ति किती उल्हसित झाली होती ! परंतु हळूहळू तेथे औदासिन्य संचरूं लागलें. मनाला हुरहूर वाटूं लागली.

आई असतांनाची मला आठवण झाली. त्या वेळीं सवड असेल तसें एका वेळेला एक लुगडें घ्यावें लागे धनवडीं लुगडीं चांगलीं टिकणारीं आणि बारापंधरापर्यंत मिळत म्हणून तींच मी बहुधा घेई. आईने बारा रुपये दिले की मी आणखी दोनतीन रुपये दे म्हणून हट्ट धरायची. आई "सवड नाही" म्हणाली की मीं म्हणे, "मी थांबेन दोन महिने." आणि आई मला खरोखरी थांबायला लावी आणि मी थांबत असे. मग एकदाचें चौदापंधरा रुपयांचें मनाजोगें लुगडें आणलेलें नेसतांना मला कोण दिमाख वाटायचा अन् कोण आनंद व्हायचा ! मग त्यांना किती जपायचें !

आता मला काय कमी होतें ? मला जवळजवळ दीडशे रुपये पगार मिळत होता. बँकेंत माझ्या नांवें पांच हजार रुपये साचले होते. शिवाय मीं हजारांचीं कॅश सर्टिफिकेट्स् घेतलीं होतीं.

आज मीं पंचाऐशी रुपये एका लुगड्याच्या जोडींत खर्चले होते. पण जितके महिने मीं त्या लुगड्यांसाठी वाट पाहिली तितके दिवस काय, पण तितके ताससुद्धा माझा आनंद टिकून राहिला नाही !

बायका मला म्हणत होत्या, "किती सुरेख दिसतेय् ही चंद्र-कळा तुम्हाला !"

काय करायची त्या बायकांची प्रशंसा मला? तशी प्रशंसा आपल्या माणसाने करण्यांत खरीखरी मौज असते. तें माणूस आपलें–अगदी आपलें असावें. त्याने आपल्याइतकें दुसऱ्या कुणावरहि प्रेम करतां कामा नये. आपलें सुख हाच मुळी त्याचा स्वार्थ. अन् आपलेंहि त्याच्यावर असेंच प्रेम असावें!

मग त्या माणसाने जर म्हटलें, "किती सुरेख दिसतंय् ही चंद्रकळा ( तुम्हाला नव्हे ) तुला!" तर मग आपल्याला किती बरं मनापासून समाधान वाटेल! ती प्रशंसा आपल्याला किती मौल्यवान् वाटेल! पण आपल्याला असें प्रेमाचें माणूस कुठे आहे? अगदी निष्प्रेम जीवन आहे आपलें! आणि असें एकटीने वणवण हिंडत आयुष्याचे दिवस काढायचे कसे?

माझ्या डोळ्यांतून आसवें झिरपू लागली त्यातच पूर्वीची दुःखें आठवून आठवून माझें रडें थांबेचना.

अन् तशा त्या नाकडोळे लाल झालेल्या अवस्थेंतच दारावर टिक्‌टिक् आवाज ऐकला तेव्हा मी रुमालाने चट्‌दिशी डोळे पुसले आणि दार उघडलें

सुमारें छत्तीससदतीस वर्षें वयाचे एक गृहस्थ दाराजवळ उभे होते. त्यांना पाहातांच प्रथम माझ्या लक्षांत गोष्टी आल्या त्या म्हणजे हे गृहस्थ अत्यंत बुद्धिमान, उच्च विद्यासंपन्न असावे. ते चागले उंच व पिळदार अंगलटीचे असून चेहरा श्यामवर्ण परंतु फारच मोहक होता. त्यांनी सबंध देशी कापडाचा पेहराव केला होता.

मीं "कोण पाहिजे?" म्हणून विचारल्यावर त्यांनी माझ्याकडे पाहून प्रश्न केला, "सुमतीबाई केळकर आपणच का?" सहज बोलतांना सुद्धा त्यांच्या गालाला खळ्या पडत होत्या.

नंतर ते खाली पाहूं लागले. मी रडत असल्याचं त्यांच्या ध्यानांत येऊन त्यांना चमत्कारिक वाटत होतें.

अन् मग मला लाज वाटून हसूं आलें. मी "हो" म्हणून म्हणतांच त्यांनी चट्‌दिशी वर मान केली. मला वाटतें, माझ्या स्वरांत माझें हसणें उमटलें असावें.

नंतर तेहि हसले. किती मोहक अन् मोञ्चळ हसणें होतें त्यांचें ! दंतपंक्ति किती शुभ्र आणि सारखी !

ते म्हणाले, "कांही कामाकरिता आपल्याकडे आलों होतों."

"या आंत."

आम्ही दोघें खुर्चीवर बसल्यानंतर मी प्रश्नार्थी मुद्रेनें त्याच्याकडे पाहूं लागलें, तेव्हा त्या गृहस्थांनी माझ्या हाती एक नामपत्रिका दिली. तीवर मुकुंद भास्कर पटवर्धन, एम्. ए., एल्एल्. बी., असें नांव लिहिलेलें असून विरंजगाव, जुन्नर तालुका, असा स्थलनिर्देश केलेला होता

मुकुंदराव लगेच म्हणाले, "आमच्या विरजगांवाला लोकलबोर्डाची लहान मुलांमुलींची शाळा आहे आणि अलीकडे दोन वर्षांत मोठ्या स्त्रीपुरुषांकरिता आम्हीं दोन वर्ग चालवले आहेत आता बायका कुणी शिकायला कबूल नाहीत ती गोष्ट निराळी पण आल्या तर आम्ही त्यांची शिकवण्याची वेगळी व्यवस्था करणार आहों पुरुष मात्र बरेच येतात. हे प्रौढ वर्ग आम्ही रात्री घेतों लहान मुलामुलींची शाळा आणि प्रौढ शिक्षणवर्ग ही दोन्हीं आम्ही दसऱ्याच्या मुहूर्तावर स्थापन केलीं. त्याच दिवशी आम्ही दोन्हीचा समारंभ साजरा करीत असतों. तेव्हा उद्या आपण येऊन समारंभाचं अध्यक्षस्थान स्वीकारावं अशी विनंती करायला आलों होतों मी"

इतक्या लांबचें हें परगावचें निमंत्रण स्वीकारावें की नाही म्हणून मी जरा घोटाळ्यांत पडलें. तेव्हा मुकुंदराव आग्रहाच्या स्वरांत म्हणाले, "आपल्याकडून नकार येणंच शक्य नाही आम्हाला. कारण आम्ही फार अडचणींत सापडलों आहों. डॉ. इंदुमतीबाई नाईक या अध्यक्षस्थान स्वीकारणार होत्या; पण त्यांना आज वेळ नव्हता. कारण आज पुण्यांत सीमोल्लंघनाची मिरवणूक, व्याख्यानं वगैरे होणार आहेत. उद्या जुन्या पंचांगाचा दसरा आहेच. तेव्हा आम्हीं समारंभ उद्याच करायचं ठरवलं. पण आज सकाळीं मला त्यांचं पत्र आलं, की 'मला येतां येणार नाही, फार निकडीचं काम आहे' म्हणून. तेव्हा मी आता मुद्दाम पुण्याला आलों. मिसेस नाईकना भेटलों तेव्हा

त्यांनीच आपलं नांव सुचवलं. त्यानी आपल्याला माझ्या हातीं पत्रहि दिलं आहे हें पाहा."

मुकुंदरावानी माझ्या हाती डॉ. नाईक यांचें पत्र दिलें. त्यात त्यानी मला जाण्याची आग्रहाची विनंती केली होती आयत्या वेळी त्यांना नकार द्यावा लागल्यामुळे त्यांना फार वाईट वाटत होतं

"नाही" म्हणण्याचें मला आता कारण नव्हतं. शिवाय दुसऱ्या दिवशी सुट्टीहि होती आणि त्याला जोडून रविवारहि आला होता.

तरीपण माझ्या सवयीप्रमाणे माझी नजर भितीवरल्या श्रीकृष्णाच्या तसबिरीकडे गेलीच. मी इतकी निरीश्वरवादी आहें, पण अजून मी त्या तसबिरीकडे बघून सल्लामसलत विचारतें. तसबिरींतील मूर्ति हसली म्हणजे चांगलें आणि तिने उदास तोंड केलें की वाईट अर्थात् हे सर्व माझ्या भावनांचेच खेळ ! या गोष्टींचा पडताळा तरी नेहमीच खरा कुठे येतो ? पण माझा नाद आपला कायम आहे.

मीं त्या तसबिरीकडे बघितलें आणि ती हसल्यासारखें वाटून मी लगेच मुकुंदरावांच्याकडे पाहिलें.

आणि मला एकदम लहानपणची आठवण झाली आणि हसू आलें

मला कांहीतरी ओळखीओळखीसारखें वाटत होतं. पण खात्री पटेना ' आणि माझ्या मनांत आलेली शंका खरी की खोटी तें विचारल्यावांचूनहि जीव राहीना !

मुकुंदराव उत्तराच्या अपेक्षेने माझ्याकडे बघत होते. मी त्यांना विचारलें, "लहानपणीं आपण पुण्यांत होतां का ?"

"हो. कां ?" मुकुंदरावांनी जरा आश्चर्यानेच विचारलें.

"नाही. मला आठवण झाली एका गोष्टीची. एकदा हुजुरपागेंतून मी आणि दुसरी एक मुलगी मोलकरणीबरोबर घरीं चाललों होतों. तितक्यांत मागून एका मुलानं येऊन माझी वेणी धरली अन् तो 'हुजुरपागेंतली घोडी' म्हणून म्हणाला."

मुकुंदरावांच्या मुखावर स्मृतिकिरण चमकलें. तेच पुढं बोलूं लागले,

" अन् मोलकरणीनं त्या मुलाला धरलं तेव्हा तो पळून गेला. मग दुसऱ्या मुलानं त्याला पकडून आणलं. " त्यांनी हसत हसत सांगितलें. त्यांच्या डोळ्यांत विनोद नाचत होता.

" हो, आणि त्या द्वाड मुलाला साळूबाईनी धपके दिल्यावर त्या शहाण्या मुलाला शाबासकी देऊं लागल्या तर तो पळूनच गेला ! "

" अन् ती शेपटेवाली पोरगी, 'आईग....' करणारी, रडकी ! " एवढं बोलून मुकुंदराव एकदम जरा बिचकल्यासारखे झाले ते आले तेव्हा मी रडत होतें ना !

लहानपणच्या आठवणीमुळे आम्ही दोघं परकेपणाची भावना विसरून लहान मुलांप्रमाणे बोलत होतों. माझ्या रडण्यामुळे आम्हांला मोठेपणाची जाणीव झाली. हें नवीनच उत्पन्न झालेलें वातावरण मला रुचले नाही. तें घालवण्यासाठी मीं म्हटलें, " केव्हाकेव्हा मनुष्याला येतं उगीच रडायला ! "

मुकुंदरावांचा चेहरा पुन्हा हसतमुख झाला. ते दोन्ही पंजे पसरून म्हणाले, " मग आम्ही कुठं काय म्हणतों ! लहानपणीं नवे कपडे प्रथम घातले की ते आता घाऊन घालून फाटणार असं वाटून मी नेहमीच रडत असे. "

माझ्या नवीन लुगडयाला उद्देशून ते बोलत होते म्हणून त्याकडे हस्तनिर्देश करून मी म्हणालें,

" देशी आहे हें. मुद्दाम काढवलं आहे हें दुसरं. " मी दुसरी घडी मुकुंदरावांना दाखविली.

" असं का ? " असें म्हणत त्यांनी मोठया कुतूहलाने लुगडें हातांत घेऊन पाहिलें. नंतर त्यांनी कुठे लुगडीं काढवलीं वगैरे सर्व माहिती विचारून घेतली.

मग ते नाराजीने मान हालवीत म्हणाले, " फार महाग ! नुसत्या वस्त्रप्रावरणांत इतके पैसे घालवायचे, मग देशांतल्या देशांत का होईनात, हें कांही बरं नाही. आपल्या दरिद्री देशांत पैशांचा अप-

व्यय आहे हा." माझें तोंड उतरलेलें बघून ते लगेच घाईघाईने म्हणाले, "म्हणजे एकेकदा अशा हौसेच्या गोष्टी करायला हरकत नाही; पण दरवर्षी असे इतके पैसे घाल्वण्यापेक्षा स्वस्त विलायती माल घ्यावा आणि वरले पैसे देशी धंद्याच्या उत्तेजनार्थ धर्मार्थ द्यावे. म्हणजे सरकारी नोकरींत देशी पातळं वगैरे नेसण्याची शक्यता नाही म्हणालां म्हणून म्हणतों मी हें."

तितक्यांत ताई घरीं आली आणि कोणी आल्याचें पाहून आंतल्या स्वयंपाकघरांत जाऊं लागली.

मी मुकुंदरावांच्या देशी कपड्याकडे बघून विचारलें,

"आपण चहा घेतां ना?"

"हो, घेतों."

मीं ताईला चहा करावयास सांगितलं व ती आंत गेली

मुकुंदरावांनी विचारलें, "पण आपण मला ओळखलं कसं? मी दहा वर्षांचा असतांना तुम्हीं मला पाहिलेलं. आता मला छत्तीस वर्षें झालीं. आपण त्या वेळीं पांचसहा वर्षांच्या असाल. म्हणजे इतक्या वर्षांनंतर आपण मला ओळखलंत हें फार आश्चर्याचं आहे!"

"ओळखलं खरं. कसं नी काय त्याच्याशीं काय करायचंय्?"

"बरं राहयलं. हो, पण आपण मूळ काम विसरलोंच की! मग आपण उद्या येणार ना?"

"यायलाच पाहिजे आता."

"खरंच आहे तें. नाही म्हणून कांही भागलं नसतं. एवढं बरं आहे, की तुम्ही अजून शेपटा घालीत नाही. नाहीतर .."

मुकुंदराव मुद्दामच अर्धवट बोलून थांबले पण त्यांतील सूचक अर्थाने आम्हीं दोघें मनापासून हसलों.

तितक्यांत ताई चहा घेऊन आली. आज मला इतकी हसतांना पाहून ती आश्चर्यचकित झाली होती. माझ्याकडे जरा हसून प्रश्नार्थी पाहात ती आंत निघून गेली.

चहा घेत असतांच मुकुंदरावांनी लॉरी कुठे व कशी ठरवायची वगैरे माहिती सांगितली. नंतर त्यांनी माझा निरोप घेतला.

माझें अंतःकरण विलक्षण उल्हासानें भरून गेलें होतें. मुकुंद-रावाची आणि माझी मैत्री जणू ल्हानपणापासून अव्याहत चालत आल्याप्रमाणे मला त्यांच्याविषयी आपुलकी वाटू लागली होती.

अगदी ल्हानपणच्यासारखें मला वाटत होतें. उद्या विरंज-गावला जायचें म्हणून मला फार आनंद झाला होता. ल्हानपणीं आम्ही वाल्हयाला निघालों तेव्हा मीं कांही इंग्रजी शब्द पाठ केले होते आणि अत्यानंदाच्या भरांत "वी गो इन् टु दि वाल्हा" म्हणून मोठमोठ्याने ओरडत उड्या मारीत होतें !

मी आता उघड कांही दाखवीत नव्हतें, पण माझें मन अगदी तस्सेंच वागत होतें.



# प्रकरण २३ वें

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सात वाजतां जुन्नरकडली लॉरी निघाली. मी ताईला सोबतीला घेतलें होतें.

लॉरींत गर्दी होती, परंतु त्रास होण्याइतकी नव्हती. बहुतेक मराठे लोकच असल्यामुळे जागेसाठी भांडाभांडी चालली होती. मग स्थिरस्थावर झाल्यावर सर्वजण गोडीने गप्पा मारूं लागले

मीं स्टॅंडवरून निघतांना ' ज्ञानप्रकाश ' घेतला होता तो मी चाळू लागलें. अन् ठळक अक्षरांतील मथळा मला दिसला--

" भवानी विरुपाक्ष मंडळावर पोलिसांचा छापा ! "

मी पुढील मजकूर आधाशीपणाने वाचू लागलें. माझे हात कापत असल्यामुळे वर्तमानपत्रहि हालत होतें तें कसेंतरी गच्च धरून मीं वाचलें,

" पुण्यांतील बरीच सुशिक्षित मंडळी पत्त्यांचा जुगार खेळण्याच्या आरोपावरून काल रात्री पोलिसांनी मोठ्या शिताफीने मुद्देमालासह पकडली ! या लोकावर पोलिसांचा सहासात वर्षे वहीम असून त्या लोकांनी मोठ्या हुषारीने वागून पोलिसांना चकवलें होतें परंतु या वेळीं मात्र अतिशय सावधगिरी बाळगून अचानक मंडळाच्या जागेंत छापा घालण्यांत आला.

" त्यामध्ये डॉक्टर प्रधान, सुप्रसिद्ध कापडव्यापारी शामसुंदर ऊर्फ गिड्डूसाहेब किरकिरे, ग्रामोफोन वगैरे मालाचे व्यापारी विठ्ठलराव परांजपे अशी एकंदर पंधरा मंडळी पकडण्यांत आली. बहुतेक त्यांची जामिनावर सुटका होईल असा अंदाज आहे. खटले लवकरच होतील. "

" शेवटीं सापडले ! " मीं मनांत उद्गार काढला.

मी मंडळातून निघाल्यानंतर आज चार वर्षं हें मंडळ अत्यंत टींश आलें होतं. त्याची सदस्यसंख्या दोनशेपर्यंत पोचली असून भवानी विरुपाक्ष मंडळाचा सदस्य होण्यांत लोक मोठा मान समजू

लागले होते. स्त्रिया मात्र पूर्वी होत्या त्यांत कधीमधी भर पडली तरी दोनचार महिन्यांनी त्या येईनाशा होत. मंडळाच्या सदस्यांची संख्या इतकी वाढूनसुद्धा त्या विशिष्ट पंचवीस मंडळींचीच अजूनहि अव्याहत सत्ता चालू होती !

मंडळासंबंधीच्या बातम्या मधूनमधून माझ्या कानांवर येत. तारिणीबाई रस्त्यांत दोनदा भेटल्या होत्या. घाईघाईनेच दोनचार वाक्यें बोलून त्या निसटल्या होत्या. परांजप्यांनी पुन्हा लग्न केल्याची बातमी त्यांनीच सांगितली होती.

परांजपेहि तीनचार वेळां दिसले होते. आता पुन्हा त्यांचा पहिला छाकटा पोषाख आला होता. तोंडावर तर व्यसनाधीनतेचीं पूर्ण चिन्हें दिसत. परंतु मला बघून विजय, कुचेष्टा अशा कांहीतरी प्रकारचं ते हसत आणि मग मला तें हसणें आठआठ दिवस मनस्तापाला कारण होई !

अन् आता ? अं ? आता ?...

मला त्या बातमीने मनापासून आनंद झाला.

लॉरी बारीकसारीक गावाशी थांबन, उतारू चढवीत, उतरवीत आता खेडाला येऊन थांबली होती. मालाच्या पोत्यांचा व भाजीपाल्यांच्या करंडयांचा चढउतार चालू होता. दुसऱ्याहि चारपांच लॉऱ्या थांबून मालाचा चढउतार करीत असत. उतारूंची गडबड चालूच असे. केळीं, पेरू, संत्री आणि चिवडा, शेववाले यांची आरडाओरड व धांदल चालली होती. बहुतेकांनी चहा घेतला.

मला पण अतिशय तहान लागली होती. तेथल्या अस्वच्छ हॉटेलांतला चहा घेण्यांत मनाला कांही हौस वाटत नव्हती; पण डोळे मिटून मी आणि ताईने चहा घेतला. चहा घेतांघेतां मी ताईला छाप्याची हकीकत सांगितली. परंतु तिला त्यांत विशेष कांही वाटलें नाही.

लॉरी चालू लागली. ताईच्या शेजारीं एक नवीन मराठा मनुष्य येऊन बसला होता. त्याने ताईला " कुठं जाणार ? " म्हणून विचारतां

ताईने "विरंजगावला" असें सांगतांच तो म्हणाला, " मी पण विरंजगावलाच जातों आहें." हा मनुष्य किती शुद्ध बोलतो आहे असें मी आश्चर्य करतें तोंच माझ्याकडे बघून त्याने ताईला विचारलें,

" आमच्या शाळेचा आज समारंभ आहे. त्यासाठीच या पुण्याहून आल्या आहेत काय ? "

" हो, हो. मी त्याकरिताच आलें आहे. " मींच उत्तर दिलें.

लगेच त्या मनुष्याने मला नमस्कार केला आणि मींहि त्याला उलट नमस्कार केला.

" तुम्ही शाळेंतच कांही काम करतां का ? " मी विचारलें.

" हो, मोठया लोकांचे रात्रींचे वर्ग आहेत त्यांतल्या खालच्या वर्गात मी शिकवतों. पण धंदा म्हणून नव्हे, हौसेकरिता. मी कोष्टी आहें. "

" आपला धंदा संभाळून तुम्हीं हें शिकवण्याचं काम करतां हें फार चांगलं आहे. "

" नाही बाईसाहेब, यांत काय मोठंसं चांगलं आहे ! आमच्या पटवर्धनसाहेबांनी गावच्या लोकांसाठी मोठया सरकारी नोकरीवर लाथ मारली ना ! जुन्नरला सबजज्ज म्हणून आले होते. मला वाटतं, चांगला साडेचारशे रुपये पगार असेल त्यांना नोकरी सोडली तेव्हा. पुन्हा बदली होण्याची वेळ आली तेव्हा दिला राजीनामा खरडून. आता जुन्नरला वकिली करतात. या दीड वर्षात जे काय दोन अडीच हजार रुपये मिळाले ते त्यांनी गावसुधारणेकडे खर्च केले. सबजज्ज असतांना त्यांनी आमच्या गावची शाळा लोकलबोर्डाकडून उघडली. आणखी दहा गावी त्यांनी शाळांची सोय करून दिली. "

तो कोष्टी किती आदराने बोलत होता ! त्याची हकीकत ऐकतांना माझीहि मुकुंदरावांच्याबद्दलची आदरभावना क्षणाक्षणाला वृद्धिंगत पावत होती. मला वाटलें, की काल ते या बाबतींत अवाक्षर बोलले नव्हते. दुसरा कोणी असता तर आपल्या स्वार्थत्यागाबद्दल केवढी वडाई मारली असती त्याने !

मीं विचारलें, " ते मूळचे श्रीमंत आहेत वाटतं ? "

" मूळचे गरीब ते. आता ते श्रीमंत आहेत; पण ते सासुरवाडी-कडून. त्याच्या सासऱ्याची विरंजगावला मोठी उत्पन्नाची जमीन आहे शिवाय नोकरीत त्यांनी बराच पैसा मिळवला होता. ती सर्व इस्टेट यांना मिळाली. त्याच्या उत्पन्नावर घरखर्च भागवतात "

" हल्ली ते सासुरवाडींच राहातात ? "

" त्यांची बायको ती एकुलती एक मुलगी विरंजगांवकरांची. विरंज-गांवकर वारले तेंव्हापासून म्हणजे या दोनतीन वर्षांपासून पटवर्धनसाहेबच वारस झाले आहेत. पण बाईसाहेब आम्हा सगळ्या गावकऱ्यांना फार हळहळ वाटते, की त्यांना संसाराचं सुख असं कांही नाही "

" का बरं ? "

" आज पांच वर्ष इंदिराताई आजारी आहेत. लग्न झाल्यावर त्या पांचसात वर्ष काय त्या चांगल्या होत्या तशा मूळच्याच त्या जरा नाजुक प्रकृतीच्या अन् मग बाळंतपणापासून तर अगदीच खचत गेल्या. अण्णासाहेबांनी मुलीच्या प्रकृतीसाठी पाण्यासारखा पैसा खर्चला, पण गुण नाही ! चार महिने आजारी आणि दोन महिने बऱ्या अशी अवस्था आहे. पटवर्धनसाहेब व त्यांच्या आईसाहेब त्यांची फार जिवापाड शुश्रूषा करतात. इंदिराताईंना नेहमी वाईट वाटतं. फार सुस्वभावी, पण नशीब खोटं ! इतका चागला नवरा, श्रीमंती सर्व असून भोगतां येत नाही. ! "

" आणि मूलबाळ काय आहे ? "

" एक मुलगा झाला तो वर्षाचा होऊन गेला ! "

" अरेरे ! "

मला फारच वाईट वाटलें. मुकुंदरावासारख्या सज्जन मनुष्याचें आयुष्य असें सौख्यहीन कां बरें असावें ? पण असें असूनहि त्यांच्या मनांतलें दुःख त्यांच्या मुखावर प्रतिबिंबित झालेलें नाही. किती मोकळे-पणाने आणि मोहक हसतात ते !

येथवर माझे विचार येतात तों लॉरी थांबली आणि तेंच मोहक हास्य मला दिसलें. कालच्यापेक्षाहि आज तें मला जास्तच हृदयंगम

वाटलें. कारण त्यांच्यापाठीमागे केवढें धैर्य, औदार्य होतें त्याची मला कल्पना आली होती.

मुकुंदरावांनी मला नमस्कार केला आणि मींहि त्यांना उलट नमस्कार केला.

नंतर मी ताईसह खाली उतरलें. त्या कोष्टयाने मला विचारून माझी लहान सूट-केस बाहेर काढली व मुकुंदरावांनी दाखवलेल्या टांग्यांत ठेवून, मुकुंदराव आणि त्यांच्याबरोबरचे एक गृहस्थ यांना नमस्कार करून तो गावांत निघून गेला लॉरी जुन्नरकडे मार्गस्थ झाली

"त्रास झाला का फार ?" टांग्यांत बसतांना मुकुंदरावांनी विचारलें. टांग्यांत मी आणि ताई मागे आणि टांगेवाल्याजवळ मुकुंदराव आणि ते दुसरे गृहस्थ (जोशीमास्तर) असे दाटीदाटीने बसले होते. पांढऱ्या टपाचा चांगला ऐसपैस बैठकीचा आणि दोन घोडयांचा टांगा होता तो.

"नाही फारसा झाला वेळ लागतो पुष्कळ म्हणून जरा कंटाळा आला इतकंच."

केवढेंसें लहान गाव होतें तें ! चारपाच पेठा आणि जरा अंतरावर कुंभारवाडा, मीना नदीजवळील कोळयांच्या झोपडया अशी वसाहत होती. केळीं द्राक्षांचे बाग आणि कांद्या-बटाटयांची लागवडीची जमीन दुतर्फा दिसत होती.

गावांत जातांजातां मुकुंदराव मला गावासंबंधी माहिती देत होते. गावांत ब्राम्हणांचीं अशीं दहाबाराच घरें फक्त होतीं. बाकी वस्ती मराठे, कोळी व मुसलमान इत्यादि लोकांची होती. केळी, द्राक्षें, बटाटे, कांदे, मिरची आणि भाजीपाला असें उत्पन्न चांगलें असून हुन्नरकलाहि कामापुरती चालत असे.

गावांत शाळा उघडल्यानंतरहि मुलांनी शाळेंत येऊन शिकावें म्हणून किती प्रयत्न करावे लागले याची माहितीहि मुकुंदरावांनी दिली.

तेव्हा मीं म्हटलें, " पुण्यासारख्या मोठ्या शहरांत आता कुठं पांचसातशे मुली शिक्षण घेताहेत. पंधरावीस वर्षांपूर्वी तिथंदेखील मुलींना खाऊ आणि बक्षिसांची लालूच दाखवून शाळेंत आणाव्या लागत. "

मुकुंदरावांचा वाडा जुन्या बांधणीचा आणि खूप ऐसपैस व दुमजली होता. वाड्याच्या मागल्या बाजूला लहानसा राहाटाचा आड आणि त्याच्याजवळच मोठी धुण्यापाण्याची दगडी बांधणीची मोरी होती. घराभोवती बकुळी, पारिजातक, चाफा अशी झाडं आणि देवाला फुलें मिळण्याजोगीं इतर झाडें व परसांत भाजीपाला लावलेला होता.

साडेदहाचा सुमार असल्यामुळे उन्ह खूप पडलं होतें; पण घरांत गेल्याबरोबर कसं एकदम थंड वाटलें. एका पन्नाशीजवळच्या वृद्ध स्त्रीनं दरवाजाशीं माझें स्वागत करून मला व ताईला माजघराजवळच्या जिन्याने माडीवर नेलें. तेथे एका पलंगावर एक आजारी स्त्री पडली होती.

वृद्ध स्त्री ती मुकुंदरावांची आई यशोदाबाई असून आजारी स्त्री ही त्यांची पत्नी इंदिराताई होय.

मुकुंदराव माडीवर आलेच होते. त्यांनीच आमची ओळख करून दिली.

यशोदाबाई आमच्या स्नानाची व्यवस्था करण्याकरिता खाली गेल्या. त्यांच्याबरोबरच ताईहि गेली.

पत्नीच्या आजाराबद्दल चारसहा वाक्यात बोलून मुकुंदराव विनोदानें म्हणाले, " मी पुष्कळ सांगतों हिला, की लवकर बरी हो, म्हणजे मला तुझी फार मदत होईल म्हणून. पण अगदी ऐकत नाही माझं. एवढ्या या पुण्याहून समारंभाला आल्या, पण तूं कांही समारंभाला नाहीस. "

इंदिराताई क्षीणपणें हसल्या व अशक्त आवाजांत सावकाशपणें मला म्हणाल्या, " पांच वर्षं झाली हो माझ्या आजाराला. हे इतके चांगले म्हणून ! दुसरा कोणी मनुष्य असता तर कटाळून फिरकला नसता. मला सारखं वाटतं, की लवकर बरं तरी व्हावं, नाहीतर आपलं– "

" असं बोललीस तर रागावेन बरं का मी. दोन दिवस मग इकडे फिरकणारहि नाही. "

" बरं, नाही बोलत मी. " इंदिराताईंच्या डोळ्यांतून टच्दिशी अश्रू ओघळले व त्यांनी मान फिरविली.

मुकुंदरावांचा खालचा ओठ जरा कंपित झाला त्याच्या कंठाचीहि थोडी हालचाल झाली. नंतर त्यांनी इंदिराताईंच्या अंगावरलं पांघरूण सारखें केलें.

यशोदाबाईंनी हाक मारल्यावरून आम्ही मग खाली गेलों. मुकुंदराव कांही कामासाठी बाहेर गेले आणि मी स्नानासाठी मागील दारीं गेलें.



# प्रकरण २४ वें

चार वाजतां समारंभासाठी मुकुंदरावांनी मला शाळेंत नेलें. मी ताईलाहि बरोबर घेतलें होतें.

शाळेभोवतालचें पटांगण चांगलें विस्तृत असून खांब उभे करून आंब्याच्या व अशोकाच्या पानांच्या माळा त्यांना बांधल्या होत्या. त्या माळांनी वर जणू छतच केलें होतें. अिमारतीच्या दाराला केळीचे खुंट लावले असून वर एका जुन्नरी कागदावर अशोकाच्या पानांनी 'सुस्वागतम्' हीं अक्षरें काढलीं होतीं.

शाळेची इमारत एखाद्या धर्मशाळेसारखी बांधलेली होती. दोन खोल्या मुलींच्या वर्गाकरिता व बाकीची इमारत मुलांच्या वर्गाकरिता असून वर्गात एकावर एक ओटे बांधून त्यांवरच अरुंद सतरंज्या पसरून मुलांमुलींची बसण्याची व्यवस्था होती. मधल्या मोठ्या खोलीत एका बाजूला तिसरी इयत्ता व एका बाजूला चवथीचे वर्ग भरत. मध्ये भितसुद्धा नव्हती. पण भिंत नसल्यामुळे ही खोली चांगली प्रशस्त राहिली होती व हिच्यांतच सुमारें पाऊणशे मुलें, पंचवीसतीस मुली व इतर दीडशे मंडळी आता स्थानापन्न झालेली होती. आम्ही जातांच सर्वांनी उठून आमचें स्वागत केलें.

एका टेबलाजवळ दहाबारा खुर्च्या मांडल्या होत्या. मला टेबलाजवळ बसवून मुकुंदराव आणि बरोबरचे जुन्नरचे तीन वकील व एका वकिलांच्या पत्नीहि माझ्या शेजारच्या खुर्च्यांवरून बसलीं. पाठीमागे एका बाकावर चारपांच स्त्रिया बसल्या होत्या. त्यांच्याशीं आणि गावांतील चारपांच प्रतिष्ठित लोकांशीं ओळख करून दिल्यावर कार्यक्रमास सुरवात झाली.

पांच मुलींनी पेटीच्या साथीबरोबर सुस्वर पद्यें म्हटल्यावर कांही संवाद मुलांनी आणि दोन संवाद मुलींनी याप्रमाणे केले. त्या मुलांमुलींची तयारी पाहून मला मोठें नवल वाटलें व नंतर चार पोक्त मंडळींनी एक संवाद केला. त्यांतला एक मनुष्य जुन्या वळणाचा

असून तो शिकावयासाठी चाललेल्या एका म्हाताऱ्याला म्हणत होता, " तुला शिकून काय करायचंय् ? आम्हां कुणब्या-माळ्यांना व आमच्या पोरीसोरींना हे बामणांचे शिक्षणाचे ढंग हवे कशाला ? "

मग त्या पोक्त विद्यार्थ्यानें बाकीच्या सर्वांना विद्येचें महत्त्व पटवून दिलें. आणि विद्येला वय पाहाण्याची जरुरी नसते, ती सर्व काळीं पैशाप्रमाणेच अत्यंत उपयुक्त आहे, वगैरे गोष्टी संवादाच्या ओघांत पटवून दिल्या. मग त्या सर्वांनीच शिकण्याचें कबूल केलें

या संवादांत विनोद पुष्कळ असल्याने सर्वांनाच तो फार आवडला.

नंतर माझ्याकडून हुषार विद्यार्थ्यांना बक्षिसें दिल्यावर हेड-मास्तरांनी अहवाल वाचून दाखवला. मग एका पोक्त गृहस्थांनी थोडें भाषण केलें. त्यांनी मुकुंदराव व आणखी एकदोघां उत्साही कार्यकर्त्यांबद्दल गौरवपर उद्गार काढून गावांत लवकरच एक तालीम उघडावयाचा बेत होता त्यासाठी पन्नास रुपयांची देणगी देत असल्याचें जाहीर केलें.

नंतर मुकुंदराव थोडे बोलले. थोडेंच पण उत्साहपूर्ण आणि मनापासून बोलणें झालें त्यांचें त्यांनी शेवटीं रीतसरपणें मला बोलाव-यास विनंती केली.

मीं अध्यक्षपदाबद्दल आभार मानून सारांशाने खालीलप्रमाणे भाषण केले–

" बंधुभगिनींनो, विद्येचं महत्त्व किती आहे आणि कोणत्याहि वयांत शिकण्याला हरकत नाही, हें 'विद्येचं महत्त्व' या संवादावरून आपल्या ध्यानांत आलेलंच आहे. विद्येचं महत्त्व नुसता मानसन्मान लाभावा व पोटाला मिळवावं एवढंच नसतं. फक्त शहरांतल्या लोकांनी शहाणं व्हावं हें फारच अयोग्य आहे. हिंदुस्थान देश हा खेड्यांचा बनलेला आहे. त्यांत मोठाली शहरं मोजकींच आहेत. सध्या अशी परिस्थिति आहे, की व्यापारधंदा, विद्या— सर्व कांही या थोड्याशा शहरांत थोपून राहिलेलं आणि असंख्य खेडेगावांतले लक्षावधि लोक

दारिद्र्य आणि अज्ञान यांत खितपत पडलेले. म्हणजे नुसतं डोकं मोठं आणि बाकीच्या शरिराच्या काडया असा आपला हिंदुस्थान देश झालेला आहे. त्याची प्रकृति सुधारायला शिक्षणसारखं औषध नाही.

" प्रत्येक मनुष्यानं माझा देश श्रेष्ठतेला पोचला पाहिजे व तो श्रेष्ठतेला नेण्यास मीहि हातभार लावीन अशी महत्त्वाकांक्षा बाळगली पाहिजे मी क्षुद्र असं कुणीहि म्हणतां कामा नये. सूर्यकिरणांतला प्रत्येक किरण महत्त्वाचा असतो, त्याचप्रमाणं हिंदुस्थानांतल्या प्रत्येक मनुष्याचं महत्त्व आहे. त्यांत क्षुद्र कोणीहि नाही. आणि प्रत्येकानं आपलं महत्त्व शक्यतोंवर वाढवायचं आणि त्याचप्रमाणं आपण ज्या गावांत राहातों -- मग तो गाव कितीहि का लहान असेना-- त्या गावाचं महत्त्व वाढवायचं, हीच खरी राष्ट्रसेवा आहे. प्रत्येक गावच्या प्रत्येक मनुष्यानं जर आपली उन्नति करून घेतली तर तें गाव आपोआपच समृद्ध होईल आणि याप्रमाणं हिंदुस्थानांतील सर्व खेडींपाडीं जर समृद्ध झालीं तर आपला मायदेश समृद्ध झाल्याशिवाय राहील का? एखादं नखुरडं झालं तरी सबंध देहाची तळमळ होते, तशीच गावाची अवस्था आहे. दरिद्री आणि अज्ञान गाव म्हणजे हिंदुस्थानच्या अंगावरल्या बारीकसारीक परंतु प्राणघातक जखमांप्रमाणं आहे. अशा असंख्य जखमांनी हिंदुस्थान मरणोन्मुख होऊन राहिला आहे. तेव्हा सर्वांनी मुळीच वेळ न घालवतां त्याच्या उद्धारासाठी झटलं पाहिजे.

" नुसत्या पुरुषांनीच झटून चालणार नाही, तर स्त्रियांनीहि त्या उन्नतीला हातभार लावला पाहिजे; नाहीतर अर्धांग लुलं पडल्यासारखं होईल. एक स्त्री सुशिक्षित झाली तरी ती घरच्या चारपांच माणसांना आपोआप आपल्या सहवासामुळं अधीच सुधारूं शकेल. तेव्हा स्त्रियांनी आता अज्ञानांत राहूं नये आणि पुरुषांनी त्यांना अज्ञानांत ठेवूं नये.

" आता शेवटीं सांगायचं इतकंच, की माझा गाव, माझा धर्म, माझा देश, असा अभिमान मनांत बाळगा; परंतु दुरभिमान बाळगूं नका. तुमच्या शिरंगावांतला कोणताहि आतीथ्य सतुष्ट असो, त्याचं

म्हटलं पाहिजे, की मी विरंजगावकर आहे आणि माझ्या गावाच्या उन्नतीसाठी मी यथाशक्ति प्रयत्न करीन."

नंतर मुकुंदराव पटवर्धन प्रभृतींनी ग्रामोद्धाराचे जे प्रयत्न चालविले होते त्यांत अितरांनी मनापासून भाग घ्यावा असें सुचवून व त्या कार्याप्रीत्यर्थ पन्नास रुपयांची देणगी देण्याचें आश्वासन देऊन मीं भाषण संपविलें.

मग आभारप्रदर्शन झाल्यावर आम्ही बाहेरच्या पटांगणांत आलों. येथे मुलांनी व लहान मुलींनी थोडीशी ड्रिल करून दाखवली व खो-खो आणि आट्यापाट्यांचा डाव मुलांनी खेळून दाखवला. त्यांत यशस्वी झालेल्या मुलांमुलींना एका वकिलांनी दहा रुपयांचीं पुस्तकं बक्षीस दिलीं.

नंतर हारतुरे, पानसुपारी, बत्तासे वगैरे झाल्यावर सोनें देण्याची सर्वांची गडबड उडाली.

मुकुंदरावांनी त्या गर्दीतून मला बाहेर काढलें व एका शिक्षकांना बरोबर देऊन घरीं पोचविण्याची व्यवस्था केली. मुकुंदरावांना घरीं येण्यास अवकाश होता.

मी घरीं आल्याचें कळतांच इंदिराताईनी मला माडीवर बोलावून घेतलें आणि समारंभाची हकीकत उत्सुकतेने विचारून घेऊन समारंभ कसा काय आवडला म्हणून प्रश्न केला. यशोदाबाई कॉफी व फळें घेऊन तितक्यांत वर आल्या व त्यांनीहि तोच प्रश्न केला.

इंदिराताई व यशोदाबाईंना माझे प्रशंसेचे उद्गार ऐकून फार आनंद वाटला. मग दोघींनी मुकुंदरावांच्या कार्याबद्दल प्रेमाचे आणि कौतुकाचे उद्गार काढले.

यशोदाबाई म्हणाल्या, "मुकुंदाला आपल्या गावाखेरीज कांही सुचतच नाही मुली. जेवणाखाणाची शुद्ध नसते त्याला. सारखं आपलं कांहीतरी काम चाललेलं असतं."

"आम्ही मला म्हणतात, की 'तूं बांगली हो लवकर' म्हणजे आपण बायकांच्या शिक्षणांत अन् राहाणींत खूप सुधारणा करं, असेही-

तर माझं काम अर्धवट होतं ' म्हणून. " इंदिराताई म्हणाल्या. नंतर त्यांनी एक निःश्वास टाकला, " पण मी अशी दुर्दैवी, की मी आजारी पडतें अन् त्यांनाहि सुख नाही. "

" छे छे. " मीं म्हटलें. " तसं अगदीसुद्धा मानू नका तुम्ही. तुम्ही घरीं बसल्याबसल्या त्यांच्या कार्यांत लक्ष घालतां, त्यांना प्रोत्साहन देतां हें काय थोडं आहे ! "

इंदिराताईंना समाधान वाटलें. त्या म्हणाल्या, " अहो सुमतीबाई, आम्हांला दोघींना आताशीं कुठं त्यांच्या कार्याबद्दल कल्पना येऊन त्यांत त्यांचा मोठेपणा कळायला लागला. नाहीतर ते नोकरी सोडायला लागले तेव्हा आम्ही दोघींनी थोडा नाही त्रागा केला ! मला वाटतं, बाबा असते तर त्यांनी मुळीच नोकरी सोडूं दिली नसती "

" खरंच हो. अगदी ही म्हणते ना तस्सं आहे. अन् इतकं करून अजून कुठं त्याचं समाधान आहे ? त्याला कित्येक गोष्टी करायच्या आहेत. पण प्रत्येक गोष्टीला दामाजी लागतात ना. "

" ते वकिलींतले पैसे या कार्यांतच खर्चतात. घरात त्यांतला पैसा घेत नाहीत. "

" हो, मुळी तेवढ्याकरिता तर तो वकिली करतो. तो म्हणतो, ' पैसा मी सत्कार्यासाठी खर्च करतों; तेव्हा वकिली करायला काय हरकत आहे ? गांधी म्हणतात ना, की वकिली सोडा. त्यावर त्याचं हें उत्तर आहे. तो थट्टेनं म्हणतो, की मी कोंड्याचा मांडा करतों. " नंतर थोडा वेळ आणखी बोलणें झाल्यावर यशोदाबाई म्हणाल्या, " रात्रींच्या वर्गाला मोठाल्या बायका येत नाहीत ना शिकायला; तर मला मुकुंदा म्हणतो, ' तूं चल शिकायला म्हणजे दुसऱ्या बायकांना उत्तेजन येईल. ' " यावर आम्ही खूप हसलों.

मग इंदिराताईंना औषधपाणी केल्यावर त्या स्वस्थ पडून राहिल्या आणि आम्ही खाली आलों.

पटवर्धनांच्या घरीं रात्रीं जेवणाकरिता व वस्तीकरिता चारपांच जुन्नरची पाहुणेमंडळी होती.

मुकुंदराव जेवतांना यशोदाबाईंना म्हणाले,

"आई, बेतानं वाढ हं. पोट अगदी आकंठ भरलंय्."

"कशानं रे बाबा? कुठं खाणंफराळ झाला की काय?"

"आई, अगदी पंचपक्वान्नांचं जेवण म्हणेनास." नंतर ते माझ्याकडे प्रशंसेने पाहून मनःपूर्वक बोलले, "खरोखर आई, सुमती-बाईचं भाषण तूं ऐकायला हवं होतंस. फार ओजस्वी भाषा आहे त्यांची."

"वा! बरेच की मला हरभऱ्याच्या झाडावर चढवतांहां! बाकी पंचपक्वान्न नव्हे, पण हरभऱ्याइतकीच किंमत आहे त्याची."

"मी चुकलों उपमा द्यायला." मुकुंदराव म्हणाले, "तुमचं म्हणणं अगदी बरोबर आहे. पंचपक्वान्नं निव्वळ जिव्हालौल्य पुर-वितात, पुन्हा पोट बिघडतं; पण हरभऱ्यासारखं सात्विक आणि पौष्टिक अन्न नाही"

दुसऱ्याहि सर्वांनी मग स्तुतीला सुरवात केली. परंतु मुकुंद-रावांच्या प्रशंसेने मला फार आनंद झाला. माझ्या देणगीबद्दल मुकुंद-रावांनी पुन्हा आभार मानले.

वकिलीणबाईंनी मला आग्रह चालवला, की "उद्या राहा. शिवनेरी, लेण्याद्रि पाहून मग परवा जा. इतक्या लांब आलांत तर हें बघितल्यावांचून जाऊं नका."

मलाहि शिवनेरी पाहावा म्हणून फार वाटत होतें. परंतु पुण्या-कडे जाणारी लॉरी म्हणे नऊदहाला निघत असे, आणि पुण्याला बारा-एकला पोचत असे. तेव्हा तो बेत रहित करावा लागला.

यशोदाबाईंनी तोड सुचविली, "सुमतीताई, तुम्ही दिवाळीच्या सुट्टींत आमच्याकडे पुन्हा या."

"खरंच या." मुकुंदरावांनी आग्रहपूर्वक म्हटलें.

"येईन. जरूर येईन."

"नुसता आशीर्वाद नका देऊं. खरंच या. खेड्यांत राहायचा कंटाळा आला तर जा लगेच परत." यशोदाबाई म्हणाल्या.

" आशीर्वाद नाही. अगदी खरंच येईन. चार दिवस तरी येईन."

" बरं तर, आणखी पंधरावीस दिवसांनी पुण्याला कामासाठी येणारच आहे मी, तेव्हा आठवण यायला येईन तुम्हाला. नाहीतर आम्हांला विलक्षण आळ झालं."

निरोप देतांना इंदिराताईंनीहि मला आग्रह केला. आजारानें कांही माणसें त्रासिक बनतात. इंदिराताई मात्र प्रेमळ हृदयी झाल्या होत्या. फिकट पडलेलें तें मुख, आजाराने जर्जर झालेली तनु, डोळे मात्र तेजस्वी. त्या मुखावर नैराश्याची छटा सदा उमटलेली. डोळ्यांत चटकन् आसवें जमायचीं. आपण हें जग केव्हा सोडून जाऊं त्याचा नेम नसल्याच्या जाणिवेने जणू सर्वांविषयी प्रेम अंतःकरणांत ओसंडून चाललेलें. यशोदाबाईंना आणि मुकुंदरावांना त्रास पडूं नये म्हणून त्या किती जपायच्या. पण बिमारीचा इलाज चालत नसे!

लॉरींत बसल्यावर किती वेळ तें उदास मुख माझ्या अंतःचक्षूंना दिसत होतें. आणि त्याशेजारींच मुकुंदरावांचें तेजस्वी व मंदस्मितयुक्त मुख दिसलें, की मला वाटायचें– " हा कसला हा विधीचा खेळ!"

● ● ●

## प्रकरण २८ वें

पुणें जवळजवळ येऊं लागल्यापासून भवानी विरुपाक्ष मंडळाबद्दल माझ्या मनांत विचार येऊं लागले. सर्व सविस्तर माहिती कळावी यासाठी मला उत्सुकता लागली.

घरीं येऊन स्नान केल्यावर मला अतिशय झोप येऊं लागली दोन दिवसांच्या लॉरीच्या प्रवासानें अंगहि आंबून गेलें होतें.

परंतु मीं झोपेला दूरदूर ठेवलें. ताईने भात-पिठलें केलें होतें. आम्ही दोघी जेवलों आणि मी बाहेर जाण्यास निघालें, तेव्हा ताई मला बोलली,

" हें ग काय सुमती, इतक्या दोनप्रहरीं कुठं निघालीस तूं? दोन घटका झोप तरी घेशील की नाही ? "

" नाही ग. मला आत्ताच गेलं पाहिजे, म्हणजे तारिणीबाई घरांत भेटतील. "

मला पाहून तारिणीबाईंना अतिशय आनंद झाला. त्यांनी माझें आगतस्वागत व पाहुणचार मोकळ्या मनाने व अगत्यानें केला.

" मीं ओळखलं तुम्ही कां आलां तें. " गालिच्यावर मला बसवून आपणहि बसत तारिणीबाई हसून म्हणाल्या.

" मग बरंच झालं. मग सांगा बघू सगळी हकीकत आता. "

" सगळी हकीकत ती काय ? कालच्या ज्ञानप्रकाशांत आलेलीच आहे बातमी. "

" पण हे संभावित, समाजांत प्रतिष्ठित म्हणून वावरणारे महाधूर्त लोक असे मुद्देमालासह सापडले कसे ? पोलिसांचं बारसं जेवलेले हे !... "

" तें असं आहे, की लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकतां फेकतां विजयोन्मादाची धूळ यांच्याच डोळ्यांत साचते. अन् मग गाफिलपणानं ही अशी वेळ येते ! पोलिसांनीहि डोळ्यांत तेल घालून प्रयत्न चालवला होता; कारण मागं त्यांची फसगत झाली होती. आली झालं वेळ ! "

" आता हळूहळू इतरहि गोष्टी बाहेर पडतील. मंडळाच्या इभ्रतीला हा मोठाच धक्का बसला." मीं म्हटलें.

" होय. त्याचा परिणाम फार होईल. प्रतिष्ठित लोक बहुतक मंडळांतून नांवं काढणार."

" मला वाटतं मंडळ बंद पडणार !" मीं म्हटलें.

" पण हें मंडळ जरी बंद पडलं आणि या जुगारी लोकांची कितीहि अप्रतिष्ठा झाली तरी ते कांही स्वस्थ बसणार नाहीत. भवानी विरूपाक्ष मंडळाऐवजी म्हसोबा-सटवाई मंडळ ते काढतील. कुणीतरी भोळींखुळीं धनिक बाळं त्यांना गवसतील. बघाल तुम्ही."

नंतर तारिणीबाईशीं जरा वेळ गोष्टी बोलून मी घरीं यायला निघालें; तितक्यांत एक मनुष्य चिठ्ठी घेऊन आला.

ती वाचतांच तारिणीबाईचं तोंड त्या कागदाइतकेंच पांढरें-फटक पडलें. त्यांनी तें पत्र माझ्या हातीं ठेवलें. परांजप्यांचें तें आज्ञापत्र होतें. त्यांनी तारिणीबाईंना चारजणांच्या जामिनासाठी पैशांची व्यवस्था ताबडतोब वकिलामार्फत करण्यास कळवलें होतें. ( आलेला मनुष्य वकिलाचाच होता ) त्यांतच शेवटीं सुचविलें होतें, की पकडलेल्या पंधरा मंडळींपैकी चौघांच्या दंडाची जी काय दीडदोन हजार रक्कम होईल तीहि तुम्हांलाच भरावी लागेल. कारण करील तो भरील. " मी अपकार विसरत नाही, त्याचप्रमाणं उपकारहि विसरत नाही. सर्वांची भरपाई मी करून घेत असतों "

या शेवटल्या वाक्याने माझा थरकाप झाला. तारिणीबाईनी पोलिसांना कांहीतरी बातमी पुरवली असा परांजप्यांना संशय आला होता काय ? नुसता संशय होता की ती खरी गोष्ट होती ? मला वाटू लागलें, तारिणीबाईनी कांही मदत केली असेलहि. मीं त्यांना सविस्तर माहिती विचारली असतां त्यांनी जरा टाळाटाळच केली. त्यांनी सूड उगवला असेल का ? की मला तारिणीबाईनी सर्व हकीकत रात्रीं घरीं येऊन सांगितली त्याचा हा सूड ?

पण दंड देऊन हे लोक पुन्हा मोकळे झाले म्हणजे, मग तारिणी-बाइना त्रास होईल की काय ? नुसत्या पैशाने भरपाई होणार की आणखी कशाने ? काय म्हणून तारिणीबाईंनी पैसे द्यावे ?

क्षणार्धांत हे विचार माझ्या मनांत आले आणि मीं तारिणी-बाईंना म्हटलें, " मला वाटतं तुम्ही चारसहा महिने पुण्याबाहेर जा. या लोकांसाठी तुम्ही एक पै देऊं नका. परांजप्यांनी या पत्रांत तुम्हांला धमकीवजा सूचना दिली आहे. मला वाटतं, बेकायदेशीर आहे ती. तुम्ही हें पत्र– "

" नाही, नाही हो ! शक्य नाही तें ! परांजपे सांगतात तसं वागलंच पाहिजे मला. " तारिणीबाईंनी जिकिरीवर आल्यासारखें सांगितलें.

मला जरा चिडल्यासारखेंच झालें. " तुम्ही त्यांना अितक्या भिता त्याचाच ते असा फायदा घेतात. तुम्ही त्यांना स्वच्छ सांगून टाका, की तुम्ही तुरुंगांत जा नाहीतर मसणांत जा– मी एक कवडीहि देणार नाही. "

" अहो, ते लोक कशाचे मसणांत जातात ! ते आपल्याला आधी पोचवतील !... " तारिणीबाई उदासवाणें हसल्या

मला कसेंसेंच झालें.

मघाशी आनंदभरांत हसणाऱ्या बोलणाऱ्या तारिणीबाई आता भयभीत होऊन गेल्या होत्या. ऐन थंडीच्या दिवसांत त्यांच्या कपाळावर घर्मबिंदु आले होते. त्यांनी एक चिठी लिहिली. ती लिहिताना त्याचा उजवा हात कापत होता म्हणून डाव्या पंजाने उजवें मनगट त्यांनी दाबून धरलें. मग ती चिठ्ठी आलेल्या मनुष्या-जवळ देऊन त्यांनी लोडावर असहाय्यपणें डोकें टेकलें.

" तारिणीबाई, माझ्या घरीं चला ना चार दिवस राहायला. "

तारिणीबाई कसेंसेंच हसल्या "सुमतिबाई, तुम्ही नका माझ्यासाठी वाईट वाट्टेल घेऊं. माझी तुम्हांला इतकीच कळकळीची विनंती आहे, की माझ्याशीं तुम्ही ओळखसुद्धा ठेवू नका. नाहीतर तुम्हालाहि एखादे वेळीं झळ लागेल. तुम्हाला अनुभव आलाच आहे. पण मी म्हणतें, तुम्ही

थोडक्यांतच परांजप्यांच्या हातून निसटलां. मी तुमच्या घरीं आलें होतें ना, त्यावर त्यांनी काय काय केलं-" तारिणीबाई अर्धवट बोलून थांबल्या.

मीं त्यांचें मन वळवण्याचा प्रयत्न केला; पण दोनदा नकारार्थी मान हालवण्यापलीकडे त्यांनी मानसुद्धा लोडावरून उचलली नाही आणि एक शब्दहि तोंडावाटें काढला नाही. आजाऱ्याप्रमाणे त्या अंगाला शहारे देऊन आळोखेपिळोखे देत होत्या. आणि उसासे टाकीत होत्या.

मला त्यांच्याजवळून उठवेना. पण मीं जावें अशी त्यांची उघड इच्छा दिसत होती. किंबहुना माझ्या सान्निध्याची त्यांना जाणीवहि नव्हती. तेव्हा मग मी 'जातें' म्हणून उठलें.

तारिणीबाईंनी नुसता हुंकार दिला.

मी घरीं परत आलें. पलंगावर पडलें, पण आता माझी झोप कुठल्याकुठे उडाली होती. मीं वाचण्याचा प्रयत्न केला, परंतु एकहि ओळ समजेना. मला सारखें वाटत होतें- आता तारिणीबाईंचं काय होणार ?

पुढल्या दहाबारा दिवसांत लोकांना बोलायला मुळी दुसरा विषयच नव्हता. भवानी विरूपाक्ष मंडळ आणि त्यांतील मंडळींसंबंधी तऱ्हेतऱ्हेच्या उठणाऱ्या बातम्या धुराप्रमाणे पुण्यांत पसरत होत्या. दोघीतिघींनी माझ्या घरीं येऊन "मी मंडळासंबंधी असं असं ऐकलें. तुम्ही तिथं होतां म्हणून खरंखोटं विचारून घ्यावं यासाठी मी आलें" याप्रमाणे मला प्रश्न केले. कांही उठलेल्या अफवा इतक्या अद्‌भुत होत्या, की मला हसूं येऊं लागलें.

थोड्याच दिवसांत खटले भरले जाऊन चारशे, पांचशे रुपये दंड भरल्यावर सर्व आरोपी पुन्हा मोकळे सुटले.

पण भवानी विरूपाक्ष मंडळ बंद करावें लागलें.

मला पुढेपुढे या गोष्टी बोलण्याचा अगदी कंटाळा येऊं लागला होता.

आणि याच समयाला मागे बोलल्याप्रमाणे विरंजगावला दिवाळीचें आमंत्रण देण्यासाठी मुकुंदराव आले.

मला कुठेतरी जावेंसें वाटतच होतें, तेव्हा मीं आनंदानें येण्याचें कबूल केलें.

नंतर मी मुकुंदरावांना तारिणीबाईची सर्व हकीकत सांगून त्या बाबतींत सल्ला विचारला. परांजप्यांची सर्व माहिती मीं त्यांना दिली.

मुकुंदरावांनी सर्व हकीकत ऐकून घेतली. मग निराशेने मान हालवीत ते म्हणाले, " कांही उपाय नाही. तारिणीबाई दूर एखाद्या गावीं जाऊन राहिल्या आणि इस्टेट चांगल्या विश्वासू लोकांच्या ताब्यांत दिली तरच तरणोपाय आहे. तें तुम्ही सुचवलंतच त्यांना. त्यांनी ऐकलं नाही तर तुम्ही-आम्ही काय करणार ? वाटलं तर पुन्हा एकदा तुम्ही त्यांना सांगून पाहा " नंतर मुकुंदराव जरा विचार करून घाईने म्हणाले, " पण नकाच जाऊं तुम्ही त्यांच्याकडे. तारिणीबाईंनी तुम्हांला सल्ला दिला तोच बरोबर आहे. तुम्ही आता अगदी बाजूला राहा. तुम्ही सांगत असलां तर मी भेटेन त्यांना. "

किती आपलेपणाने मुकुंदराव मला हें सांगत होते ! मीं जरा विचार करून म्हटलें, " नको तसं. तारिणीबाईंना तें आवडायचं नाही. अन् त्या कुणाचं ऐकणारहि नाहीत. "



# प्रकरण २६ वें

दिवाळीची सुट्टी होताच मी एकटीच विरंजगावला गेलें. कारण ताई आपल्या एका दीराकडे दीडदोन महिन्यांसाठी गेली होती. तिच्या जावेचा प्रसूतिसमय येऊन ठेपला असून घरांत मुलांबाळांची अडचण होती. तेव्हा दिराचें पत्र आल्यावर तिला जाणें भाग होतें.

मी मुकुंदरावांच्याबरोबर टांग्यांतून खाली उतरून वाड्यांत येतं तों दारांत इंदिराताई उभ्या !

मीं सहर्ष म्हटलें, " अरे वा ! तुम्हांला अगदी चांगलंच बरं वाटलं की ! "

त्या हसून म्हणाल्या, " आमचं काय ! चार दिवस बरं नी चार दिवस आजारी ! आता आपलं वाटतंय् बरं - "

" पण आता या जाईपर्यंत तरी तू मुळीच आजारी पडता कामा नयेस सागून ठेवतों. "

तितक्यात यशोदाबाई म्हणाल्या, " तुम्ही याल असं आम्हांला कांही वाटलं नव्हतं. ही इंदिरा तर सारखी तुमची वाट बघत होती. मुकुंदा पुण्याला आला, तेव्हा चारचार वेळा बजावलन् त्याला, की सुमतीताईंच्याकडे जा, विसरूं नका. "

दुसऱ्या दिवसापासून मुकुंदरावांनी मला आपल्या कार्यासंबंधी माहितो करून देण्यास सुरवात केली जुन्नरला सबजज्ज म्हणून नेमून आल्यावर त्यांनी मुलामुलींकरिता शाळा काढली. ती तीन वर्षें आणि नंतरचें दीड वर्ष अशी एकूण साडेचार वर्षें ते आपल्या गावाची सुधारणा करण्याची खटपट करीत होते. हल्लीप्रमाणे त्या वेळीं ग्रामोद्धारकार्य सार्वत्रिक झालेलें नव्हतें. ग्रामोद्धार हें नावसुद्धा पडलें नव्हतें. कांही थोडे लोक ' खेडेगावं सुधारली पाहिजेत ' असें बोलूं लागले होते. आपल्या गावाजवळ राहावयास आल्यापासूनच मुकुंदरावांच्या मनांत गावसुधारणेच्या कल्पना उद्‌भवूं लागल्या. नीग्रो लोकांनी स्वतःची किती प्रकारें उन्नति करून घेतली आणि खेड्यापाड्यांतसुद्धा शिक्ष-

णाचा फैलाव कसा केला तें वाचून त्यांच्या मनांत महत्त्वाकांक्षा रुजली. त्याच भरांत नोकरी सोडून त्यांनी प्रौढशिक्षणवर्ग सुरू केले.

मुकुंदराव मला गाव दाखवीत होते. रस्त्याने आम्ही चाललों असतां मुकुंदराव मला सांगू लागले, "मला वाटत होतं, की मनांत आणायचा अवकाश, की थोडक्याच काळांत आपण सर्व लोकांना साक्षर करूं." निराशेने त्यांनी मान हालवली. "पण तसं होत नाही. या कामकरी लोकांना शिक्षणाचं महत्त्वच कळत नाही. ते मुळी म्हणतात, की 'आम्हांला पुस्तकं वाचून अन् चार अक्षरं लिहायला येऊन करायचं काय? न का येईना आम्हांला वाचायला! आमचा कामधंदा बरा की आम्ही बरे.'"

"होईल हळूहळू सर्व. मी म्हणतं, इतपत मुलंमुली आणि मोठी माणसं शिकताहेत तेंच पुष्कळ आहे. अशी म्हण आहे ना, की पहिल्यानं उंबरघाट ओलांडणं हें सर्वांत कठीण आहे. तो पहिला उंबरघाट ओलांडला म्हणजे मग मनुष्य भराभर मार्गाला लागतो नी काशी-रामेश्वरापर्यंतचे सगळे घाट ओलांडू शकतो. तसा हा सुधारणेच्या मार्गावरील उंबरघाट आहे."

एवढयांत आम्ही दोघें कोष्टयांच्या वस्तींत आलों. तेथे तीन-चार हातमाग चालू होते. सर्वांनी आम्हांला आदराने रामराम केला. मला लॉरींत भेटलेला भिवा कोष्टी आम्ही आल्याचें पाहातांच मुलाला मागावर बसवून पुढे आला व त्याने आम्हांला-- म्हणजे खरोखरी मलाच-- मागावर चाललेलें काम समजावून सांगितलें. मागांवर जुन्नरी पागोटयाचें काम चाललें असून, दुसऱ्या दोहोंवर जुन्नरी जाडयाभरडया लुगडयांचें काम चाललें होतें.

चवथा माग भिवा कोष्टयाचा होता. त्या मागांत मुकुंद-रावांनी प्रयोगादाखल बडोद्याच्या एका तज्ज्ञ मित्राकडून बऱ्याच सुधारणा करवून घेतल्या होत्या. यावर एक इंच जरीकिनारीचें वैंगणी देशी रंगाचें व निम्में गिरणीचें व निम्में हातसुताचें पातळ घातलें होतें. त्याचा दीड फूट भाग तयार झालेला असून तो अतिशयच न्याहार दिसत होता.

" फारच सुरेख निघणारसं दिसतं हें पातळ. काय किंमती-पर्यंत जाईल ? " मीं उत्सुकतेने विचारलें.

भिवा कोष्टयाने थोडा हिशेब करून सांगितलें, " पंधरासोळा रुपयांपर्यंत किंमत बसेल. "

मीं इंग्रजींत मुकुंदरावांना म्हटलें, " खरोखर गुणांच्या मानानं किंमत स्वस्तच म्हणायची. निम्मं सूत गिरणीचं आहे; परंतु लोकांना शुद्ध देशी कापडाचा पुरवठा होतो आहे कुठं ! व मीं काढवलीं तसलीं रेशमी महाग लुगडी सर्वांना परवडणार कशीं ? त्यापेक्षा ही अर्धी किंवा पाऊण देशी लुगडी नेसायला काय हरकत आहे ? "

" म्हणूनच तर मीं ही कल्पना काढली आहे. जुन्नरी लुगड्याचा धंदा बसत चालला आहे; तेव्हा नवीन तऱ्हेचीं तितकींच स्वस्त आणि टिकाऊ लुगडीं काढण्याचं जमलं तर मी बघणार आहें. आणि देशीचं प्रमाण शेकडा पन्नासच्या वर तरी राहावं एवढं मीं नक्की ठरवलं आहे. यांतलाच एखादा विणकर तयार झाला तर बरंच, नाहीतर भिवाच्या मुलालाच दुसरा माग घालून द्यावा असा बेत आहे. "

आम्ही कोष्टयाच्या वस्तींतून बाहेर पडून चालू लागलों.

" पण या विणकरांपैकी एकादा तयार व्हायला काय हरकत आहे ? "

" हे लोक वाडवडिलांपासून चालत आलेला धंदा जसाच्या तसा पूर्वापार पद्धतीनं करीत राहातात. विणकरांच्याच नव्हे, तर कोण-त्याहि धंद्यांत हें असंच आहे. कालमानानं, लोकांच्या आवडी-निवडींना अनुसरून थोडा फेरफार करावा ही गोष्ट त्यांना पटतच नाही ! फेरफार करणं म्हणजे अगदी शंकराच्या डोक्यावर दूर्वा वाहाण्यासारखं भयंकर वाटतं त्यांना ! आता हा भिवा जुन्नरी लुगडीं विणायचं सोडून नवीन तऱ्हेचे सणंग काढू लागला तेंसुद्धा त्यांना खपत नाही. ' बामणाच्या नादीं लागून बापजाद्यांचा धंदा सोडतोस व्हय ? ' असं ते त्याला बोलतात ! "

एकदा आम्ही जुन्नरांतील एका कागदाच्या कारखान्यांत गेलों होतों. काम बघून झाल्यावर मीं मुकुंदरावांना विचारलें,

" जुन्नरी कागदांचा धंदा कसा काय चालतो? विरंजगावीं त्या बाबतीत तुम्ही कांही प्रयत्न केलेत का ?"

" करणार होतो. खुद्द जुन्नरांत पूर्वी कागद तयार करणारे वीस-पंचवीस मुसलमान लोक होते. जुन्नरी कागद अतिशय चिवट आणि टिकाऊ. तसा कागद कुठेंहि मिळत नसल्यामुळं सरकारी नकाशे, व्यापारी लोकांच्या वह्यांना व सुद्दाला हेच कागद सरसहा वापरीत. पण आता यापेक्षाहि सरस असा यंत्रसहाय्यानं निघणारा व स्वस्त असा परदेशी कागद येतो त्यामुळं हा धंदा जवळजवळ संपुष्टात आला आहे. चारसहाच कागद तयार करणारे कसबी लोक आता राहिले आहेत या कलेवर पूर्वी जुन्नरातल्या शेकडो लोकांची पोटं भरत होतीं; पण गिरणीच्या कागदापुढं या कागदांचा निभाव कसा लागणार? प्रत्येक हिंदी धंद्याची ही अशी अवस्था आहे."

" हिंदी धंद्याचीच नव्हे, तर सर्व तर जगांतल्या धंद्यांची ही अशी अवस्था झालेली आहे!"

" होय, पण तीं स्वतंत्र राष्ट्रं आहेत. त्यांच्याजवळ पैसा आहे. यंत्रकला साध्य झाल्याबरोबर त्यांनी आपल्या देशांत तऱ्हेतऱ्हेचे यांत्रिक कारखाने उघडले. निरनिराळ्या देशादेशांत देवाणघेवाण पूर्वी-प्रमाणंच चालू राहून सर्वांची सांपत्तिक स्थिति पूर्वीप्रमाणंच राहिली."

" देशाची राहिली, पण माणसांची राहिली नाही. आता या जुन्नरी कागदावरूनच पाहा. पूर्वी वीसपंचवीस कारखानदारांच्या कार-खान्यांत पांचसातशे लोक पोट भरीत असत." मीं दिग्दर्शन केलें.

" आणि शिवाय या कारखान्यासाठी कागद काढण्याकरिता लाकडी चौकटी लागत त्या तिथले कारागीरच करून देतात. काग-दांचा धंदा संपुष्टांत येतांच चौकटीचंहि काम बहुतेक बंद पडलं." मुकुंदरावांनी सांगितलें.

" म्हणजे पंचवीस कारखानदार आणि हे दुसरे कागद करण्यासाठी माल तयार करून देणारे कारागीर असे सर्व स्वतंत्र, भांडवलवाले होते. शिवाय मजूर. "

" हे मजूरसुद्धा कांही सारख्या वेतनावर नसतात. कारखान्यांत स्त्रीपुरुष मजुरांना त्यांच्या कामांतील कसब असेल तशी मजुरी देण्यांत येते. चिंध्या कुटणारे, कागद काढणारे, घोटणारे अशी निरनिराळीं कामं करणारांना निरनिराळी मजुरी मिळते अशा कामाला वेळ लागतो, पैसा जास्त लागतो. त्यामुळं माल थोडा निघून महाग पडतो. मात्र आर्थिक विभागणी चागली हाते. यांत्रिक कारखान्यांत इतक्या प्रकारची विभागणी होत नाही आज जुन्नरांत एक कागदाचा कारखाना काढला की एक मनुष्य फक्त श्रीमंत व स्वतंत्र राहील बाकी तीनशे लोक निव्वळ मजूर होतील. शिवाय कामांत हाताचं कसब कांही नाही चारसद्धा मॅनेजर, मुकादम वगैरे लोकांच्या अंमलाखाली त्यांनी एकसुरी यंत्र चालवायचीं शिवाय कामाला कमी लोक पुरतात, त्यामुळं कित्येक बेकार राहातील. "

" परदेशांत तरी हाच मालक-मजूर प्रश्न पडलेला आहे " मीं म्हटले

" तरी त्यांची आपली तुलना होणार नाही. कारण त्यांच्यांनला शेकडो लोकांत एक मालक गबर झाला आणि बाकीचे मजूर होऊन कांही शेकडो बेकार राहिले तरी तो पैसा त्यांच्या देशांत राहातो आपलं असं होतं, की आपल्याला परदेशाहून स्वस्त, सुबक आणि टिकाऊ मालाचा पुरवठा होतो. आपण गिरण्या काढल्या तरी त्यांतलीं यंत्रं वगैरे माल परदेशी असल्यामुळं आपला देशी जिन्नससुद्धा बहुतेक परदेशी असतो आणि पुन्हा महाग पडतो. त्याचा टिकाव परदेशी मालाबरोबर लागत नाही. त्यामुळं देशी यंत्रं तयार झाल्याखेरीज आपला निभाव लागणं शक्य नाही. यंत्रं तयार करायला लक्षावधि रुपयांचं भांडवल आपल्या गरीब देशानं कुठून आणावं ? "

' पण यंत्रं असूं दे परदेशी सध्या. आपण लोकांनी जरी देशी गिरण्यांतला माल घेतला तरी पंचवीस टक्के हिंदुस्थानांत राहातील. "

" खरंच, श्रीमंतांनी गिरण्या सुरू कराव्या. ' सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः ! ' हाताचं कसब निभावत नाही तर सगळा धंदा कां बुडूं द्यावा ? जरूर गिरण्या काढाव्या. "

जरा वेळ आम्ही आपापल्या विचारांत स्तब्ध होतों. नंतर विफल आशेच्या आधीन झाल्याप्रमाणे मुकुंदराव म्हणाले,

" कांही कांही वेळेला असं वाटतं, की आपल्याजवळ खूप पैसा असायला हवा होता नाही ? "

" इंद्र कुठं राहातो तें कळलं तरी बरं होईल. नाही ? म्हणजे रघुराजाप्रमाणं त्याच्यावर स्वारी करून सोन्याचा पाऊस तरी पाहून घेतला असता. " मीं म्हटलें.

" आपल्या आधुनिक शास्त्रांचं हेंच तर चुकतं. त्यांना बाकी सर्व माहिती असते, पण मुख्य मुद्द्याच्या बाबतींत मात्र अज्ञान ! "



# प्रकरण २७ वें

यशोदाबाईंना सर्व गावांतले लोक 'मावशी' म्हणत. इंदिराताई-सुद्धा त्यांना मावशी म्हणत. तेव्हा मीहि त्यांना तसेंच म्हणूं लागलें होतें.

मावशींचें बहुतेक सर्व आयुष्य पुण्यांत गेल्यामुळे त्या मला दूरदूर ठेवीत नसत. फक्त सकाळीं त्यांचें कडक सोवळं असे. एकदा त्या जेवून मोकळ्या झाल्या की आम्हा कोणालाहि कुठे शिवण्याची बंदी नसे. झालेंच तर मी शिकलेली म्हणूनहि मला त्या घालूनपाडून बोलत नसत. उलट त्या माझ्या शिक्षणाबद्दल गौरवपर बोलत.

यामुळे घरांत मला परकेपणा मुळीच वाटतच नसे.

नरकचतुर्दशीच्या दिवशीं आम्ही पहाटे फराळाला बसलों होतो. इंदिराताई जरी बऱ्या असल्या तरी त्यांना पथ्य संभाळावें लागे. तेव्हा त्यांच्या पानांत नैवेद्यापुरता एकेक पदार्थ वाढला होता. पण इतपत दिवाळी निभावते आहे यांतच त्या खूष होत्या।

इंदिराताईंनी सहज मला "पुण्यालाच शिकलांत का?' म्हणून प्रश्न विचारला

मुकुंदराव चेष्टेने हसून माझ्याकडे पाहून पत्नीला म्हणाले, "अग, तुला माहीत नाही. यांची नी माझी फार जुनी ओळख आहे. सुमतीताईंचे आपल्यावर मोठे उपकार झाले आहेत."

"ते कसे बाई?"

"यांच्यामुळंच खरं म्हणजे आपल्या लग्नाचा योग जुळून आला."

मावशी तळणींतून ताज्या चकल्या वाढण्याकरिता घेऊन आल्या होत्या. त्यांनी विस्मयाने विचारलें, "हा कुटला रे बाबा बादरायणी संबंध जुळवतो आहेस?"

"अग आई, बादरायणी नव्हे. लहानपणीं आपण त्या सोहनींच्या घरीं राहात होतों ना, तेव्हा त्या विशानं वेणी ओढली एका मुलीची, तें आठवतं ना तुला?"

" तें कसं नाही मला आठवणार ? केवढीं रणं माजलीं त्या एवढयाशा गोष्टीवरून ! "

" गोष्टीवरून रणं माजलीं ? " मीं आश्चर्यचकित होऊन विचारलें.

" हो ना. " मुकुंदराव सांगूं लागले, " त्या विशानं घरीं जाऊन बरोबर उलटाच्या पालटा प्रकार करून आईवडिलांना सांगितला. म्हणजे मी तुझी – तुमची वेणी ओढली आणि विशानं मला पकडून आणलं, आणि मग मीं सूड उगवण्याकरिता विशाला बेदम मारलं हें त्यानं आणखी नवीन काढलं. मग काय विचारतां ? त्याच्या आईबापांनी मला बेदम मारलं. आई दहा माणसांचा स्वैपाक त्याच्या घरीं करीत होती. पुन्हा निर्वेतन. पण त्या सोहनींच्या घरीं आम्हां दोघांना आश्रितासारखं वागवीत. ती बाई वाटेल तसं आईला बोले. पण आई सर्व निमूटपणानं सहन करी. "

" मग काय करायचं ? आम्ही निराश्रित. लोकाकडे राहिलें असतें तर पांचसात रुपये पगार मिळाला असता. पण मला वाटे, दूरचीं का होईनात पण नात्याचीं माणसं आहेत, तेव्हा मुकुंदा मिळवता होईपर्यंत काढावेत कष्ट. पण मुकुंदाचं कांही ऐकून न घेतां त्याला जेव्हा मारलं तेव्हा बरीक मला वाईट वाटलं. पुन्हा मुकुंदाला नेहमी सगळीं माणसं काम सांगून अभ्यास करूं देत नसत. "

" मग पुढं काय ? " मीं उत्सुकतेने विचारलें.

" अन् इतकं असूनसुद्धा आई त्यांच्या विनवण्या करूं लागली. "

" सगळं पुढं नीट जमलं म्हणून बरं. नाहीतर काय झालं असतं कुणीं सांगावं ? " यशोदाबाई म्हणाल्या.

" काय करायचा तो विचार आता ? इंदूचे वडील होते त्या वेळीं पुण्याला. हिचा भाऊ नुकताच प्लेगनं वारला होता आणि हिची आई अगदी भ्रम लागल्यासारखी झाली होती. आमच्या एका मास्तरांनीच त्यांच्याजवळ आम्हांला ठेवून घेण्याबद्दल शब्द टाकला. त्या दोघांनी मला मुलाप्रमाणं संभाळलं. "

" फार सज्जन माणसं हो. " मावशींच्या डोळ्याला पूर्वीच्या आठवणींमुळे पाणी आलें. " हिचा भाऊ मुकुंदाच्याच वयाचा. तेव्हा मुकुंदाचा हिच्या आईला तेव्हाच ळळा लागला आणि त्या बऱ्या झाल्या. त्यांच्या घरांत आम्हांला सत्तेच्या घरासारखं वाटायचं. मुकुंदाचं सगळं शिक्षण त्यांनी हौसेनं केलं आणि वर मुलगी दिली. याला चांगली नोकरी लागली नी ती माऊली गेली तीन वर्षांपूर्वी वडीलहि गेले

काही वेळ स्तब्धता पसरली. त्या त्यांना वाईट वाटत होतें आपुलकीमुळे मलाहि सहानुभूति वाटत होती

मग इंदिराताई म्हणाल्या, " एकूण त्यांचा नी आपला पूर्वापार ऋणानुबंध आहे म्हणायचा ? तरीच त्या आपल्याला एकदम घरच्यासारख्या वाटायला लागल्या. "

आम्हांला सर्वांना हसूं आलें.

मग अचानक आठवण झाल्याप्रमाणे मुकुंदराव म्हणाले, " खरंच आई, मी काल सांगायचं विसरलों. भाऊबिजेच्या दुसऱ्या दिवशींच ओझरच्या गणपतीला आपण जायचं, बरं का. साठे वकील मोटार घेऊन येणार आहेत आपल्याला न्यायला. हिच्या सोबतीला हिच्या मैत्रीण सोनुताई येतील. आपण तिघंजणं, वकील आणि वकिलीणबाई असे जाऊं ओझरला. सकाळीं जाऊं आणि संध्याकाळीं परत येऊं. "

" मलादिखील न्यावं. " इंदिराताई आर्जवाने बोलल्या.

मुकुंदराव समजूत करीत म्हणाले, " इंदु, आता कुठं तुला जरा बरं वाटतंय् आणि इतक्यांतच उन्हातान्हांतला प्रवास तुला कसा बरं झेपेल ? आणखी कांही दिवसांनी नेईन तुला. थोडी शक्ति येऊं दे ना. "

" मला कशाची शक्ति येतेय् ! " इंदिराताई निराशेने म्हणाल्या. " आता बरी आहें तोंवर आलें तर जमायचं. पुन्हा आजारी पडलें अंथरुणावर की संपलं ! "

" असा काय लहान मुलासारखा हट्ट करावा ? " यशोदाबाई जरा रागांतच बोलल्या, " दहाबारा मैल जायचं अन् तितकंच परत

यायचं. पुन्हा जुन्नरच्या पुढं वाट किती खराब आहे! चांगल्या धट्टयाकट्टयांचीं हाडं खिळखिळीं होतात, तिथं तुझा काय निभाव लागणार? आपण तिथं पोचतों तों उन्हं होतील. देवळा-जवळच्या कडत वाळूतून आधी चालायचं, मग नदींतून पलीकडे चालत जायचं. काही नाही यायचं ओझरला."

"बरं राहयलं."

आम्ही सर्व फराळ आटोपल्यामुळे उठून आंचवलों.

मला इंदिराताईंच्या शेजारची माडी दिलेली होती तेथेच मी आता गेलें. इतक्यांत माझ्या मागोमागच इंदिराताई वर आल्या आणि त्यांनी धप्कन् पलंगावर अंग टाकून मुसमुसून रडण्यास आरंभ केला. मी त्यांच्याजवळ जाऊन बसणार होतें, पण मुकुंदरावच वर आले आणि पलंगावर बसले.

मी माझ्या माडींत एका बाजूला जाऊन विणकाम करूं लागलें. तरी तेथूनहि मध्ये एक फटी पडलेलें दार असल्यामुळे मला बोलणें ऐकूं येतच होतें.

"इंदु, तूं आमच्याबरोबर येऊं नयेस अशी का आमची इच्छा आहे? मला तर तूं प्रत्येक ठिकाणीं यावंस असं वाटतं. पण तुला दग-दग सोसणार नाही. तूं आजारी पडलीस तरी तुलाच भोगावं लागतं. म्हणून आम्ही नको म्हणतों, दुसरं काय?"

"माझ्या आजाराचं काय! नेहमीचाच पाठिराखा आहे तो. "एखादे वेळीसुद्धा मला अितर चार लोकांसारखी मौज करावीशी वाटू नये का? मी म्हणतें, दगदगीनं पडलें मी आजारी तरी काय विशेष होणार आहे? सगळ्यांतून कायमची सुटलें तर मलाहि ल्ं नी माझ्या भोवतालच्या—"

पण यापुढले शब्द उमटले नाहीत. मुकुंदरावांनी त्यांच्या तोंडा-वर हात ठेवला असावा.

"असं वेड्यासारखं पुन्हा बोलणार नाही म्हणून कबूल केलंस तर नेईन तुला ओझरला."

" नाही, नाही बोलणार. खचित न्यायचं ना मला ? "

केवढा उल्हास भरला होता इंदिराताईंच्या त्या शब्दांत !

" हो न्यायचं. " मुकुंदराव मोठ्याने हसले. " बाळ हट्ट करतं, अन् हट्ट पुरवला नाही की रडतं ! मग नको हट्ट पुरवायला ? वेडी पोरगी ! "

इंदिराताईहि हसल्या.

इकडे माझ्या गालावरून मात्र अश्रू ओघळले. मला वाटलें, इंदिराताईचें आयुष्य दुखण्यामुळे व्यर्थ झालें आहे; पण प्रेमामुळे देव्हाऱ्यांतल्या देवतेप्रमाणे त्यांच्या आयुष्याला महत्त्व आलें आहे.

मला सर्व कांही आहे. पण...पण प्रेमाचा अभाव आहे. प्रेमाच्या अभावीं स्त्री म्हणजे पूजा मिळत नसलेल्या देवतामूर्तीप्रमाणेच निरर्थक आहे !

असलें प्रेम लाभत असेल तर जन्मभर आजारी पडलें म्हणून तरी कुठे बिघडलें ?



# प्रकरण २८ वें

इंदिराताईना नेण्याचें ठरल्यावर मुकुंदरावांनी एक स्वतंत्र लॉरीच भाड्याने ठरविली. तींत बाकांच्यामध्ये खालच्या बाजूला एकीवर एक अशा दोन गाद्या व तक्क्या, उशा वगैरे ठेवून इंदिराताईना बसण्यासाठी किंवा वाटल्यास निजण्यासाठी अशी आरामशीर व्यवस्था करण्यांत आली.

मनाला हुरूप वाटत असल्यामुळे इंदिराताई आजारीसुद्धा दिमत नव्हत्या. त्यांचा तोंडवळा आणि शरीरकाठी इतक्या वर्षांच्या आजाराने जीर्ण झाली होती ती गोष्ट निराळी.

सबंध लॉरी केल्यामुळे जागा पुष्कळ होती. तेव्हा आणखी मंडळी घेण्यास हरकत नव्हती. विरंजगावचे भटजी आणि भटीणबाई यांना यशोदाबाईनी घेतलें आणि मुकुंदरावांची तीनचार मित्रमंडळी विरंजगावाहून व जुन्नराहून आली. दोघेजण सपत्नीक असून त्यांच्या बायका माझ्याच वयाच्या व मोठ्या बोलक्या होत्या.

नदीवर स्नान, गणपतीचें दर्शन, पूजा, एकादसणी अशी भटजींची व मावशीची गडबड उडाली होती. पूजा झाल्यावर मावशी आणि भटीणबाई मोदक व स्वैपाक करण्यांत गुतल्या.

आम्हीहि सर्वांनी स्नान, दर्शन व चहाफराळ करून सर्व देऊळ पाहून घेतलें. गावांत व नदीवरून थोडें हिंडून आलो.

ओझर येथे अष्टविनायकांपैकी विघ्नेश्वर या गणपतीचें स्थान असून देऊळ चिरेबंदी बांधणीचें आणि नदीकाठीं असल्यामुळे रम्य आहे. नदीला चांगले घाट आहेत. पाणी थोडें असल्यामुळे नदींतून इकडून तिकडे सहज जातां येतें.

एकंदर देवळाची भव्य बांधणी आणि त्याच्या भोवतालचा भव्य तट यांमुळे देवळांत मन शांत व गंभीर होतें.

पण हा गंभीरपणा टिकूं देणारी बरोबरीची मंडळी नव्हती म्हणून बरें, नाहीतर गांभीर्यावरून मनोरूपी अग्निरथाला, विचाररूपी प्रवा-

शांना घेऊन सरळ पुढे जाऊं दिलें की पुढला मुक्काम औदासिन्याचा ठरलेलाच !

त्या दिवशी गप्पांना इतके विषय निघाले, इतका जोरजोराचा वादविवाद झाला आणि हास्यविनोदाला इतका पूर आला, की त्या सगळ्याचें पाणी झालें असतं आणि तें पाणी देवळापुढल्या कुकडी नदीला मिळालें असतें तर तिचें हातभर पाणी आणखी वितीने वाढलें असतें !

हवेंतल्या स्रोतांना बरीक पूर आला असेल कदाचित् !

परंतु माझ्या म्हणण्याचा असा अर्थ नाही, की आमचें त्या दिवशींचं सर्वच बोलणें हवेंत मिळून गेलें म्हणून ! दोनतीन विषय फारच महत्त्वाचे होते. राजकीय विषय निघालेच. त्याशिवाय एक विषय निघाला तो म्हणजे देवळाचा. पूर्वी देवालयांना अतोनात महत्त्व होतें. श्रद्धेच्या जोरावर मनुष्यांना देऊळ या संस्थेमुळे मनःशांति लाभे आणि दुराचारापासून बरीचशी परावृत्ति होई

याच संस्थेंतले लबाड लोक बायाबापड्यांना पैशाच्या बाबतींत लुबाडीत, पण अंधश्रद्धेमुळे त्या लोकांचें मन श्रीमंत राही आपण देवाच्या कार्यांत पैसा खर्चतों आहों त्याचं चांगलें फळ या जन्मीं नाही तरी पुढल्या जन्मीं आपल्याला खास मिळणार अशी आशारूपी मानवी जीवितांतील दिव्य शक्ति त्याच्या मनात दृढमूल झालेली असे.

आता देवदेवळावरली लोकांची श्रद्धा उडाली देवाची पूजा होते चारआठ आण्यांची एकादशी होते. पण पूर्वीमारखी भावना नसल्यामुळे मनःशाती मात्र लाभत नाही; सुविचारप्रवृत्तीहि होत नाही. संस्थेंतल्या अहितकर, हितकर अशा बहुतेक रूढ गोष्टी नष्ट झाल्या; पण त्या जागीं नवीन विचारांनी नटलेल्या हितकर गोष्टी मात्र आल्या नाहीत

पाश्चात्य देशांत धर्मश्रद्धा बुडाली तरी चर्च ही संस्था त्या लोकांनी कायम राखून ( बहुतेक देशांत ) तिला नवें स्वरूप मात्र दिलें

चर्चमधील उपदेशक आपलें बायबलपुराण सांगतोच आणि त्याशिवाय गावच्या गरीब किंवा नाना प्रकारच्या अडचणींत सापडलेल्या लोकांना यथाशक्ति मदत करतो. कुणीहि त्या उपदेशकाकडे किंवा त्याच्या पत्नीकडे निःशंक मनाने जाऊन किंवा त्यांना आपल्या घरीं बोलावून आपली अडचण कळवावी. मग ती पैशाची असो किंवा दुसरी कसली असो. तो उपदेशक त्या अडचणीत सापडलेल्या मनुष्याला धीर देतो, सहानुभूति दाखवतो, उपदेश करतो आणि आर्थिक किंवा दुसरी कसलीहि मदत यथाशक्ति करतो. हा उपदेशक म्हणजे दीन-अनाथांना संकट-प्रसंगी हमखास हात देणारा हुकुमाचा एक्क्याच !

लोकांना आर्थिक साहाय्य करतां यावें म्हणून हा उपदेशक वर्गणी जमवतो, जुने कपडेलत्ते जमवून, लिलाव करून गरिबांना अत्यल्प मोलाने देतो आणि नाटय व नृत्यप्रसंग घडवून आणून त्या-योगेंहि पैसे जमवतो. या उपदेशकाला पगार असतो. त्यावर तो स्वतःचा निर्वाह करतो.

आपल्याकडे एकेक गावात अनेक देवळं असतात. त्याचे पुजारी वेगळे, पूजेअर्चेचे व उत्सवाचे प्रकार वेगळे, त्यांची उत्पन्नें वेगळीं, कथेकरी, पुराणिक आणखीच वेगळे व त्यांची बिदागी वेगळी ! आणि पैशांची इतकी आवजाव होऊन पुजारी पुराणिकांखेरीज त्याचा कुणालाच काही उपयोग नाही. देवळांतल्या भिकाऱ्यांच्या रांगेला एखाद्या दात्याने मूठभर तांदूळ किंवा पैपैसा टाकला की संपलें ! गरिबांची जबाबदारी कुणावरच नाही. त्यामुळे या गावचें भिकार त्या गावीं नी त्या गावचें भिकार या गावी, असा उपद्रव देत हिंडत असतें. त्यापेक्षा ज्या त्या गावाने आपल्या गावच्या लुळ्यापांगळ्या लोकांचा खर्च अंगावर घेऊन, अडचणींतल्या लोकांना वेळप्रसंगीं मदत केली तर किती चांगलें होईल ?

देऊळ हीच संस्था हें कार्य चांगल्या प्रकारें करूं शकेल. नवीन प्रकारचीं कथापुराणें यांमुळे मानसिक मदत आणि द्रव्यामुळे व इतर सहाय्यामुळे प्रापंचिक मदत, अशा दोन्ही प्रकारांनी ही संस्था उपयुक्त करतां येईल.

सर्व वादविवादाचा निष्कर्ष याप्रमाणे काढण्याजोगा होता. मग मंडळींनी मुकुंदरावांना सूचना दिली, की तुमच्याच गावीं हीं अशा प्रकारची संस्था चालू करा.

मुकुंदरावांनी भटजींना विचारलें, पण त्यांना मुद्दे समजेनातच! शेवटी भटजींच्या हातीं ती संस्था द्यायची म्हणजे आधी त्यांना शिक्षणांत बुचकळ्या देऊन शुद्ध केलें पाहिजे. आणि तितकें कालहरण न करतां कुणातरी एखाद्या समजूतदार इसमाला तशा प्रकारची सहाय्यक संस्था चालवतां येते की नाही तो प्रयोग करण्यास सांगावा असें ठरलें. आणि विशेष पदरमोड कुणीहि एकानेंच न करतां आर्थिक सहाय्य गावकऱ्यांकडूनच व्हावें आणि त्यांतूनच जें काय द्रव्यसहाय्य करता येईल तें करावें असें ठरलें आणि विरंजगावकरांच्या रामाच्या देवळात सर्व गावकऱ्यांनी महिन्यांतून दोन एकादशांना अवश्य यावें आणि तेथे नवीन प्रकारचीं कथाकीर्तनें व्हावींत असेंहि मुकुंदरावांच्या मनाने घेतलें.

हळूहळू मुकुंदरावांनी विरंजगावीं चालवलेल्या सुधारणेच्या प्रयत्नांसंबंधी बोलणें निघालें. तेव्हा मुकुंदराव म्हणाले, "बायकांच्या बाबतीत जोंपर्यंत सगळा अंधार आहे तोंपर्यंत पुरुषांची सुधारणा एकांगीच राहाणार. बायकांच्या मनावर जुन्या रूढीची जी पुटंच्या पुटं बसली आहेत ती धुऊन निघाली पाहिजेत. पुरुषांच्या बाबतींत तरी सुधारणेचं गाडं धावत चाललं आहे असं नाही म्हणतां येत. सोळा आणे पिकासाठी मशागत करावी तेव्हा दोन आणे पदरांत पडावे तशीच अवस्था पुरुषांच्या बाबतींतहि आहे. पण मला आपलं असं वाटतं, की एका पिढीतले स्त्रीपुरुष साक्षर झाले तर पुढल्या पिढीच्या शिक्षणाला प्रोत्साहन मिळेल. आता जें कांही शिक्षणाच्या बाबतींत सर्वत्र औदासिन्य पसरलेलं आहे तें दूर होण्याला लवकर मार्ग सापडेल. आता म्हणजे घरांतल्या पुरुषांनी समजूत घातली तरी कुणीहि बायका शाळेंत यायला तयार नाहीत."

"तें कांही नाही सुमतीताई, तुम्ही आता विरंजगावाला येऊन राहा आणि मुकुंदरावांच्या कार्याला मदत करा."

" अरे, ही कल्पना टोस्ट करा. " एकजण ओरडले आणि जेवतांना पाण्याचीं फुलपात्रें एकमेकांना लावून सर्वजण पाणी प्याले आणि मग खूप हशा पिकला !

" म्हणजे ! मला नोकरी सोडून विरंजगावालाच राहयला आलं पाहिजे. " मीं हसून म्हटलें.

" But it is worth that. " ( तसं करण्याइतकी त्या कार्याची योग्यता आहे. ) मुकुंदराव माझ्याकडे बघून अत्यंत गंभीरपणाने म्हणाले, " आपल्या एका गावाची जर सर्वांगीण उन्नति करून दाखविली किंवा निदान अनेक अयशस्वी प्रयोगान्ती एखादी यशस्वी दिशा आपल्याला सापडली तरी अतोनात फायदा होणार आहे. "

मी पण मुकुंदरावांच्याकडे पाहात होतें. त्यांचा चेहेरा किती उदात्त दिसत होता ! त्यांच्या पाणीदार डोळ्यांतून निघणारे तेजोमय किरण माझ्या हृदयांत शिरून एक दिव्य लेख काढून ठेवीत आहेत असा मला भास झाला.



# प्रकरण २९ वें

इंदिराताईंच्यासकट त्या दिवशींची आमची सफर सर्वांना आनंद-दायक झाली. दिवसभर त्या बोलत होत्या. दुपारीं जेवल्यानंतर उगीच थोडं दमल्याप्रमाणे त्यांना झालें होतें इतकेंच.

सफरीनंतर दोन दिवस घरांत त्या चांगल्या हिंडतफिरत होत्या. मुकुंदराव म्हणालेसुद्धा, "जर तूं ओझरला जाण्याच्या श्रमां-मुळं आजारी पडली असतीस तर माझं मन मला टोचत राहिलं असतं."

इंदिराताई म्हणाल्या, "पण नेलं त्यामुळं माझ्या मनाला किती बरं हुषारी वाटली!"

मीं आणि मावशींनी पण त्यांना दुजोरा दिला.

आणि या बोलण्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळींच इंदिराताईंना अंथरुणावरून उठवेना. रात्रीपासून तापाची कसकस आली असून दुपारीं ताप पुष्कळच वाढला. पडसें-खोकलाहि होताच.

मला वाटतें, सफरीहून आल्यानंतर दोन दिवसपर्यंत इंदिरा-ताईंनी ताप अंगावर काढला. कुणाला समजू दिला नाही.

रोज ताप येई, केव्हातरी कमी होई, पुन्हा चढे, असे आठ दिवस गेले. नुसता तापच नव्हे, तर अपचन, पोटांत दुखणें, डोकें दुखणें अशा नाना प्रकारच्या भावना त्यांना होत.

इंदिराताईंना राजयक्ष्मा होता.

मावशी, मुकुंदराव नेहमीप्रमाणे शुश्रूषा करीत. एक मोलकरीणहि त्यांची चाकरी करी.

मी काय जी दिवसभरांत त्यांची शुश्रूषा करीत असे किंवा वाचून दाखवीत असे त्याचें मात्र इंदिराताईंना फार वाटे. त्या मला म्हणत,

"सुमतीताई, तुम्ही कशाला माझ्याकरितां इतका त्रास सोसतां? मीं जनीला हाक मारली की तिकडून तुम्हीं येऊन माझं

काम करतां. तुम्ही दोन घटका बोलत बसतां, वाचून दाखवतां तेवढंच फार वाटतं मला. ”

मी त्यांना म्हणे, “ मला हौस वाटते तुमचं काम करतांना; मग तुम्ही कां उगीच बोलतां ? ”

आठ दिवसांनी इंदिराताईना पुन्हा पुष्कळ बरें वाटूं लागलें आणि सर्वांचाच जीव स्वस्थावला.

एके दिवशीं अगदी भल्या पहाटे मुकुंदरावांनी मला जवळच असलेल्या लेण्याद्रीवर नेलें.

जुन्नरच्या आसपास खूप लेणीं आहेत. त्या सर्वांत लेण्याद्रीवरलें लेणें प्रेक्षणीय आहे. फार निसर्गरम्य स्थळ आहे तें.

सत्तर फूट लांब, सत्तर फूट रुंद आणि बाराचौदा फूट उंच असा प्रचंड सभामंडप एका शिळेंत खोदून काढलेला आहे.[1] काल्यांच्या लेणींतल्याप्रमाणे भोवताली लहानलहान खोल्या आणि त्यांत अंगचे कोरलेले ओटे आहेत. या सभामंडपांत खांब किंवा सांधा कोठेहि नाही. याच लेण्यांत विन्मुख तोंडाचा गणपति कोरलेला असून त्याची रोज पूजाअर्चा होते.

आम्ही आता आलों तेव्हा भटजी तेथे येऊन पूजेच्या तयारींतच होते. ते मुकुंदरावांच्या चांगल्या ओळखीचे असल्यामुळे त्या भटजींनी मला लेण्याद्रीवरील गणपतीची स्थापना पार्वतीने कशी केली, त्या गणपतीचें दर्शन आता कोणालाच होत नाही, नाना फडणविसांनी डोंगरापाठीमागील गुहेंत जाऊन दर्शन घेण्याचा प्रयत्न केला, परंतु दैवी साक्षात्कारामुळे त्यांनी तो बेत रहित केला; मूळ गणपतीचें लेण्याद्रीला पाठीकडून दर्शन होतें व म्हणून या लेण्यांत पाठमोरा गणपति कोरला आहे वगैरे माहिती व चमत्कारहि सांगितले.

लेण्याद्रीवरून दिसणारा सभोवतालचा देखावा फार सुंदर आहे.

भटजी पूजे-अर्चेला लागले तेव्हा पूजेनंतर चहा करावयाचें त्यांनी कबूल केलें होतें. स्वैपाकासाठी जवळच एक खोली असून वर एक विहीरहि आहे. तिचें पाणी फार उत्तम आहे.

सूर्योदयाचा देखावा फारच मनोहर दिसत होता. पक्षी किती जवळून उडत होते! आकाश जणू हाताला लागेलसें वाटत होतें! पटांतल्या घरांप्रमाणे शेतें व खेळांतल्या घरांसारखीं मोठालीं घरें दिसत होतीं. पाहातां पाहातां खाली हालचाल दिसूं लागली. गुरांचे कळप चालत असलेल्या पक्ष्यांसारखे गंमतीचे दिसत होते.

मुकुंदराव हाताने स्थलनिर्देश करीत होते, " हें खाली जुन्नर गाव अन् हा शिवनेरी. ही कुकडी नदी इकडे अन् ही मीना. या नद्यांच्यामुळंच जुन्नर तालुका बागाइतीला चांगला झाला आहे."

" जुन्नरचा विस्तार तर पुष्कळच आहे."

" वा! पूर्वी निजामची राजधानी होती ही. केवढं या शहराचं वैभव होतं! मोठमोठया वाडे-हवेल्यांनी नटलं होतं. व्यापारहि खूप होता."

मीं विचारलें, " एखाद्या गावाचं वैभव असं कसं एकदम ओसरतं? राजधानी हालली तरी लोकांचीं डोकीं कांही हालत नाहीत ना?"

" हालतात तर. मोठमोठे सरदार-दरकदार लोक दुसरीकडे राहूं लागतात."

ऊन्ह लागूं लागल्यामुळे आम्ही बोलत बोलतच सभामंडपांत जाऊन बसलों. या ठिकाणीं भरपूर उजेड असून मोकळी हवा खेळत असल्यामुळे थंड वाटत होतें. भटजींची पूजा अजून चालूच होती.

त्यांच्यापासून दूरच्या एका ओटयावर आम्ही स्थानापन्न झाल्यावर मीं विचारलें, " पण हे मोठमोठे लोक जरी दुसरीकडे गेले तरी व्यापार कां चालूं नये? एकदम हातपाय गळाल्यासारखी 'कारागिरांची स्थिति कां होते? राजधानीच्या गावीं किंवा मोठमोठया गावीं सधन लोक राहातात तिथं व्यापाराच्या मोठाल्या पेठा असाव्या, व्यापाऱ्यांनी तिकडे धाव घ्यावी हें योग्यच आहे; पण सर्वच व्यापार कां खालावतो? गावाचं किंवा प्रांताचं जें कांही वैशिष्टय असतं त्या हुन्नरीच्या किंवा पीकपाण्याच्या जोरावर परप्रांतांशीं दळणवळण ठेवून लोकांनी व्यापार भरभराटींत कां राखूं नये?"

" मलादेखील ह्याच प्रश्नं पडला आहे. आता कागदाचा व्यापार बसला तर एखाद्या सधन मनुष्यानं कागदाची गिरणी काढून याच कारागिराचा उपयोग कां करूं नये ? कारण यंत्रांचं सहाय्य असलं तरी कांही कसबी माणसं असावींच लागतात. बरं, हें एक राहिलं. पण दुसरे व्यापारधंदे काय थोडे आहेत ? आपल्या लोकांत महत्त्वाकांक्षाच नाही. पोटापुरतं मिळालं आणि व्यसनाची तलफ भागली की कुणाला जास्त पैसे मिळवावेत अशी इच्छाच होत नाही. जमिनीवर सरपटण्या-पुरती जागा मिळाली की लोक संतुष्ट असतात. खरोखर, हा असला अल्पसंतोषीपणा म्हणजे चिखलासारखा आहे. या चिखलांत सर्वांनी बुजबुजाट करून लोळण्यांत काय फुशारकी आहे तें मला समजत नाही ! "

मुकुंदराव मोठ्या आवेशाने बोलत होते. त्यांच्या आवेशांत कळकळहि भरून राहिली होती. त्यांचें बोलणें ऐकतांना मला बोला-वेसेंच वाटेना. जरा थांबून मुकुंदराव पुन्हा बोलूं लागले,

" बरं, व्यापारासाठी अमुकच जिन्नस हवे असं का कांही आहे ? यःकश्चित् पदार्थ विकून पाशीं लोक लक्षाधीश, नव्हे कोटय-धीश झालेले आहेत. आमच्या या जुन्नर तालुक्यांत कांदे, बटाटे, लसूण, केळीं हें पीक फार चांगलं येतं. मग या तालुक्यांत एखादा कोटयधीश कांदावाला, एखादा बटाटावाला, लसूणवाला, केळीवाला असे कां होऊं नयेत ? हिंदुस्थानांत हरतऱ्हेचे जिन्नस कारागिरीनं किंवा नैसर्गिक रीतीनं तयार होतात, त्यांवर आपल्या लोकांनी सधन कां होऊं नये ? "

" मला वाटतं, आपल्या खेड्यापाड्यांत अज्ञान फार आहे. इतर देशांच्या मानानं आपण किती निकृष्ट दशेंत आहोंत याची फारशी कुणाला जाणीवच नाही. साक्षरताप्रसारानंच आपलं पुष्कळसं काम होईल. "

" माझं या साक्षरतेच्या बाबतींत अगदी खरंखरं मत काय आहे तें सांगू ? "

" हुं. " मीं जरा आश्चर्यानेच विचारलें.

" अगदीच अज्ञानापेक्षा साक्षरता बरी. पण माझ्या मतानं नुसत्या पंचवीस साक्षरांपेक्षा इंग्रजी चारपांच इयत्ता शिकलेला एक मनुष्य जास्त चांगला. मीं मनांत अशी एक योजना केली आहे, की इंग्रजी चार वर्ग चालू करावे अन् ते मोफतच ठेवावे. पुढल्या पांच-सहा वर्षांत आमच्या गावचीं दहा मुलं जरी इंग्रजी चारपांच इयत्तां-पर्यंत शिकून तयार झाली तरी पुरे. "

" चांगली त्यांतल्या त्यांत हुषार आणि कर्तबगार अशी मुलंच निवडावीं.

" हो. तसंच केलं तर उपयोगी. नंतर या मुलाचा कल असेल त्याप्रमाणं त्यांना दोन धंदे शिकवायचे. शेती ज्यांना करायची असेल त्यानी सुतारकाम, लोहारकाम किंवा दुसरा कोणताहि जोड-धंदा शिकला पाहिजे. म्हणजे पीक गेलं किंवा दुसरी कांही अडचण आली तरी त्या जोडधंद्याच्या मदतीनं कठीण दिवस निभावून जावे. दुष्काळ वरचेवर पडतो अशा प्रांतांत शेतकऱ्यांना साक्षर करण्या-पेक्षाहि त्यांना असे जोडधंदे शिकवण्यांतच पैसा खर्चला पाहिजे. त्याची जास्त जरुरी आहे. पुढल्या पंचवीस वर्षांत विरंजगावचे एकचतुर्थांश लोक जरी असे तयार झाले तरी मी धन्यता मानीन. "

" खरोखर ही कल्पना मोठी सुंदर आहे. पण ही इंग्रजी शाळा काढायची तर त्याला पैसे पुष्कळ लागतील. "

" इंग्रजी शाळा सरकारी धर्तीवर काढली तर लागतील पुष्कळ पैसे. पण आपण रात्रीचे वर्ग जसे चालवतों– म्हणजे मी आणखी दोघे-जण, म्हणजे तो भिवा कोष्टी आणि एक मळेवाला आहे तो, असे आम्ही तिघे रात्रीचे वर्ग चालवतों. पण जुन्नरला कोर्ट असेल तेव्हा माझा दिवस तिकडेच मोडतो. म्हणून मराठीचे वर्ग दुसऱ्यांवरच सोपवून मी आणि आणखी कुणीतरी वीसपंचवीस रुपयांपर्यंत शिक्षक नेमून आम्हीं दोघांनी मिळून मराठी चार इयत्ता शिकलेलीं दहापंधरा मुलं दुय्यम शिक्षण देऊन तयार करायचीं. सध्या आम्ही वर्तमानपत्रं वगैरे

वाचून दाखवतोंच. या मुलांनाहि आजूबाजूची परिस्थिति समजावून देऊन त्यांना महत्त्वाकांक्षी बनवायचं. त्यांना नुसतं पुस्तकी ज्ञान न देतां वाचलेल्या पुस्तकांच्या सहाय्यानं व्यवहारकुशलता त्यांच्या अंगीं यावी असा प्रयत्न करायचा. धंदेशिक्षणाचं मात्र परस्वाधीन पडेल आणि पैसाहि जास्त लागेल. भिवासारखे समंजस धंदेवाले पुढं-मागं आपल्याच शिष्यवर्गांत लाभले तर खटपट करायची. त्यांनी आपली विद्या दुसऱ्यांना दिली तर पाहायचं; नाहीतर एकेक मुलगा एकेक धंदा शिकण्यासाठी परगावीं सोयीप्रमाणं पाठवून तयार करून आणावा लागेल."

इतकें बोलून मुकुंदराव किंचित् हसले.

"शेख महंमदाचा धाकटा की थोरला भाऊ शोभेन मी?"

"तुम्ही कृति करून दाखवीत आहां. आणि पुढं कांही वर्षांनी त्याचं फळ कांहीतरी दिसल्यावांचून राहाणार नाही. तुम्ही नुसतीं मनोराज्यं करून थांबलां असता तर मग तुम्ही शेख महंमदाचे धाकटे की थोरले भाऊ हा प्रश्न सोडवायचा मीं प्रयत्न केला असता."

यावर आम्ही दोघें हसलों.

"हें सगळं झालं; पण व्यापाराच्या बाबतींत तुमच्या कांही योजना आहेत की नाहीत?"

"होय तर, आहेत ना. पण त्या फारच लहान प्रमाणावर प्रथम अंमलांत आणणं शक्य आहे."

"त्या कशा?"

"आमचं गाव फार लहान आहे. त्याकरिता मालाची ने-आण करण्यासाठी दोन लोक मिळाले तरी पुरे. प्रत्येकानं आपापल्या शेतांतील माल परगावीं न्यायचा म्हणजे परवडत नाही. मनुष्यबळ आणि पैसा या दोन्ही दृष्टींनी तें तोटयाचं पडतं. या शेतकरी लोकांना गायी, म्हशी, बैल, मेंढरं, कोंबडया यांची निपज फार सायास न करतां आणि पैसे न खर्चतां करतां येते. गुरं विकून व दूधदुभतं, अंडीं, भाजीपाला याप्रमाणं माल विकून पैसे मिळवितां येतील. पण आजूबाजूच्या गावांत

तो माल न्यायचा कुणीं ? आणि प्रत्येकाला भाडं, टोल पडल्यावर नफा काय मिळणार ? पण असं समजा, की एका माणसानं दोन लॉऱ्या ठेवल्या आणि विरंजगावांतला परगावीं खपण्याजोगा तऱ्हतऱ्हेचा माल स्वतः विकत घेऊन परगावीं नेऊन विकला तर तो मनुष्य तर चांगली कमाई करूं शकेलच; पण पुन्हा गावातहि पैसा खेळू लागेल. त्याच-प्रमाणं हा मनुष्य परत येतांना गावाला लागणाऱ्या नित्योपयोगी वस्तु आणू शकेल आणि त्यांतहि सर्वांचा फायदा होईल हल्ली प्रत्येकजण आपापल्यापुरता माल आणतो त्यामुळं खर्च फार लागतो.

" इतकं सगळं व्हायला एकी आणि नेकी पाहिजे. "

" तें तर झालंच, आणि महत्त्वाकांक्षाहि वाढली पाहिजे. नुसती महत्त्वाकांक्षेच्या बाबतींत एकी झाली तरी हा असला सर्वांना फायदे-शीर असा व्यापार चालू शकेल. मी लक्ष ठेवून आहें. प्रथम असा व्यापार करायला तयार असलेला परगावचा मनुष्य मिळाला तरी हरकत नाही. आमच्या गावांत जास्तींत जास्त जितका माल निघेल तितका, स्वस्त का होईना, गावातल्या गावांत एखाद्या मनुष्यानं विकत घेतला तरी पुष्कळ फायदेशीर होईल. मग त्यानं स्वतःच्या जबाब-दारीवर तो परगावीं विकावा. "

" तुमच्या ज्या या सर्व योजना आहेत त्या सफळ होण्या-करिता या गजाननानं तुम्हांला पुष्कळ आयुष्य द्यावं आणि संपत्ति द्यावी. "

" अन् मनुष्यबळहि द्यावं. " मुकुंदरावांनी माझं वाक्य पूर्ण केलें.

आणि तितक्यांतच भटजी आले, " गजाननाचा तीर्थप्रसाद आणला आहे मीं. आज तुम्ही आलां तेव्हा म्हटलं नैवेद्याला शिरा करावा. "

भटजींनी हातांतलें ताट खाली ठेवलें. त्या ताटांत एक चिन्याचें पातेलें, वाटया आणि फुलपात्रं होतीं.

" वा भटजी ! तुम्हीं तर अगदी चंगळच केलीत की ! आम्हीं पोळ्या- लाडू आणलेच आहेत. पण हा ताजा शिरा अन् चहा यांनी खरी मजा येणार. "

भटजी या प्रशंसेने व दक्षिणेने खूष झाले. मग गप्पाविनोदांत आम्हीं चहाफराळ केला. भटजींनीहि शिरा आणि चहा घेऊन हातभार लावला.

मग जरा विश्रांति घेऊन आम्ही खाली उतरलों. जुन्नरहून नारायणगावकडे एक लॉरी बाजारासाठी आज जात असे. ती विरंज-गावावरून जात असल्यामुळे आम्ही ती गाठून परत गावीं आलों.

फराळ करून माझें तर पोट भरलेंच होतें; परंतु मुकुंदरावांच्या नवनव्या कल्पनांनी माझें डोकेंहि भरून गेलें होतें. त्यामुळे माझ्या हृदयांतहि अभिनव अशी एक भावना उद्‌भवूं लागली होती. संध्याकाळीं क्षितिजावर नुकत्याच उगवलेल्या तारकेप्रमाणे हळूच डोकवावें, क्षणांत लपावें असे खेळ ती खेळत होती. या तिच्या खेळामुळे ती मन अधिकच आकर्षून घेत होती.

ती भावना म्हणजे मुकुंदरावांच्या सत्कार्यांत आपणहि त्यांना यथाशक्ति मदत करावी ही.



## प्रकरण १० वें

शिवनेरीवर मात्र मीं मनाचा पक्का निश्चय केला, किंवा माझ्या मनाचा पक्का निश्चय झाला.

शिवनेरीवर पूर्ववैभवाची साक्ष देणारें कांहीसुद्धा नाही. चारसहा पडक्या भिंती तेवढया आहेत. परंतु शिवाजीच्या वेळच्या कोणत्याहि पडक्या मोडक्या किल्ल्यावर आपण गेलों तरी शेकडो वर्षांत उभारलेले, स्फूर्ति, देशप्रीति, स्वार्थत्याग, वीरश्री या भावनांचे अभेद्य किल्ले आणि पूर्वेतिहासांतील रोमांचकारी आठवणींची शेकडो वर्षांच्या सुस्कार्‍यांनी मलिन पडलेली तटबंदी हीं दोन्ही मनःचक्षूंना दिसूं लागतात.

मला वाटतें, या किल्ल्यावर उभे असलेल्या प्रत्येकाच्या मनांत क्षणभर का होईना, अशी दिव्य देशप्रीतीची आणि स्वार्थत्यागाची भावना उसळतेच. वाईट वाटून प्रत्येकाच्या अंतःकरणांतून एक तरी सुस्कारा बाहेर पडतोच.

शिवनेरीवर श्रीशिवाईचें देऊळ असून तिची पूजाअर्चा होते. पण मला वाटतें, तिच्यांत आता देवत्व राहिलेलें नाही. कारण भाव तेथे देव !

आता शिवनेरीवर जाणारा प्रत्येकजण शिवाईला मनोमन विचारीत असेल, की " देवी, काय ही शिवनेरीची अवस्था ! देवी, तुझी कृपादृष्टि असतां हिंदुपदपादशाहीची अशी दुर्दशा झाली तरी कशी ? आणि अजूनसुद्धा आम्ही पारतंत्र्यांत खितपत आहों हें कसं ? "

मीं पण शिवाईदेवीला हाच प्रश्न विचारला अन् मग ती मूर्ति खरोखरीच जरा हसली— की मला तसा भास झाला ?

आता मला वाटतें--

पण आता मला काय वाटतें तें त्या वेळीं वाटत नव्हतें. देवीला मीं नमस्कार केला; पण मनांत तिला सांगितलें, ".शिवाई, तुझ्यांतलं देवत्व लोपलं."

त्या दिवशीं आम्ही शिवनेरीवर चौघे मिळून गेलों होतों. गप्पाविनोद चालू होता, पण माझें मन बरेंचसें खिन्न झालेलें होतें.

दुसऱ्या दिवशीं मीना नदीवर मी आणि मुकुंदराव फिरायला गेलों होतों. सायंकाळची वेळ असल्यामुळे कोळी लोकांनी आपापलीं जाळीं काढून नेलीं होतीं. पलीकडे झोपडयांपुढील जागेंत जाळीं विणणें किंवा दुसरीं संसारोपयोगी कामें करीत कोळी बसले असून पोरें खेळत होतीं आणि झोपडींत स्वैपाकपाणी चालू असल्यामुळे धूर आळोखेपिळोखे देत वर चालला होता. तांबूस पिवळसर सूर्यकिरणां-मुळे तो धूरहि रंगला होता. या कोळयांच्या देवता किंवा मत्स्यकन्या असून जणू नृत्य करीत आहेत व त्याला अनुसरून अंगविक्षेप करीत आहेत असेंच भासत होतें. हालचालींबरोबर त्या धुरावर निरनिराळे रंग दिसत. जणू त्या नृत्यांगनांच्या वस्त्रांवर रंगीबेरंगी प्रकाश मुद्दाम पाडला जात होता!

एका नावेजवळच्या खडकावर आम्ही बसलो. जरा वेळ आम्ही निःशब्दच होतों. नंतर मुकुंदराव जरा खिन्नपणें म्हणाले,

"झाली, संपली तुमची सुट्टी."

"पण फार सुंदर संपली. इकडे येण्याच्या वेळी मला वाटलं होतं की मला थोडयाच दिवसांत कंटाळा येईल म्हणून. आणि आता वाटतं..."

"काय वाटतं?"

"आता वाटतं, की पुण्याच्या शाळेचा राजीनामा द्यावा आणि यावं इकडे."

क्षणभर मुकुंदरावांना वाटलें, की मी थट्टाच करतें. म्हणून त्यांनी चमकून पण जरा हसून माझ्याकडे पाहिलें. परंतु माझें बोलणें मनःपूर्वक होतें हें माझ्या मुखावर स्पष्ट उमटलें असावें. मग त्यांच्याहि चेहऱ्यावर उत्कंठा प्रतिबिंबित झाली-- "खरंच असा निश्चय झाला आहे तुमचा?"

पण मी उत्तर देण्यापूर्वी कांही वेगळेच विचार त्यांच्या मनांत आले असावे. त्याचे विचार जसे अस्थिर त्याप्रमाणेच त्यांच्या मानेची आणि नेत्रांचीहि चंचलपणें हालचाल झाली. भिन्न भिन्न भावनाहि त्यांच्या मुद्रेवर झरझर उमटून गेल्या. त्यांच्या कार्याला माझी मदत व्हावी म्हणून त्यांनी अस्पष्टपणें थट्टेने व गंभीरपणाने बरेच वेळां मला सुचवलें होतें. मग आता ते असे चलितचित्त कां झाले, याबद्दल मला फार विस्मय वाटला! एकदा वाटलें, हे माझी चेष्टाच नव्हते ना करीत?

आणि तितक्यांतच माझ्याकडे बघत जरा कंपित स्वरांत त्यांनी विचारलें, "निव्वळ माझ्या सांगण्यावरून तुम्ही नाही ना तयार झालेल्या? माझ्या कार्याचं महत्त्व खरोखरीच तुम्हाला पटलं आहे ना? माझ्यावर विश्वासून तुम्ही आज एवढी मोठी नोकरी सोडून दिली आणि उद्या- म्हणजे पांचदहा वर्षांनी माझं हें कार्य कवडीमोल ठरलं; पैसा, वेळ सर्व घालवून कांहीएक सुधारणा हातीं लागली नाही, पदरीं निराशा पडली तर मग तुम्हांला पश्चात्ताप नाही ना होणार? कारण पुण्यांत तुम्ही हळूहळू नांव मिळवाल आणि द्रव्यसंचयहि कराल. आता नोकरी सोडलीत आणि मग पश्चात्ताप झाला तर?... म्हणून विचारतों, की तुम्हीं नीट विचार केला आहे ना?"

"मीं अगदी सगळा नीट विचार केला आहे. मीं आता नोकरी सोडली तरी मला जन्मभर चरितार्थाची कांही अडचण पडणार नाही. व पुन्हा नोकरी करायचं मनांत आणलं तरी मला नोकरी सहज मिळेल; सरकारी नोकरींत मी कितीसं खरं कार्य करूं शकेन? नुसतीं साध्या-सुध्या विषयांवर व्याख्यानं द्यायचीं हेंच कार्य करून मी लौकिक मिळवणार ना? पण माझ्या मतानं, प्रत्यक्ष कार्य करून नांवलौकिक मुळीच मिळाला नाही तरी मला कांहीसुद्धा वाईट वाटणार नाही."

मुकुंदरावांनी किती आदराने आणि कौतुकाने माझ्याकडे पाहिलें! आधी जर कांही थोडाबहुत किंतु माझ्या मनांत उरला असला तरी तोहि या वेळीं नष्ट होऊन गेला.

" कालपर्यंत मी विचार करीत होतें. काल मात्र माझा निश्चय कायम झाला. "

" देवी शिवाईनंच दिव्य संदेश दिला तुम्हाला असं समजा. "

" मग ओझरच्या गणपतीनं दिला असं कां म्हणूं नये ? "

" दोन्ही एकच. परमेश्वर एकच आहे. त्याच्या मूर्ति किती का असेनात ! "

" असे देवदेवता जर स्फूर्ति देत असते तर आपला देश असा दीनदुबळा राहिला नसता. "

" म्हणजे ! तुमचा देवावर विश्वास नाही ? " मुकुंदरावांनी विचारलें.

" नाही. विश्वास ठेवण्याजोगी मला कांही कधी त्याची प्रतीति आलेली नाही. ' But in His ways with men I find Him not ' असं आर्थर राजाप्रमाणंच मलाहि वाटतं. "

" O, then you are unfortunate! " ( अरं, मग तर तुम्ही फारच दुर्दैवी म्हणायच्या ! )

" मी आहेंच दुर्दैवी ! " माझें निराश हसणें माझ्याच कानाला कसेंसें लागलें !

" अंहंहं ! " मुकुंदराव घाईनें बोलले " मी त्या अर्थानं नाही म्हणालों. पण माझ्या मतानं नास्तिक असणं हेंच दुर्दैव आहे ! "

" माझ्या मतानं दुर्दैवी मनुष्यच नास्तिक बनतो. देव आहे ही त्याची अंधश्रद्धा विनाकारण संकटं आलीं म्हणजे धुरासारखी हवेंत वितळते आणि वाईट लोक सुखांत पाहिले म्हणजे मग चीड येते. मग डोळे उघडतात. "

" उघडत नाहीत, मिटतात. "

" ते कसे काय ? " मीं विचारलें.

" सूर्य दिसतो तोंवर कमळं उघडीं राहातात. तो दिसेनासा झाला की मिटतात. त्यांना वाटतं, सूर्य नाहीच! "

" होय ना ? मग माझं तरी तेंच म्हणणं आहे. " मीं विजयसूचक हसून म्हटलें, " सूर्य दिसेनासा झाला म्हणजेच ना सूर्य नाही असं वाटतं त्यांना ? त्यांच्या आयुष्यांतून सूर्य नष्टच होतो ! "

" पण कायमचा नष्ट होत नाही. अधीर वृत्तीमुळं तो कायमचा नष्ट झाला असा अर्थ करून तीं मान टाकतात. पण दुसऱ्या दिवशीं तो उगवतोच. "

" मनुष्याच्या दृष्टीनं दुसऱ्या दिवशीं म्हणजे दुसऱ्या जन्मींच ना ? दुःखाचा भुगा त्याच्या आयुष्यांतला सर्व रस शोषून टाकतो. त्याचं आयुष्यहि निर्जीव होतं. कमलाच्या बाबतींत जें कमल दिवसा सूर्याच्या सान्निध्यांत आनंदानं डुलतं तेंच रात्रीं म्लान-वदन होतं. भुगा त्याच्या हृदयांत स्थान घेतो आणि त्याच्या देहांतला मधुरस शोषून घेतो. परंतु दुसऱ्या दिवशीं तेंच सूर्यदर्शनानं उमलतं आणि तो भुगा पळ काढतो. हा क्रम सयुक्तिक वाटतो. परंतु मनुष्याच्या बाबतींत म्हणजे एका देहानं करायचं अन् दुसऱ्यानं भोगायचं हें पटत नाही. कुठंतरी चूक वाटते. "

" ती चूक अज्ञानामुळं आहेशी वाटते. कारण लिंगदेह तोच असतो. तो कांही बदलत नाही. तोच सुखदुःख भोगतो. " मुकुंदराव म्हणाले.

" काय म्हणून त्यानं भोगावं ? अधिकार काय त्याला भोगा-यचा ? हल्लींच्या साम्यवादी जगांत हें तत्त्व कोण मानील ? ज्यानं करावं त्यानं भरावं. ज्यानं करावं त्यानंच भोगावं. या जन्मीं मीं कांही सत्कृत्य केलं आणि पुढल्या जन्मीं मी गाढव झालें आणि मला उकिरड्यावर खूप कागद खायला सापडण्यांत त्याचा सत्परिणाम मला भोगायला मिळणार असला तर-- मला नाही ही कल्पना हृदयंगम वाटत. "

मुकुंदराव माझ्याकडे बघून हसत सुटले आणि मग मलाहि अनावर हसूं आलें.

" तुम्हीं फारच खोल विचार केलेला दिसतोय् या विषया-वर ? " मुकुंदराव हसत म्हणाले.

" मग हीच तर चूक आहे. या गोष्टींचा शहाण्यानं विचार करू नये. अगदी खरं सागू सुमतीताई तुम्हाला ? विचार करूं लागलों म्हणजे मलादेखील निरीश्वरवाद भेडसावू लागतो. पण अनुभवानं मी शहाणा झालों आहे. श्रद्धेमुळंच आयुष्य सुसह्य होतं. श्रद्धा म्हणजेच सुखाशा. ती एकदा नाहीशी झाली म्हणजे आयुष्यांत घोर निराशे-शिवाय काय राहाणार ? मग आपल्या हातून सत्कार्य तरी होईल कसं ? मनुष्यानं काळाची शेंडी पकडून त्याला धरावं म्हणतात ना ? मी म्हणतों, की पळत्या श्रद्धेलाहि मनुष्यानं गच्च आवळून धरावं "

" आत्मविश्वास नाही म्हणूनच श्रद्धा अशी पळपुटी ना ? जिला आत्मविश्वास नाही तिच्यावर लोकानी कसं विश्वासावं ? त्यांत लभ्यांश काय ? "

" तशा दृष्टीनं श्रद्धा पळपुटी नाही. एखाद्या लहानशा आकाश-विभागाच्या हृदयांत तारका चमकत असते. तिच्या तेजानं तो आकाशभागहि प्रकाशित झालेला असतो. त्या तारकेच्या सौंदर्यानं तोहि शोभायमान होतो. ती लुकलुकणारी तारका सारखी लपंडाव खेळत असते. तिला पुन.पुन्हा शोधून तो आकाशभाग तिला आपल्या हृदयाशी कवटाळून धरतो. ती तारका हीच त्याचं जीवनसर्वस्व असते. तिच्यामुळंच तेवढं तें आकाश दर्शनीय बनतं. पण त्या आकाशानं जर का तिला रागारागानं लोटून दिलं, ती लपंडाव खेळत असतांच तिला पकडून ठेवली नाही, तर ती खाली कोसळते आणि तिच्या जागी काळा दगड मात्र नज-रेला दिसतो. आणि त्या आकाशविभागाचं तरी काय होतं ? तोहि अंधःकारांत बुडून जातो ! त्याचं अस्तित्व नसल्यासारखंच होतं. तो शून्यहृदय होऊन जातो. त्याचं सौंदर्य, त्याचा मोहकपणा– पार नाहीसा होतो. श्रद्धा ही या तारकेप्रमाणं आहे. ती हृदयांतून काढून लावली म्हणजे ती निष्प्रभ दिसूं लागते. परंतु ती पुन्हा हातीं लागते म्हणून मनुष्यानं प्रयत्न करायचा. "

बोलण्याच्या भरांत मुकुंदरावांचा कंठ सद्‌गदित झाला आणि ते थांबले.

मलाहि कांही बोलवेना.

मला वाटतें, कृष्णपक्षांतील द्वितीया होती त्या दिवशीं. अजून चंद्रोदय झाला नव्हता.

आकाश अगदी निरभ्र असून तारका लुकलुकत होत्या. कोळ्यांच्या झोपड्यांमधून दिव्यांचा मंद प्रकाश येत होता. जल-लहरींवर तारकांचे किरण पडून त्या मधूनच चमकत होत्या.

मला वाटलें, खरेंच का श्रद्धा या तारकांप्रमाणे मनुष्याच्या हृदयांत सौंदर्य उत्पन्न करते ?

आम्ही लवकरच उठून कांही न बोलतां घरीं आलों. आमचीं मनें निरनिराळ्या विचारांनी भारावून गेलीं होती.



# प्रकरण ३१ वें

मीं पुण्याला गेल्यावर नोकरीचा राजीनामा दिला; पण राजीनामा दिला म्हणजे ती गोष्ट कांही सहजासहजीं झाली नाही. भाऊने व इतरहि कित्येक मंडळींनी " सोन्यासारखी नोकरी सोडू नको; मग पस्तावशील " म्हणून मला उपदेश केला. कांहींनी मुकुंदरावांना हवीं तशीं नांवें ठेवलीं आणि काकांनी मुकुंदरावांना पत्रच लिहिलें, की " तुम्ही माझ्या पुतणीचा बुद्धिभेद करीत आहां हें तुम्हांला शोभत नाही, " वगैरे.

मीं कोणाचेंहि ऐकलें नाही. मी सर्वांना सांगितलें, की ज्याचें नशीब त्याच्याजवळ.

लोकांची काय मजा आहे पाहा. म्हणजे मी माझ्याबद्दलच म्हणत नाही– सर्वांबद्दलच म्हणतें. सर्वजण स्वार्थत्यागाची महति गात असतात; परंतु प्रत्यक्ष कुणी देशहितासाठी स्वार्थत्याग करायला निघाला म्हणजे मात्र त्याला वेडयांत काढतात ! शिवाजीने मोठी मुसलमानी जहागीर सोडली, त्याला काय सुखासुखी का कोणीं तसें करूं दिलें ?

एवढें मात्र खरें, की प्रत्येकाचाच स्वार्थत्याग कांही फळाला येत नाही. ज्यांच्या स्वार्थत्यागाला पुढे लागलेलीं गोड फळें लोकांना दिसून येतात, त्यांना मग लोक वाखाणतात, मग त्यांचे गोडवे गातात. पण मोठा स्वार्थत्याग करून, अनेक प्रकारें देहकष्ट सोसूनहि सर्व वाया झालें म्हणजे कुणीहि त्या स्वार्थत्यागाला विचारीत नाही !

या गोष्टी पुढल्या झाल्या. पहिल्याने मात्र प्रत्येक स्वार्थत्यागी व्यवहारशून्य ठरतो !

मला उपदेश करून कांही फायदा नाही असें पाहून लोक बोलत, " नाहीतरी ही पहिल्यापासून वाहयातच आहे. अलीकडे वाटलं होतं जरा सुधारेल म्हणून; पण नाही ! नशीबच असं ! त्याला इलाज काय ? "

खरोखर इतक्या विरोधांतून राजीनामा देणें म्हणजे मला माझ्या मनाशीं सुद्धा झगडावें लागलें. परंतु अखेर मीं राजीनामा दिला आणि

तो योग्य मुदतीनंतर मंजूरहि झाला. तोंपर्यंत मीं शाळेंत काम केलें ! आणि जेथेहि मला उपदेशग्रहण करावें लागलें.

राजीनामा मंजूर झाला त्या दिवशी मात्र मला विशेष गड-बडल्यासारखें वाटलें. खरोखर, आपण केलें हें चांगलें केलें का? असा विचार वारंवार मनांत येई आणि वारंवार मीच माझ्या मनाची समजूत घाली.

विरंजगांवला जाण्याच्या विचाराने मात्र मला मनस्वी उल्हास वाटूं लागला. जरुरीचें कितीतरी सामान मी विकत घेतलें. ताईदेखील माझ्याबरोबर येणार होती. इतरांप्रमाणे मी नोकरी सोडल्याबद्दल तिनेहि मला दोष दिला. पण मग तिने बोलण्याचें सोडून दिलें

निघण्याच्या अगदी आदल्या दिवशीं मला एकदम तारिणी-बाईची आठवण झाली. वाटलें, एकदा विचारून तर यावी खबरबात.

मनाचें हो–ना चालू असतांच मी तारिणीबाईच्या घराशीं आलेंसुद्धा. वाड्यात जाऊन मुख्य इमारतीच्या दुसऱ्या मजल्याकडे पाहातें तों सर्व बंद ! बाकी सर्व वाड्यांत बिऱ्हाडें होतीं.

अंगणांत एक पोक्त बाई उभी होती. तिला मीं “ तारिणीबाई घरांत नाहीत वाटतं ? ” असें विचारल्यावर ती जरा चमत्कारिक हसून म्हणाली, “ आठदहा दिवसांपूर्वीच त्या कुठं दूरच्या प्रांतांत गेल्या. कुठं मलायांत का कायशा जायचं म्हणाल्या. ”

“ मलायांत कशाला ? ” मीं अतिशय आश्चर्याने विचारलें.

“ त्यांच्या यजमानांचं पत्र आलं म्हणे, की ‘ मी इथं व्यापार करतों आहे. तूं इकडेच निघून ये. तिकडच्या इस्टेटीची व्यवस्था कुणा-कडे तरी सोपवून दे अन् तूं ये. ’ ”

“ यजमानाचं पत्र आलं ? ” माझें आश्चर्य क्षणाक्षणाला वाढत होतें.

“ असं तारिणीबाईच सांगत होत्या आम्हांला. खरंखोटं राम जाणे ! ” त्या बाईने कानांच्या पाळ्यांकडे बोटें नेऊन शेवट केला.

" अन् मग त्यांच्या इस्टेटीची व्यवस्था कुणाकडे आहे आता ? "

" ते तारिणीबाईंच्याकडे सारखे येत असत ते एक– " त्या बाईंनी तिरस्काराने मान उडवली, " गुलबछबूमहाराज विठ्ठलराव परांजपे म्हणून... त्यांना मुखत्यारपत्र करून दिलंय् म्हणे ! घर गहाणहि पडलंय् वाटतं त्यांच्याकडे. "

" विठ्ठलराव परांजप्यांना मुखत्यारपत्र दिलं म्हणतां तारिणीबाईनी ? अन् घर गहाण ठेवण्याइतकं कर्ज तारिणीबाईंनी कशाला काढलं ? आणि कुठं खर्चलं ? "

" विचारायचं कुणी ? त्यांच्या दिरानं खूप खटपट केली, पण कांही उपयोग झाला नाही. रीतसर कागद केले आहेत. आता आम्ही भाडं-बिडं सगळं त्या परांजप्यांना महिन्याच्या महिन्याला द्यायचं आणि त्यांनी तें तारिणीबाईंना पाठवायचं. "

मी चांगली मिनिटभर विचारांत उभी होतें. नंतर मीं विचारलें, " तारिणीबाई जिथं कुठं जायचं म्हणाल्या तिथं पोचल्यानंतर त्यांचं कांही कुणाला पत्र आलं का ? "

" नाही हो आलं. तारिणीबाईनी दोघां भाच्यांना परत भावाकडे पाठविलं. त्यांच्याकडे सुद्धा पत्र नाही ! "

मला अनिश्चित मनःस्थितींत उभी पाहून त्या बाईंनी मला घरांत नेलें. बसल्यावर त्याच पुन्हा म्हणाल्या, " आमचं नी तारिणीबाईंचं तसं नातंबितं कांही नाही. पण पंधरा वर्ष आम्ही या वाड्यांत बिन्हाडानं आहोंत म्हणून ऋणानुबंध. त्यामुळं आम्हांलासुद्धा झाल्या प्रकाराबद्दल राहून राहून नवल वाटतं. त्या गेल्या तरी कांही आनंदांत नव्हत्या. कशा भ्यायल्या-घाबरल्यागत करीत होत्या ! रडल्यासुद्धा. आम्हांला वाटलं, की चांगली बाई संसारांत पडणार आणि असं कां ? अहो, त्या गेल्या ना गावाला, त्यानंतर दोनतीन वेळां माझ्या स्वप्नांत आल्या. प्रत्येक वेळेला घाबरल्या मुद्रेनं समोर

येतात आणि मोठ्यानं हंबरडा फोडतात अन् मी भीतीनं जागी होतें. दुसरं काय ? मन चिंती तें वैरी न चिंती हेंच खरं. ”

नंतर आणखी दहा मिनिटें तारिणीबाईंच्यासंबंधीच थोडें बोलल्यावर मीं त्या बाईचा निरोप घेतला.

“ झालं असेल तरी काय त्यांचं ? ” रस्त्यांतून चालतांना माझे पाय कापत होते आणि मला घाम आला होता.

“ शेवटीं परांजप्यांनी तारिणीबाईंचा बळी घेतला ! तारिणीबाई माझ्याजवळ बोलल्या होत्या-- ‘अहो ते कसचे मसणांत जातात ! ते आपल्याला आधी पोचवतील ! ’ परांजप्यांनी त्याना कुठं पोचवलं ? ” मला शहारल्यासारखें झालें. खरोखरच मन चिंती तें वैरी न चिंती ! मनांत एकदम कल्पना आली, की तारिणीबाई परगावीं खरेंच गेल्या का ? परांजप्यांनी धाकदपटशा घालून किंवा कांहीतरी गोड भुलथापा देऊन सर्व इस्टेटीचं ताबेगहाणखत किंवा मुखत्यारपत्र करून घेतलें असावें आणि तारिणीबाईंना महिना कांहीतरी चरितार्थासाठी ते देणार असतील. खास धाकामुळेच त्यांनी ही गोष्ट केली. नवऱ्याचें पत्र वगैरे सर्व परांजप्यांच्या डोक्यांतल्याच कल्पना !

दर महिन्याला परांजपे तारिणीबाईंना कसले पैसे पाठवतात ! मग तारिणीबाईंची अन्नान्नदशा होणार काय ? काय होईल त्यांचें ?

मला त्या बाईचें स्वप्न आठवलें. माझ्या मनांत जो कांही भयंकर विचार आला त्यामुळे माझ्या हृदयाचे ठोके दोन क्षण थांबले !

परांजप्यांनी तारिणीबाईचं कांही बरेंवाईट नसेल ना केलें ? गोड-गोड बोलून खजिन्याच्या विहिरीकडे त्यांना फिरायला म्हणून नेऊन --

नको, नकोच, ती कल्पना ! काय उपयोग असल्या कल्पनांचा ? गेल्या ! तारिणीबाई आपल्या आयुष्यांतून गेल्या ! जिथे कुठे असतील तिथे सुखांत असोत.

याप्रमाणे मनोमन इच्छा करून मी घरीं आलें. पण मला चैन पडत नव्हतें.

मनीं वसे तें स्वप्नीं दिसे.

पहाटेपर्यंत मला भयंकर स्वप्नें पडलीं. त्या प्रत्येकांत विठ्ठलराव तारिणीबाईंना अघोरपणें छळीत आणि शेवटीं विहिरींत त्यांना ढकलून देत.

निर्जन स्थळ, अंधारगुडुप सर्वत्र, कोंदट, गुदमरणारी हवा. त्या भयाण शांततेंत तारिणीबाई शेवटीं मोठमोठ्याने ओरडत. त्यामुळे मी जागी होई. माझें अंग घामाने निथळत असे आणि छातीचे ठोके जलद पडत. तीन वाजल्यानंतर जरा डोळा लागतो तों ताईने मला हाक मारली.

विरंजगांवची लॉरी सात वाजतां निघणार होती.



# प्रकरण ३२ वें

मावशी व इंदिराताई यांचें म्हणणें मी त्यांच्याकडेच राहावें असें होतें. पण मीं या गोष्टीला निश्चयपूर्वक नकार दिला आणि मुकुंदरावांनी त्या दोघींना या बाबतींत मदत न केल्यामुळे माझें वेगळें राहाण्याचें नक्की ठरलें. जागा पटवर्धनांच्या घरांतच होती. त्यांच्या राहात्या घरासमोर मुख्य दरवाजाच्या दोन्ही अंगांना मोठी देवडीसारखी जागा होती. यापैकी एक बाजू बंदिस्त असून या सबंध देवडीवर चांगली सहा खणी माडी होती. ही जागा उपयोगांत नसल्यामुळे नेहमी बंदच ठेवलेली होती. ही जागा चांगली साफसूफ करून व रंगरेघोटी देऊन मला त्यानी दिली.

त्या जागेचें थोडें तरी भाडें घ्या म्हणून मी मुकुंदरावांना म्हटलें. तेव्हा ते हसूंच लागले ! मी ओशाळून विचारलें, " का ? काय झालं ? " तेव्हा मुकुंदराव उसन्या गांभीर्यानें म्हणाले, " तुमच्या भाड्यावर माझी दिवाबत्ती चांगली भागेल. कारण आमच्या गावाच्या मानानं खणी दोनतीन आणे भाडं पडतं. म्हणजे दीड रुपाया धरा. एक रुपयात दिवाबत्ती होऊन वर पुन्हा विडीकाडीला आठ आणे उरले ! "

" पुन्हा नांव काढणार नाही भाड्याचं; मग झालं ना ? "

" नुसतं भाड्याचंच नव्हे, इतरहि गोष्टी पुष्कळ आहेत. इथं पैशाला धडाभर कांदे मिळतात. मळ्यात भाजीपाला होतो तोहि हवा तितका. फळंबिळं किती हवी तितकीं आहेत ! बघताच तुम्ही. सरपण फुकट. तेव्हा विनाकारण तें विकत घेण्याच्या भरीस पडू नका. धान्य वगैरे तेवढं घ्या. "

" मग काय, महिना पाचसहा रुपयांत आमचा संसार होईल की ! "

" अगदी सहज. "

माझी जागा मला फार आवडली. जागा रस्त्यावर असून प्रत्येक खणाला मोठाल्या दारांची खिडकी होती. उजेड अगदी भरपूर असे.

या घरापुढें उंच घर न आल्यामुळे मला खूप दूरचे डोंगर दिसत. एका डोंगरांतल्या लेण्याची पुढली खांबाची ओळ आणि मधली जागा दुरून एखाद्या माडीच्या खिडक्यांप्रमाणे दिसे. याच डोंगरापाठीमागून सूर्योदयहि मला दिसत असे. त्याची प्रभा खालच्या झाडांझुडपावर आणि आखलेल्या शेतजमिनीवर पडली की सर्व देखावा मनोहर दिसे.

रस्त्याच्या पलीकडल्या बाजूला एक बकुळीचा वृक्ष होता. त्याच्या फुलांचा वास माझ्या माडीत दरवळून राहात असे. जरा हात लांब केला की बकुळें तोडता येत आणि फुलें काढता येत.

माडीत पूर्वीपासून एक झोपाळा टांगून ठेवलेला होता. झोपाळ्याची मला फार हौस, पण ती माझी हौस कधी भागली नव्हती ती आता सहज भागू लागली.

या जागेंत खिडक्यांच्या मध्ये जी भित होती तिला चार फूट उंचीपर्यंत पेशवाईत घोटीव चुना असे तशा चुन्याचा चौकोनाकृति गिलावा असून त्यावर पूर्वीचा तांबडा रंग अजून चांगला होता. हा एकेक चौकोन धातूच्या आरशासारखा प्रतिबिंब उठवीत असे. सर्वत्र ऐनाचें लाकूडकाम असल्यामुळे एक खिळा ठोकण्याची सोय नव्हती.

सर्व सामान ठेवण्याला सोयीच्या जागा म्हणजे कोनाडे, खुंट्या आणि खालच्या स्वैपाकघरांत शिकाळी पण लागत.

इतकें असलें तरी खेड्यातल्या कांही कांही अडचणी मला जरा जाणवणार हें मला माहीतच होतें म्हणा.

आणि मुकुंदरावानी हें जाणून कितीतरी सोयी करून दिल्या होत्या

मावशी आम्हांला हरतऱ्हेची मदत करीत. त्या आणि इंदिराताई यांच्यामुळे ताईची चांगली करमणूक होई.

अशा प्रकारें सर्व बाजूनी सुखसोयी जमल्यामुळे मी लवकरच प्रत्यक्षपणें गावांतील कार्याकडे मनापासून लक्ष घालूं लागलें. मुकुंद-

रावांनी मला दिशा दाखवून दिली होती त्यामुळे मला काम बरेंच सोपें पडे. मुकुंदराव आता बहुतेक दिवसभर जुन्नरासच असत. रात्रीं वस्तीला घरीं येत. जेवतांना माझ्या कामासंबंधी आम्ही बोलत असूं. नंतर शाळेंत जाण्याचा आमचा क्रम असे.

रात्रीचे मराठी शिक्षणाचे वर्ग चांगले चालले असून आता एक इंग्रजीचाहि वर्ग सुरू केला होता. त्याचप्रमाणे लहान मुलांमुलीं-करिताहि एक वर्ग सुरू करून त्याची वेळ शाळेनंतर लगेच ठेवली होती. या वर्गाला मराठी चवथींतलीं सर्व मुलेंमुली पहिल्यापासूनच येऊं लागलीं. याच वर्गाला मी ताईलाहि नेऊं लागलें. रात्रीच्या इंग्रजी वर्गाला मात्र फक्त तीन विद्यार्थी मिळाले होते.

गुरुवारीं— बाजाराच्या दिवशीं, रात्रीचे वर्ग बंद असत. तरी मंडळी जमत. मग एखादें वर्तमानपत्र वाचून दाखवून मुकुंदराव तें नीट समजावून सांगत. राजकीय आणि सामाजिक अशी दोन्ही प्रकारची माहिती न वाचणाऱ्या लोकांनाहि मिळत असे.

मग दत्तपूजा होऊन थोडी खिरापत वाटण्यात येई.

देवळांत दर एकादशीला संध्याकाळीं बरीच मंडळी हळूहळू जमूं लागली. पण व्याख्यानांना कंटाळून पुढे पुढे कोणी येईना! भटजींच्या पुराणालाहि लोक कंटाळले. तेव्हा आई वाल्हयाला बाय-कांना गोष्टी-कादंबऱ्या वाचून दाखवी आणि त्या बायकांना त्या किती आवडत आणि सर्वजणी कशा वेळेवर येऊन बसत ही मला आठवण झाली. मग मुकुंदरावांना ही कल्पना सांगून मी 'पण लक्षांत कोण घेतो?' ही कादंबरी वाचण्यास व समजावून सांगण्यास सुरवात केली.

हा प्रयोग मात्र इतका यशस्वी झाला, कीं दर एकादशीऐवजी दर आठवड्याला आम्हाला वाचून दाखवा म्हणून लोक म्हणूं लागले. आणि आम्हीं तसें केलेंहि. मी वाचण्याकरिता देवळात न बसतां बाहेरच्या पटांगणात बसत असल्यामुळे स्पृश्य, अस्पृश्य सर्वांनाच येऊन बसतां येत असे. मात्र या स्पृश्यास्पृश्य-बावतीत उगीच घाई-घाई करून उपयोगी नाही असें ठरलेलें होतें.

कादंबरी ऐकण्याला बायकासुद्धा येत. पण कांही मला म्हणूं लागल्या, की " दोनप्रहरीं आम्हांला रिकामपण असतं तेव्हा तुम्ही आम्हांला वेगळं वाचून दाखवा. " मीं तें अतिशयच आनंदाने कबूल केलें.

बायका शिकण्याला नाखुषी दाखवीत. मला वाटलें, कोयनेलची भुकटी जास्त लवकर गुण देते, साखरेंतली गोळी विरघळायला जरा उशीर लागतो. पण गुण येनोच. भुकटी घ्यायला खळखळ केली तर साखरेंतली कोयनेलची गोळी काय वाईट ?

मी मधूनमधून त्या बायकांना स्वच्छतेचे व टापटिपीचे धडेहि बोलण्याबोलण्यांत देण्याचा प्रयत्न करी; पण ते त्यांना पटेनात.

त्या म्हणत, " रोज येणी घालाया आमी कळावंतणी आहों व्हय ? तुमा बामणिणींना येणीफणी कराया लागती. रोज आंघोळ कराया लागती. तुमचा धरम हाये तो. पन आमी तसलं वागूं लागलों तर म्हनतील ढंग करतीया म्हून ! "

पण आपण स्वतः ह्या गोष्टी करण्याला त्या अजून तयार नसल्या तरी आपल्या मुलींच्या रोज वेण्या घालण्याचें मात्र त्यांनी कबूल केलें. मीं शुक्रवारीं जमलेल्या सर्वजणींना शिकेकाई वांटण्याचा उपक्रम सुरू केला व दर शनिवारीं त्या बायकांनी न्हावें म्हणजे उवा वगैरे होत नाहीत हें समजावून सांगितलें. बहुतेकांच्या डोक्यांत उवा असत. त्यांना रॉकेल व तंबाखू, तपकीर हें मी लावायला सांगत असे. त्या आळस करतातसें वाटलें तेव्हा मी स्वतः त्यांना उवा-खरूज वगैरेसाठी उपचार करूं लागलें.

शाळेंतल्या मुलींच्या बाबतींत मात्र झपाट्याने सुधारणा होई. दोन्ही मास्तरणींना मीं हळूहळू आपल्या मदतीला घेतलें. त्या मुलींना रोज वेणी घातली पाहिजे, आंघोळ केली पाहिजे, आठ दिवसांनी नखें काढून घेतलीं पाहिजेत आणि न्हालें पाहिजे याप्रमाणे शिस्तीचे धडे देत आणि मुली ते पाळीतहि.

बायकांना घरगुती स्वच्छता आणि टापटीप शिकविण्याच्या बाबतींत या दोघी मास्तरणींचा मला बराच उपयोग होई. या दोघी ट्रेनिंग कॉलेजची परीक्षा पास झालेल्या असून एक मराठा जातीची व दुसरी कायस्थ प्रभु जातीची होती. दोघी विधवाच होत्या. मराठा जातीची होती तिचें नाव तान्हुबाई जाधव असें असून प्रभु जातीची होती तिचें नाव लक्ष्मीबाई कारखानीस असें होतें.

जर कुठे कांही थोडें बिघडत असेल तर तें एवढंच, की या दोघींच्याहि मनात ब्राम्हणद्वेषाचें बी रुजलें होतें. तें फारसें कधी उघड करणें त्याना शक्य नव्हतें; पण चुकून बोलतांना ब्राम्हणाविषयी अनुदार शब्द त्या बोलून जात. मीं दोनतीन वेळा या बाबतींत त्यांची समजूत काढण्याचा प्रयत्न केला, पण त्याना ते कांही पटेना.

त्याच्याचप्रमाणे गावांतहि दोनतीन ब्राम्हणद्वेष्टे अस्पृश्य लोक होते. ते म्हणत, " आम्हा सर्वांना तुमच्या देवळात येऊं द्या. आमच्याशी तुम्हीं रोटीबेटीव्यवहार कराल तरच तुम्हाला आमच्या हिताची काळजी आहे असं आम्ही म्हणू. तुम्ही सहभोजन गावात करा "

मुकुंदरावांनी या लोकांना एके दिवशी घरीं बोलावून घेऊन व आणखीहि चार पांच मराठे लोक बोलावून या बाबतीत वादविवाद केला. मावशींचें मन संभाळण्याकरिता माझ्या दिवाणखान्यातच ही बैठक बसली. मी या वेळी इंदिराताईंना आणि तान्हुबाई व लक्ष्मीबाई यांनाहि बोलावून घेतलें.

वादविवादाच्या भरांत " तुम्ही बामणानीच आम्हांला पायदळीं घातलं " अशाप्रमाणे कांही लोक बोलू लागले. तेव्हा मुकुंदरावांनी शांतपणें त्याना सांगितलें, " स्पृश्यास्पृश्यता ही पूर्वी कोणत्या तत्त्वावर सुरू झाली किंवा कोण अपराधी हें बघून आता कांही फायदा आहे का ? आम्हीं तुम्हांला पायदळी घातलं म्हणतां, पण आम्ही ब्राम्हणांनी धर्माची आणि रूढीची गुलामगिरी थोडी का सहन केली ? अजून त्या रूढि आम्हांला आणि आमच्या बायकांना छळीत आहेत. त्या रूढि आणि धर्मकल्पना तोडा-

यला आमच्या पुढाऱ्यांना काय थोडा का छळ सोसावा लागला ? तुम्ही आम्हांला नुसत्या शिव्या देण्यांत काळ कां घालवतां ?

“ सगळ्या हिंदुस्थानचं राहूं दे सध्या. आपल्या गावापुरतं आपण बोलूं. मी परमेश्वराला स्मरून तुम्हाला सांगतों, की कृत्रिम अस्पृश्यते-वर माझा अणुमात्र विश्वास नाही. परंतु शेकडो वर्षांच्या अज्ञाना-मुळं आणि शेकडो वर्षांच्या अस्वच्छ राहाणीमुळं तुम्ही सध्या खरो-खरीच अस्पृश्य बनला आहांत. थांबा, ऐकून घ्या माझं म्हणणं तुम्ही पुरतं--- आणि न रागावतां ऐकून घ्या. मी तुमच्याशीं रोटीव्यवहार करायला तयार नाही आणि सहभोजनांत कांहीं अर्थनिष्पत्ति होणार नाही म्हणतों याचं कारण अस्पृश्यता नव्हे, तर अस्वच्छता. मानसिक आणि शारीरिक दोन्ही प्रकारची. तुम्ही मनांत आणाल तर दहा वर्षांच्या अवधीत तुम्ही स्पृश्य बनाल. पण तुम्ही आम्हांला शिव्या देण्यांत वेळ घालवूं नका. आम्ही शाळा काढलेली आहे तिचा तुम्ही फायदा घ्या. तुमच्या बायकांच्या-करिता वेगळे वर्ग काढून त्यांना बायकांच्याकडूनच शिकविण्याची व्यवस्था आम्ही करूं. तुमच्या बायकांना कामधामांतून सवड मिळेल त्या वेळेला शिकवूं. तुम्ही आपल्या घरच्या बायकांना तिथं नियमानं पाठवा. आणि या सुमतीबाई, तान्हुबाई, लहानीबाई या तुमच्या घरीं येऊन तुम्हाला काय काय स्वच्छतेचे नियम सांगतील ते पाळण्या-विषयी त्यांची नीट समजूत घाला. रोज आंघोळ करूं नये, रोज वेणी घालूं नये, या ज्या त्यांच्या रूढ कल्पना होऊन बसल्या आहेत त्या दूर करण्यांत आमच्यापेक्षा तुम्हां घरच्या मंडळींनाच जास्त यश येईल.

“ याप्रमाणं आमच्याशीं सहकार्य करायला आहां का तुम्ही तयार ? आम्हीं बामणांनी तुम्हांला पायदळी घातलं म्हणतां ना ? आता आम्हीच तुम्हांला हात देतों आहोंत. तुम्ही आमचा नुसता हात धरून वर या. आताच आम्ही आहों तशा स्थितींतच आम-च्याशीं रोटीबेटीव्यवहार तुम्हीं केला पाहिजे म्हणजे आम्ही सुधारूं

हा निवळ दुराग्रह आहे. त्यामुळं आम्ही स्पृश्य लोक खाली जाऊं तुम्हीहि आता आहांत तिथंच राहाल. त्यापेक्षा तुम्ही आपली मानसिक आणि शारीरिक उन्नति करून घ्या. मग तुम्हांला कोण अस्पृश्य म्हणायला धजेल ? मी तुम्हांला या बैठकीला वचन देतों, की मी म्हणतों त्याप्रमाणं तुम्ही प्रयत्नाला लागा म्हणजे आमचं राममंदिर तुम्हांला मी खुलं करीन.

" जो कोणी पुरुष आणि जी स्त्री चार इयत्तांपर्यंत शिक्षण घेईल आणि दैहिक स्वच्छता ठेवील त्याला आणि तिला माझं राममंदिर मोकळं आहे; आणि असे पन्नास पुरुष आणि पन्नास स्त्रिया जर पुढल्या पांच वर्षांत मराठी चार इयत्ता शिकून तयार झाल्या तर मी माझ्या घरीं सहभोजन करीन आणि माझी बायको तुमच्या बायकांच्या बरोबरीनं वाढायला लागेल."

मुकुंदरावांचा शब्दन् शब्द प्रत्येकजण लक्षपूर्वक ऐकत होता. प्रत्येक शब्द हृदयांत शिरून विचारसंवेदना जागृत करीत होता. मुकुंदरावांचें बोलणें त्यांच्या अंतःकरणांतून वाट काढून बाहेर येत होतें आणि ऐकणाऱ्यांच्या अंतःकरणांत स्थान घेत होतें.

ते दोनतीन अस्पृश्य लोक अत्यादराने मुकुंदरावांच्याकडे पाहात होते. त्यांपैकी एक म्हणाला, " साहेब, आम्हांला तुमचं म्हणणं पटलं. आता आम्ही आमच्या जातींत अशी चळवळ करूं आणि तुमच्या शाळेंत रात्रीं, येतील तितक्यांना समजूत घालून शिकायला आणूं; आणि आमच्या बायकांना पण शिकायला तयार करूं."

या दिवसापासून आमच्या कार्याचा वसंतऋतु सुरू झाला.



# प्रकरण ३३ वें

पुढील दोन वर्षांत आमचें काम बरेंच मोहरलें. मला अतिशय काम पडत असे.

पण मजा अशी, की माझी प्रकृति फारच सुरेख झाली होती.

त्यांतच गेल्या दिवाळीच्या सुटींत भाऊ सहकुटुंब विरंजगावीं येऊन आठ दिवस राहून गेला. इतकेंच नव्हे, तर आमच्या इंग्रजी शाळेला पन्नास रुपयांची देणगीहि देऊन गेला.

मीं नोकरी सोडल्यापासून त्याची माझी भेट नव्हती. माझ्या पत्रांना त्याने उत्तरसुद्धा पाठवलें नव्हतें, इतका तो माझ्यावर रागावला होता. माझ्या मनाला ही गोष्ट फार लागून राहिली होती. इतकी मी कामांत असे ना, तरीसुद्धा एखाद्या दिवशीं सारखी हुरहूर लागून राही.

यामुळे भाऊ येऊन गेल्यावर मला फार हलकें वाटूं लागलें. मनाला विशेषच उल्हास वाटूं लागला.

काकांशीं मीं मुळीच पत्रव्यवहार ठेवला नव्हता. त्यांनी आता पेरूच्या गेटाजवळ एक बंगला बांधला होता. भाऊने आपलें घर भाड्याने दिलें होतें. दोनतीन खोल्या तेवढ्या राखून ठेवल्या होत्या. पुण्याला गेल्यावर तेथेच उतर म्हणून भाऊने मला सांगून ठेवलें होतें.

त्यावरूनच आताच्या मे महिन्यांत मी ताईसह पुण्याला आलें होतें. इंदिराताई पण येणार होत्या. पण त्यांना जरा ताप, खोकला येऊं लागल्यामुळे त्यांचा उत्साह मावळला होता.

माझे दिवस मी कांही निरर्थक घालवीत नव्हतें. मी दोनतीन स्त्रीसंस्थांतील व्यक्तींना भेटलें आणि त्यांचे अनुभव विचारून घेऊन आपल्या कार्यासंबंधी माहिती सांगून त्यांचा सल्लाहि विचारून घेतला.

परगावीं राहूं लागल्यापासून आता पुणें मला कांही वेगळेंच वाटूं लागलें होतें. मी बऱ्याच नातेवाइकांच्या घरीं जाऊन त्यांना

भेटलें, काकाच्या घरींसुद्धा गेलें. आणि आश्चर्य हें, की अगदी मनापासून आगतस्वागत करून त्यांनी माझी सर्व चौकशी केली.

मन राहीना म्हणून एके दिवशी मी तारिणीबाईच्या वाड्यात गेलें. एक आपली आशा वाटत होती, की भेटतील त्या. मागे मला भेटल्या होत्या त्याच पोक्त बाई मला पुन्हा भेटल्या "या, फार दिवसांनी भेट होतेय्!" असें माझें स्वागत करून त्यानी मला आपल्या घरात नेलें. मला प्रथम बघून त्याची मुद्रा पडली, त्यावरूनच तारिणीबाईचा पत्ता नसल्याचें मी ओळखलें. माझा तर्क खराच होता त्या बाईनी मला तेंच सांगितलें. तारिणीबाई ज्या एकदा मलायांत जायचें म्हणून घराबाहेर पडल्या त्या शेवटच्याच!

"गेल्या हो तारिणीबाई!" त्या बाई डोळ्याना पदर लावून बोलल्या.

"म्हणजे?" मला पोटात तोडल्यासारखेंच होऊं लागलें. "त्या पुन्हा आल्या होत्या इकडे?"

निराशेनें त्या बोलू लागल्या. तारिणीबाई जणू त्याची मुलगीच होती!

"छे छे. त्या एकदा ज्या गेल्या त्या गेल्याच! त्याचं कधी आम्हां कुणाला वीतभर पत्रंदेखील आलं नाही 'मलायातून पत्र आलं आहे तारिणीबाईचं' असं तो-" त्या बाईनी "तो" या अक्षरात इतका तिरस्कार ओतला होता, की त्यावरूनच मला परांजप्यांचा बोध झाला. "तो म्हणत असे सगळं खोटंच होतं मुळी तें. त्या कधी मलायात गेल्याच नाहीत!"

"मग कुठं गेल्या?"

"परमेश्वर जाणे!"

"मग शेवटी कुठं होत्या त्या? काय आजार झाला त्यांना?" मी अधीरतेनें प्रश्न करीत होतें.

"काय जें कानावर पडलं आमच्या तेंच सांगतें मी तुम्हांला. पण मला काही बाई त्यातलं खरंखोटं उमगत नाही. एक महिन्यापूर्वी एका बाईचं प्रेत चंद्रभागेंत तरंगत होतं. तें तारिणीबाईचंच होतं असं

परांजप्यांनी ओळखलं म्हणे! तारिणीबाईंच्या दिरानंसुद्धा ओळखलं. त्या दोन वर्षं तिथंच राहात होत्या वाटतं. देवदेवतार्चन करून आयुष्य कंठायचं मनांत होतं. परांजपे तिथंच त्यांना पैसे कुणा मित्राच्या हातीं पोचवीत. ऐकल्या अशा कितीक बातम्या. मुद्द्याची गोष्ट ही आहे, की तो परांजपे आता वाड्याचा पुरता मालक झाला आहे, तोच भाडं वसूल करतो आणि सगळी व्यवस्था पाहातो. "

" तारिणीबाईंच्या बाबतीतलं सगळं खोटं आहेसं वाटतं तुम्हाला ? त्यांच्या दिरानं प्रेत ओळखलं म्हणतां ना ? "

" अहो, त्या नानासाहेबांना अगदी पक्कं कळून चुकलं होतं, की तारिणीबाईंचा नवरा उत्तर हिंदुस्थानांतल्या एका सर्कशींत होता. मुसलमान होऊन त्यानं एका मुसलमानिणीशी लग्नहि करून टाकलं होतं. मुलंबाळंहि झालीं होतीं. परांजप्यांनी तारिणीबाईंना घरांतून काढलं त्यापूर्वीच तारिणीबाईंचा नवरा घोड्यावरून पडून अपघातानं मेला होता. माझी खात्री आहे, की ही बातमी परांजप्यांना कळलेली असून त्यांनी तारिणीबाईंना त्यांतलं अक्षराक्षर कळवलेलं नव्हतं. "

" तसंच असलं पाहिजे. तारिणीबाईंचंच हें प्रेत म्हणून ओळखायला परांजप्यांनी नानासाहेबांना दोनचार हजार रुपये चारले असणार. "

" हो हो तर काय! आणि चोराच्या हातची चिंधी म्हणून त्यानं घेतले असतील! प्रेताच्या टाळूवरलं लोणी काढणारा आहे अगदी. "

" अिस्टेट निर्वेध आपल्या हातीं यावी म्हणूनच ना हें परांजप्यांचं कारस्थान ? "

" हो तर काय ? "

" पण जिवाला कंटाळून तारिणीबाईंनी चंद्रभागेंत जीव दिलाहि असेल. अगदी शक्य आहे तें. "

त्या बाईचें मन परांजप्यांच्याबद्दल इतकें विटलें होतें, की ते सूर्याला सूर्य म्हणाले तरी त्यांना खरें की खोटें म्हणून शंका आली असती! तारिणीबाईंच्या मरणाच्या बाबतींतहि त्यांना कपटनाटक दिसत

होतं. पण मीं तें खरं असेल असें म्हणतांच एखादी अभिनव कल्पना मनांत आल्याप्रमाणे त्या बोलल्या, " असेलहि सगळं खरं. आणि तसं असलं तरच बरं एकापरीनं नाहीतर पैसा नाही, घरदार नाही, हित पाहाणारं कुणी नाही. काय बिचारीची दशा झाली असती! गेल्या असल्या तर पंढरपूरचा विठोबा पावला म्हणायचा!" त्यांनी दुःखभराने एक निःश्वास टाकला.

मी निरोप घेऊं लागलें तेव्हा त्यांनी दुसराच एक पत्ता सांगून म्हटलें, " आता मला भेटायला तिकडेच या. ही जागा आम्ही सोडतों आहों. आता नाही इथं राहावत "

मीं भारावलेल्या मनःस्थितींत घरीं आलें.

एके दिवशीं माझ्याकडे एक निमंत्रणपत्रिका आली. " श्री महाराष्ट्र-सेवक क्लब " या संस्थेचा उद्घाटनसमारंभ दुसऱ्या दिवशीं व्हावयाचा होता, त्याचें तें आमंत्रण होतें. खाली व्यवस्थापकांचीं नांवें होतीं तीं म्हणजे दे. भ. गिड्डूसाहेब किरकिरे आणि दे. भ. विठ्ठलराव परांजपे या दोघांचीं. उद्घाटनसमारंभ एका संस्थानच्या अधिपतींच्या हस्तें व्हावयाचा होता.

परांजपे मला रस्त्यांत दोनतीन वेळां दिसले होते. ते अशा तऱ्हेने हसत, की जणु आमच्यांत कधी कांही वितुष्ट आलेंच नव्हतें!

ते रस्त्यांतून आता पायीं चालत नसत. फोर्ड मोटर घेतली होती त्यांनी. डोक्याला शुभ्र गांधीटोपी आणि काश्मिरी कोट असा थाट होता त्यांचा.

त्यांना बघून रक्त नुसतें सळसळू लागे!

तारिणीबाईंच्या जिवावर..

दोनतीन दिवसांनी वर्तमानपत्रांत समारंभाचीं टोलेजंग वर्णनें आलीं. हजर राहाणाऱ्यांत मोठमोठ्या लोकांचीं नांवें होतीं व शिवाय कैलासवासी भवानी विरूपाक्ष मंडळांतील अंतस्थ मंडळींचीहि नांवें

होतींच. आणि काकांचेंहि नाव होतें. त्या कै. मंडळांतील कांही थोड्या प्रतिष्ठितांचीं नांवें मात्र मला दिसलीं नाहीत

क्लबांत टेनिस, बॅडमिंटन, बिलियर्ड--- सर्व खेळांच्या सोयी केलेल्या होत्या. शिवाय पत्त्यांचे बैठे खेळ. ज्या इमारतींत क्लब उघडला तीच इमारत हप्त्यांनी विकत मिळणार होती. त्यासाठी पैशांची जरुरी होती.

परांजप्यांनी पहिली पाच हजारांची देणगी कबूल केल्यानंतर अध्यक्षीय भाषणांत संस्थानाधिपतींनीहि हजाराची देणगी दिली अन् मग आणखी सातआठ लोकांनी कमीअधिक देणग्यांचीं आश्वासनें दिलीं. त्यांचीं नांवें आलीं असून त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें होतें. पंचवीस रुपये देणगीवाल्यांत आमच्या काकांचें नांव होतें

गिड्डूसाहेब आणि परांजपे यांनी क्लबस्थापनेसाठी घेतलेले परिश्रम, समारंभाची उत्कृष्ट व्यवस्था याबद्दल त्यांचा आणि डॉ. प्रधान वगैरेंचा गौरव केलेला होता.

ही हकीकत वाचून मला बरें वाटत नव्हतें; पण एक प्रकारें मौजहि वाटली !

खरोखर गिड्डूसाहेब, परांजपे यांच्यासारखे लोक पडले तरी पराजय पतकरीत नाहीत. कोळ्याप्रमाणे पुनःपुन्हा वर चढून ते चिकाटीने जाळीं विणीत राहातात.



## प्रकरण ३४ वें

मला पुण्याला येऊन महिना झाला होता. मी वास्तविक अजून थोडे दिवस पुण्याला राहाणार होतें; पण आता दोन दिवसांनीच विरंजगावाला जाणें भाग आलें. मुकुंदराव पुण्याला कांही कामासाठी आजच आले होते त्यांच्याबरोबरच मी परत जाणार होतें.

स्नान, भोजन केल्यावर मुकुंदराव कुठेसे गेले होते. मीं मग दोनअडीच तासांची झोप काढल्यावर साडेचार वाजतां चहा घेतला व नंतर कांहीतरी वाचीत बसलें. पण वाचनांत लक्ष न लागतां पूर्वस्थिति आणि सद्यःस्थितीबद्दल माझ्या मनांत विचार येऊं लागले.

दोनतीनच वर्षांपूर्वीपर्यंत माझी मनःस्थिति किती वेगळ्या प्रकारची होती! माझें आयुष्य मला सर्वतोपरीं निरर्थक वाटत होतें.

या वेळीं माझ्या मनांत येई, "माझ्या आयुष्याचे इतके मजलेन् महाल मीं अगदी निरर्थक घडवले अन् त्यांत निरर्थक भटकलें. त्यांत सौंदर्यस्थळांचा सर्वस्वीं अभाव असून भयाणपणा मात्र मनस्वी भरलेला आहे. त्या यातायातीमुळं माझा जीव मात्र दमून गेला होता. आता पुरे असं मला होऊन गेलं होतं. मला वाटत असे, आता जगून काय करायचं? आता एखादी सुखाची गोष्ट घडली तरी माझी मनःस्थिति अशी आहे की मला आनंद भोगण्याचं सुद्धा सामर्थ्य राहिलेलं नाही. प्रेतावर फुलं तशींच तीं सुखं ठरतील. आता माझं आयुष्य असंच भयंकर जाणार! सुकलेल्या विड्याच्या पानावर किती पाणी शिंपलं तरी तें नवतीच्या तजेलदार हिरव्या पानासारखं होईल का? उन्हांत करपलेलं गुलाबाचं फूल किती सुवासिक पाणी शिंपडलं तरी पुन्हा त्याला सुगंध प्राप्त होईल का? माझ्या हृदयाची अवस्था तशीच झालेली आहे."

पण माझी ही कल्पना चुकीची होती. वेरूळचीं लेणीं पहिल्यापासून पाहात टेकडी चढत चाललेल्या प्रवाशाला मोठी निराशा वाटते. त्याला वाटतें, की आपण आपली फर फर पायपिटी करतों

आहोंत आणि येथे प्रेक्षणीय तर कांहीच नाही ! अगदी कांही नाही ! आणि यापुढे थोडेंबहुत कांही असलें तरी मला तें पाहाण्याची उत्सुकता आहे कुठे ? माझ्यांत चालण्याला सुद्धा त्राण उरलेला नाही.

पण अशाहि मनःस्थितींत तो चालतच असतो आणि मग तो जेव्हा 'कैलास'मध्ये येतो तेव्हा प्राचीन शिल्पकलेचें अफाट वैभव पाहून तो थक्क होऊन जातो. मोठ्या उत्सुकतेने त्या प्रचंड गुहेंतलें कोरीव काम पाहात तो हिंडतो. एकेका चित्रांतला अर्थ लक्षांत आला की आश्चर्यानंदाने त्याचें अंतःकरण भरून जातें. मोठ्या हौसेने तो फोटो घेतो. आणि सर्व कांही बघून झालें की अतृप्त मनाने पुन्हा एकदा तो पहिल्यापासून कोरीव चित्रें पाहाण्यास सुरवात करतो, आपण दमलों होतों याची त्याला आठवणसुद्धा राहात नाही !

माझी स्थिति अगदी या प्रवाशासारखीच झाली होती.

गेल्या अडीच वर्षांकडे वळून पाहातां मला आढळून आलें, की आयुष्याच्या पांचव्या मजल्यांतील दालनांतून मी प्रेक्षणीय कोरीव काम करीत चाललें होतें; आणि अजूनहि अधिकाधिक सौंदर्यपूर्ण काम करण्याची मला उमेद होती !

आणि हें माझ्या हातून निर्माण करून घेणारे मुकुंदराव होते !

मला विठ्ठलराव परांजप्यांची आठवण झाली. तारिणीबाईंनी त्यांना आपलें प्रीतिसर्वस्व दिलें होतें. असें असून मुसलमानांप्रमाणे तारिणीबाईंच्या आयुष्याचें लेणें छिन्नभिन्न करून त्यांनी शेवटीं धुळीला मिळवलें ! आणि माझ्याहि आयुष्यांत त्यांनी चिताड करून ठेवलें !

मुकुंदराव आणि विठ्ठलराव यांच्यांत केवढा तरी फरक !

मुकुंदरावांनी मला नवजीवन दिलें होतें. मुकुंदरावांनी माझ्या आयुष्याला अर्थ आणला होता. मुकुंदराव माझे आनंदनिधान झाले होते. त्यापेक्षाहि श्रेष्ठ .. मुकुंदराव माझें प्रेमनिधान झाले होते !

आणि मी पण त्यांचें आनंदनिधान झालें होतें. आणि ..होय, माझी खात्री झाली होती त्याबद्दल, की मी पण त्यांचें प्रेमनिधान बनलें होतें.

इंदिराताईंच्यावरलें त्यांचें प्रेम अणुमात्र कमी झालेलें नव्हतें. परंतु इंदिराताईंच्या आजारामुळे, त्यांच्याविषयीच्या काळजीमुळे व कराव्या लागणाऱ्या शुश्रूषेमुळे त्यांच्या प्रेमाचें रूपांतर झालें होतें. मातेला आपल्या आजारी, दुबळ्या मुलाविषयी जसें वात्सल्य वाटतें तसें मुकुंदरावांना इंदिराताईंच्याबद्दल जणूं वात्सल्य वाटे. अजूनहि न कंटाळता ते इंदिराताईंना निरनिराळीं औषधें करीत आणि त्याचे लाड पुरवीत.

पण.. पण त्याचें प्रेमसर्वस्व त्यानीं मला अर्पण केलें होतें. तें केव्हा दिलें हें मला मुळीसुद्धा सांगता येणार नाही आणि माझ्याहि आदराचे आणि आपुलकीचे रूपांतर प्रीतीत कधी झालें हें मला सांगतां यावयाचें नाही सतत सहवास, परस्पर स्वभावाविषयी आवड, करीत असलेल्या कार्याबद्दल आदर आणि कौतुक या अनेकविध भावनांच्या किरणांनी आमची प्रीतीची कळी हळूहळू फुलली होती

आम्ही दोघेहि आता लवकरच तारुण्याची मर्यादा ओलांडणार होतों पण त्यामुळेच आमचें प्रेम सखोल पाण्याप्रमाणे वरून निश्चल होतें. अजून आम्हीं तें परस्परांना कळूं दिलें नव्हतें. आमचें प्रेम कितीहि शुद्ध असलें तरी उघड करणें अयोग्य आहे हें आम्हांला समजत होतें.

परस्परांजवळ त्याबद्दल बोलावें अशी कित्येक वेळा इच्छा होई. पण अजूनपर्यंत तें घडलें नव्हतें. तें आता उघड होणारच असें वाटे, भीति वाटूं लागे अन् पुन्हा सर्व शांत होई

पाण्यांत पान पडलें की थोडयाशा लहरी उठून कांही वेळाने त्या विरत जातात अन् पाणी पुन्हा निश्चल होतें. एखाद्या विशिष्ट प्रसंगाने आमच्याहि मनांत विचारांचे तरंग उठत; पण लगेच ते नष्टहि होत.

एक महिन्यांत मुकुंदराव मला भेटले नव्हते तर मला किती वेळां त्यांची आठवण झाली ! आणि आज दुपारीं ते आले तेव्हा त्यांना बघून मला मनःपूर्वक हसूं आलें.

अन् त्यांनासुद्धा केवढा आनंद झाला होता ! त्यांनी मला आल्याबरोबर सांगितलें होतें,

" पुण्याचा तुमचा मुक्काम आता संपुष्टांत आणला पाहिजे बरं का तिकडं थोडं काम आहे. "

मीं काम विचारल्यावर त्यांनी तें सांगितलें. तें ऐकून मला मौज वाटली. कारण तें काम माझ्यावांचून कांही अडून बसणारें नव्हतें.

पण माझ्याप्रमाणे मुकुंदरावानाहि माझ्यावांचून करमत नव्हतें हा त्या बोलावण्यातला अर्थ होता. मीं पण जाण्याचें कबूल केलें तेव्हा त्यानाहि फार समाधान वाटलें होतें.

● ● ●

## प्रकरण ३५ वें

याप्रमाणे पुस्तक उगीचच हातांत मी चाळवीत होतें आणि माझें मन मात्र विचारांत गुतलें होतें. तितक्यांत कांही शब्द कानांवर पडले म्हणून उठून पाहातें तो एक चित्रें विकणारा दाराशीं आला. मी त्याला काही घ्यायचें नाही म्हणून सांगितलें, तेव्हा तो आत येत नम्रपणें म्हणाला, " बाई, बघा तर खरा माल. वाटेल तर घ्या, वाटेल तर नका घेऊं. नुसतं बघायला काय हरकत आहे ? "

मलाहि वाटलें बघावें म्हणून.

त्या विक्रेत्याने आपली पेटी उघडली आणि तिच्यांतून नीट ठेवलेल्या सुबक जिनमा काढण्यास सुरवात केली. लहान ताजमहाल, सांबाचं देऊळ, पिंडी, पादुका या जिनमा नेहमीच्याच होत्या. परंतु काळ्या पाषाणाची वीतभर उंचीची कृष्णमूर्ति पाहिल्याबरोबर मला अतिशय आवडली. किती रेखीव आणि मोहक होती ती मूर्ति !

मीं किमत विचारतां विक्रेत्याने पन्नास रुपये सांगितले. मला निराशा वाटली. मीं ती मूर्ति ठेवून दिली.

त्या विक्रेत्याने म्हटलें, " बाई, नक्की सांगतों तुम्हाला. वीस रुपये देत असाल तर घेऊन टाका ती. "

मला ती मूर्ति विकत घेण्याचा मोह आवरेना. मीं ती पंधराला मागितली आणि तो मनुष्य कबूल झाला.

मीं कपाटांतून दहा-पांचाच्या दोन नोटा काढून त्या विक्रेत्याच्या हातावर टाकल्या.

विक्रेता गेल्यावर ती कृष्णाची मूर्ति टेबलावर ठेवून मी निरखून पाहूं लागलें.

पाहातां पाहातां ती मूर्ति हसल्याचा मला भास झाला. प्रत्युत्तरादाखल मलाहि हसूं आलें.

अन् लगेच माझ्या विचारांना अगदी कांही नवीनच वळण मिळालें.

" ही मूर्ति मीं रम्य कल्पनांनी सजविली म्हणून काय हरकत आहे? मी या मूर्तीशीं मनोमन बोललें, वाटलंच तर तिची पूजा केली म्हणून तरी काय हरकत आहे? विपत्तींनी माणूस खचून गेल्यावर मन भडकून जातं. अशा वेळीं परमेश्वराची पूजा, स्मरण आणि जप यांमुळं दुष्ट आचार, विचार व उच्चार यांपासून रक्षण होत असेल तर त्या गोष्टी कां करूं नयेत? भलते वाईट विचार मनांत घोळवण्यापेक्षा परमेश्वरचिंतन काय वाईट? दुःखप्रसंगीं प्रेमाच्या माणसाजवळ आपण बोलतों तसंच हें."

रवींद्रनाथ टागोरांच्या गीतांजलीची मला आठवण झाली. त्यांत त्यांनी परमेश्वराची प्रेमळ मूर्ति कल्पिली आहे.

" परंतु त्यांचा भगवान् श्रीकृष्ण परम सामर्थ्यवान् आहे, जगत्व्यापी आहे.

" मीराबाईसुद्धा सर्व संत-कवींनी परमेश्वराची भक्ति केली, त्या भक्तींत परमेश्वर सर्वसमर्थ असून त्यानं भवदुःखांतून रक्षण करावं ही भावना आहे. परंतु परमेश्वराचं सामर्थ्य कधी कुणीं अनुभवलं आहे? या संत-कवींचीं आयुष्यं संकटमयच गेलीं. प्रत्यक्ष पांडवांचं तरी श्रीकृष्णाला कुठं रक्षण करतां आलं? त्यांचा वनवास, अज्ञातवास, किंवा दुसऱ्या अनेक विपत्ति कुठं टळल्या? त्यांना सर्व भोगावंच लागलं.

" मग परमेश्वर परम समर्थ ठरत नाही. त्यानं आपलीं दुःखं निवारण करावीं आणि प्रार्थना केली तर तो तीं निवारण करीलच अशी भावना ठेवणं व्यर्थ आहे. मी लहानपणीं अतिशय श्रद्धाळु होतें. निर्जळी हरताळका, उपास, नामस्मरण मी नेहमी करी. पण त्या-मुळं माझीं संकटं कुठं नष्ट झालीं?

" बरं, अध्यात्मज्ञान सांगतं, की तूंच परमेश्वर आहेस. परंतु याची प्रचीति मला कधीच आलेली नाही. मीं योगसाधन केलं तर अनेक जन्मांनंतर ती प्रचीति मला येणार आणि तोंपर्यंतचे माझे जन्म मीं कसे काढायचे?

" परंतु प्रेममय परमेश्वराची कल्पना करून मात्र मला विसावा लाभेल.

" होय, होय, असंच. ही कृष्णमूर्ति म्हणजे माझ्या मातापितरांच्या प्रेमाचं प्रतीक असं मी समजतें. आईबाबांना माझ्या दुर्दैवाची एकहि गोष्ट टाळतां येणं शक्य नव्हतं. पण त्यांनी माझ्यावर अखंड प्रेम केलं. माझ्या दुःखांत ते वांटेकरी झाले. माझा आनंद त्यांनी अनंत पटींनी वाढविला. त्यांच्यांत दुःखनिवारणाचं सामर्थ्य नसलं तरी त्यांच्या प्रेमाची योग्यता कमी होतं की काय ? त्यामुळं माझं त्यांच्यावरलं प्रेम थोडंच कमी झालं ?

" नुसत्या आईबाबांच्या प्रेमाचंच हें प्रतीक नव्हे, तर आनंदरावांच्या प्रेमाचं, भाऊच्या प्रेमाचं ! आणि ज्या ज्या आप्तनातलगांनी, मित्रमैत्रिणींनी जें कांही अल्पस्वल्प प्रेम केलं त्या प्रेमाचंहि हें प्रतीक आहे. या जगांत जी कोणी सत्ताधारी शक्ति असेल तिचंहि प्रेम या मूर्तींत सामावलं आहे. आणखी. .आणखी मुकुंदरावांचंहि प्रेम या मूर्तीतच आहे. परंतु या प्रतीकाच्या ठिकाणीं अमुक केलंच पाहिजे अशा कल्पना नाहीत. माझी मर्जी लागली तर मी तिची पूजा करीन नाहीतर करणार नाही. पूजा केली नाही तरी ती मूर्ति रागावणार नाही किंवा मला शापणार नाही.

" आईबाबांना मीं काय थोडया वेळा दुखवलं ? कितीक खोड्या केल्या मीं. तरी ते कुठं रागावत असत ? राग भरले तरी स्वरांत प्रेम ओथंबलेलं असायचं. तशीच ही माझी मूर्ति. "

तितक्यांत दार वाजलें. मुकुंदराव हसतमुखाने आंत आले. टेबलावरील मूर्ति पाहातांच ती हातांत धरून ते म्हणाले,

" सुंदर. सुंदर. "

पहिला ' सुंदर ' शब्द मूर्तीला उद्देशून उच्चारलेला; परंतु दुसरा ' सुंदर ' शब्द अर्थगर्भ स्वरांतील होता !

मुकुंदरावांच्या आणि माझ्या मैत्रीची हीच गंमत होती, की त्यांना माझ्या भावना आपोआप समजत. त्यांना त्यांच्याशीं समरस

होतां येत असे. माझे कोणतेहि विचार मुकुंदरावांच्यापासून चोरून ठेवण्याची मला कधी जरुरी भासली नाही. माझ्या भावनांची मला कधी लाज वाटली नाही. आमच्या भावना परस्परविरोधी असल्या तरी एकमेकांविषयी आमचा आदर कमी होत नसे.

मी नास्तिक आहे हें मुकुंदरावांना माहीत होतें. ते स्वतः फार श्रद्धाळु होते. या बाबतीत आमचा प्रथम नदीतीरावर वादविवाद झाला होता आणि नंतरहि कित्येक वेळा आपलें म्हणणें मला पटवून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता.

म्हणूनच दुसऱ्या " सुंदर " शब्दांत त्यांनी बराच अर्थ सामावून घातला होता.

मी हसत हसत मुकुंदरावांना " बसा " म्हणून सांगितलें आणि नंतर म्हटलें, " हा माझा द्वारकाधीश फार फार श्रीमंत आहे हो. त्याच्या श्रीमंतीचं वर्णन ऐकायचं आहे ? "

" हो हो तर. नास्तिक लोकांच्या देवाला कसली श्रीमंती असते तें तरी बघूं दे. "

" ही मूर्ति म्हणजे किनई माझ्यावर ज्या ज्या मंडळींनी प्रेम केलं त्यांच्या प्रेमाचं प्रतीक आहे. म्हणजे माझी आई, माझे बाबा, भाऊ, आप्तमंडळी वगैरे सर्वांच्या प्रेमाची ठेव या मूर्तींत तुम्हांला आढळून येईल. अन् या मूर्तीला पूजा लागते ती पण माझ्या प्रेमाचीच. "

" असं ? "

मुकुंदरावांनी हा एकच शब्द अशा प्रकारें उच्चारला की मला अतिशय लाज वाटूं लागली. खालचा ओठ दातांखाली दाबून हसूं आवरीत मीं मुकुंदरावांच्याकडे पाहिलें. ती कृष्णमूर्ति हसल्याचा मला भास झाला होता. तसेच मुकुंदराव हसत होते! मलाहि प्रत्युत्तरादाखल हसूं आलें.

मुकुंदरावांनी हसून विचारलें, " त्या आप्तमंडळी वगैरेंतच का माझी जमा ? की जमा नाहीच ? "

"वा:! आहे तर!" नंतर मीं मुद्दाम खटथाळपणाने म्हटलें, "पण ती जमा किती आहे हें तुमचं तुम्हालाच माहीत. मला कांही त्याची मोजदाद करतां येत नाही."

"कशी येईल मोजदाद करायला? अमोजच आहे ती गोष्ट. त्या मूर्तींत ती सामावण्याजोगीहि नाही. त्यासाठी एक स्वतंत्र मूर्ति तुम्हांला घेतली पाहिजे."

मी त्यांच्याकडे पाहिलें तों त्यांच्या दृष्टींत अमोज प्रेम मला दिसले त्यांच्या हृदयांतील प्रेमभांडार खुलें होऊन त्यांचीं किरणें त्यांच्या दृष्टींतून जणू बाहेर पडत होतीं. त्यांचे डोळे चमकत असून त्यांचे ओठ स्फुरण पावत होते. श्वास जोरांत चालला होता. त्यांनी कांहीतरी हालचाल केली अन् पाहातां पाहातां त्यांच्या मुद्रेंत फरक पडूं लागला. त्यांनी एक जड निःश्वास सोडला आणि ओठ घट्ट मिटून धरले. त्यांच्या डोळयांत निश्चयाची छटा आली.

मुकुंदरावांचे हात मला फारच निश्चल दिसत होते. त्यांमध्ये मुळी कांहीच हालचाल नव्हती. त्यांच्या मेंदूकडून दोन प्रकारचे हुकूम सुटत होते. त्यांच्या भावना प्रेममय झाल्या असून त्यांची विचारशक्ति त्यांना त्या मोहापासून परावृत्त करीत होती. त्यांचा त्या क्षणीं जो मानसिक झगडा चालला होता त्याचें द्योतकच त्यांचे बाहु होते. आणि शेवटीं त्या शक्तीने विजय मिळविला. बाहूंची जडता निघून गेली आणि मुखावर केवळ गाढ निराशा पसरून राहिली.

माझी अवस्था मोठी कठीण झाली होती. हृदयाचे ठोके इतक्या मोठयाने होत होते, की मला वाटलें ते मुकुंदरावांना ऐकूं जात असावे. माझ्या कानांवर ते ठोके बंदुकीच्या आवाजाप्रमाणे पडत असून ते जणू मला सावध करीत होते. मुकुंदरावांच्या कंठाभोवती हात टाकावे म्हणून मी अगदी अधीर झालें होतें. त्यांच्या बाहूंची प्रथम झालेली हालचाल बघून त्यांच्या स्पर्शासाठी मी पुढेपुढे होत आहे असें मला भासत होतें. पण खरोखर ती क्रिया घडत नव्हती. मला वाटतें, त्या क्षणीं मुकुंदराव जितके निश्चल होते तितकीच मीहि निश्चल होतें.

त्या क्षणीं कुणी तिऱ्हाईत इसम आंत आला असता तर त्याला वेगळें असें कांहीहि दिसलें नसतें

धरणीकंपाचा धक्का क्षण अर्धा क्षणच बसला तर तो लोकांच्या लक्षांतसुद्धा येत नाही. तो फक्त यंत्रसहाय्याने नोंदला जातो. परंतु धरणीमातेच्या उदरांत केवढी प्रचंड खळबळ उडालेली असते! कित्येक दिवस तेथे तप्त धातूंचे व वायूंचे प्रवाह वाहून आंत भयंकर उलाढाली घडवून आणीत असतात. तो अर्ध्या क्षणाचा उपेक्षणीय असा लोकांना वाटणारा धक्का या प्रचंड उलाढालींचा द्योतक असतो.

आमच्या भावनांची इतके दिवस आंतल्या आंत जी उलाढाल चालू होती ती या क्षणीं बाहेर उमटली.

पण तो धक्का परस्परांच्या अंतःकरणावर नोंदला जातो न जातो तोंच तो धक्का क्षणभरांत नष्ट झाला.

त्या मोहमय क्षणांतून आमची दोघांची मुक्तता झाली. या क्षणीं आमच्यापैकी एकाने जरी आपल्या भावनांना यत्किंचित् मोकळी वाट सोडली असती तरी दुसऱ्याला मोह आवरणें कठीण होऊन आम्हां दोघांचा सर्वनाश झाला असता!

पण तो क्षण गेला.

मुकुंदरावांनी एक निःश्वास सोडला. विकलांग झाल्याप्रमाणे क्षणभर त्यांनी मागे खुर्चीच्या पाठीवर मस्तक टेकलें आणि डोळे मिटून धरले.

नंतर ते खुर्चीवरून उठून माझ्यासमोर येऊन उभे राहिले. त्यांनी माझे दोन्ही हात आपल्या हातीं घेतले. त्यांच्या स्पर्शात, त्यांच्या दृष्टींत आदराशिवाय कांहीहि नव्हतें. त्यांचें माझ्यावरलें निस्सीम प्रेम आदराच्या कोंदणांत पकडून धरलेलें होतें.

मुकुंदराव दुःखभराने सद्‌गदित झालेल्या कंठाने मला म्हणाले,

"सुमति, हा मोहाचा क्षण येऊं नये म्हणून मी फार जपत होतों. याच क्षणालामी फार भीत होतों. पण त्या मोहावर आपण विजय मिळविला आहे. हा क्षण येऊन गेला हें चांगलं की वाईट झालं तें

मला समजत नाही. पण एवढा मात्र मला आनंद वाटतो, की माझं जसं तुझ्यावर निस्सीम प्रेम आहे तसंच तूंहि माझ्यावर करतेस. माझ्या प्रेमाची पूजा तूंहि तशाच प्रकारच्या प्रेमानं बांधतेस याबद्दल माझी खात्री झाली कांही असलं तरी त्या पूजेला फक्त हृदयांतच आपण स्थान दिलं पाहिजे. कारण माझ्या हृदयानं जरी इंदूशीं प्रतारणा केली असली तरी तिला रतिमात्र वाईट वाटेल असं मला बिलकुल वागून चालणार नाही. तिचं माझ्यावर एकनिष्ठ प्रेम आहे. तिच्या वडिलानी मला आणि माझ्या आईला संकटकाळीं आश्रय देऊन माझा विद्याभ्यास पूर्ण केला आणि शिवाय आपली एकुलती एक मुलगी मला दिली.

" इंदु इतकी गुणी आहे आणि इतकी समंजस आहे, की तिनंच मला आजपर्यंत कितीक वेळां दुसरं लग्न करण्याचा आग्रह केला आहे. तुला नवल वाटेल, परंतु तुझ्याविषयीदेखील तिनं आडून मला एकदा सूचना दिली."

मीं आपले हात मुकुंदरावांच्या हातांतून काढून घेऊन आश्चर्यानें विचारलें,

" काय? माझ्याबद्दल इंदिराताईनी तुम्हांला सुचवलं ?"

मुकुंदराव आपल्या खुर्चीवर बसून उत्तरले,

" हो, तुमच्याबद्दल."

आवेगाच्या भरांत मुकुंदरावांनी मला नुसतें 'सुमति' म्हटलें होतें. परंतु आता पुन्हा त्यांनी मला 'अहो-जाहो' म्हणतांच मला किंचित् वाईट वाटलें. पण तेंच योग्य होतें, नव्हे का?

" पण त्यांच्या कांही लक्षांत येईल असं आपण कधी कांही वागलों नाही."

" तें खरं. पण मी तुमची तिच्याजवळ नेहमी वाखाणणी करतों, तुमची मला किती मदत आहे हें ती पाहातेच, त्यावरून आली असेल कल्पना तिच्या डोक्यांत. किंवा काय सांगावं? शुद्ध प्रेमाला अंतर्दृष्टि असते म्हणतात. माझे मनोव्यापार तिला कळलेहि असतील." क्षणभर थांबून मकुंदराव म्हणाले, " मी यापुढं जास्त जपेन."

माझ्या तोंडून एक उसासा नकळत बाहेर पडला मी उठलें आणि ती कृष्णमूर्ति ट्रंकेंतल्या कपडयांत गुंडाळून ठेवली.

त्या मूर्तीच्या पूजेविषयींचा माझा उत्साह पार लोपून गेला होता !

मुकुंदरावांनी खिन्नपणें हसून विचारलें, " तिची तुम्ही पूजा करणार ना ? "

मीहि खिन्नपणें हसलें. मान हालवून मीं सांगितलें, " ऊं: ! काय करायची पूजा करून ! बरी आहे ती ट्रंकेंतच "



# प्रकरण ३६ वें

मी खुर्चीवर बसलें. मुकुंदराव समोरच्याच खुर्चीवर बसले असून कोपरें टेबलावर टेकून हाताच्या पंजाने त्यांनी तोंड झाकून घेतलें होतें. त्यांच्या कंठाची हालचाल चालली होती. दोनतीन वेळां त्यांनी हुंदकेवजा निःश्वास सोडले. दुःख, निराशा आणि मनस्ताप यांची मूर्तीच जणू माझ्यासमोर बसली होती.

नेत्र मिटून मुकुंदराव हळूहळू मन शांत करीत होते. क्षणांत त्यांच्या मुखावर अंतिम शांतता प्रतिबिंबित होऊं लागली.

कां कुणास ठाऊक, मला एकदम संतापाची तिरिमिरी आली सर्वांगांत रक्त उसळून तें मस्तकाकडे जात असल्याचा भास झाला. माझें अंग कापूं लागलें. संतापाच्या भरांत मीं ओरडून ताईला सांगितलें,

" ताई, आपलं सामान बांधूं नको. उद्या जायचं नाही विरंजगांवीं. "

अचानक मर्मावर घाव बसावा त्याप्रमाणे कांहीसा विवळल्यासारखा उद्‌गार काढून मुकुंदराव उभे राहिले. त्यांचें मुख पांढरें फिक्कट पडलें असून अगतिकपणें काय बोलावें हेंच त्यांना सुचेना. तरी त्याचे डोळे मात्र दुःखार्ततापूर्ण निषेधाने माझ्याकडे बघत होते.

लाजेने चूर होऊन माझी दृष्टि खाली वळली. संतापाच्या जागीं दुःखाचे कढ उठले. निराशेमुळे गलितांग झाल्याप्रमाणे मला वाटत होतें. डावा हात टेबलावर ठेवून त्यावर मीं मस्तक टेकलें. रडूं आवरण्याची मी शिकस्त करीत होतें.

तितक्यांत दारांतून ताईने विचारलें, " तूं हाक मारलीस मला ? मी नळावर गेलें होतें. "

मीं मस्तक वर केलें. मघा मी जितक्या जोरांत बोललें होतें तितक्याच दुर्बल आणि कापऱ्या स्वरांत मीं सांगितलें,

" ताई, आपल्याला विरंजगावीं जायला अवकाश आहे अजून, तेव्हा बांधाबांधी करूं नको म्हणून सांगायला हाक मारली होती मीं. "

ताईला बरें वाटलें नाही; पण ती कांही बोलली नाही एक-वार माझ्याकडे आश्चर्याने बघून ती आत निघून गेली.

ताईला उत्तर देण्यासाठी मीं वर मान केली तेव्हा मुकुंद-रावांची चर्या किती आशांकित झाली होती! परंतु मी पुन्हा पहिल्याप्रमाणेच ताईला सागितल्याचें पाहून पुन्हा तीवर निराशा पसरली. ताई गेल्यावर कंपित स्वरांत त्यांनी विचारलें,

" तुम्ही कधीच येणार नाही विरंजगांवीं ? "

" कशाला यायचं? कुठंहि गेलं, कांही केलं तरी माझ्या नशिबांत शेवटीं निराशाच ठेवलेली दिसते. मग इथंच राहिलं म्हणून कुठं बिघडलं? आणि इतके दिवस ठीक होतं. पण आता परस्परांच्या सान्निध्यांत आपल्याला मोकळेपणा वाटणार नाही. मनाला फार यातना होतील. शिवाय इंदिराताईना आपल्या मनः-स्थितीत बदल झालेला कळला तर त्यांना काय बरं वाटेल ? "

माझ्या या युक्तिवादावर मुकुंदरावांना जरा वेळ उत्तर सुचेना. ते जरा विचारांत पडले. नंतर ते म्हणाले.

" आपण केवढं मोठं कार्य अंगावर घेतलं आहे! आता कुठं त्याला जरा रंगरूप येऊं लागलं होतं. पुढल्या त्याच्या विस्ताराच्या मोठमोठया कल्पना आपण रचल्या होत्या, अन् तें कार्य आपण असंच वाऱ्यावर सोडायचं का?"

मी विरक्तपणें म्हटलें, " आता कांही तें कार्य माझ्यावांचून अडून राहाणार नाही. "

" मनापासून असं वाटतं का ? "

मला किंचित् हसूं आले. मुकुंदरावांच्या अशा गौरवपर उद्गारां-तच माझा आनंद साटला होता. पण माझें हसूं लगेच मावळलें. मीं त्रासून म्हटलें, " पण मग आता काय करायचं तरी ? "

" काय करायचं ? एवढ्या मोठया सामाजिक कार्यासाठी आपल्या वैयक्तिक भावनांचा बळी द्यायचा. "

मुकुंदरावांच्या तेजस्वी मुखाकडे माझी दृष्टि खिळून राहिली. माझी मलाच लाज वाटली.

माझ्या दुर्बलतेची मला जाणीव झाली. पण त्याचा परिणाम विपरीत झाला. मला वाटलें, इंदिराताईंचं मुकुंदरावांच्यावर निस्सीम प्रेम आहे, पुन्हा त्याच्यावर मातृप्रेमाची पखरण पडली आहे म्हणून त्यांना प्रेमभावनांचा बळी देण्याची भाषा बोलवते. मला चीड आली. खोचिक स्वरांत मीं म्हटलं,

" माझ्या भावनांचा बळी मीं स्वखुषीनं द्यायचा की नाही हा प्रश्नच नाही. देवाला मुळी तो प्रियच आहे. माझ्या लहानपणापासून तो माझ्या भावनांचा बळी घ्यायला सोकावला आहे. प्रश्न आहे तो फक्त मी कसं वागायचं यासंबंधी आहे. चिलयाला कांडतांना हसत गाणीं म्हटलीं पाहिजेत हा त्या देवाचा हट्ट. तो चांगुणेला एकदाच पुरवावा लागला मीं तो हट्ट अनेक वेळां पुरवला आहे. आता मला नाही हें सहन होत "

मुकुंदरावांनी शेवटचा बाण काढला.

" पण...पण तुम्ही विरंजगांवीं आलां नाही, एकदम कार्यातून अंग काढून घेतलं तर लोक काय म्हणतील ? "

लोकांचें नांव काढतांच माझ्या तळपायाची तिडीक मस्तकांत शिरली.

" लोक काय वाटेल तें म्हणूं देत. मला सवयच आहे त्याची. "

मुकुंदराव हसले. त्यांचे तें हसणें चमत्कारिकच होतें. त्यांत अनेक छटा होत्या. पण त्यांतील एका छटेने माझा मर्मभेद केला. बाणांनी पुढ्यावरील ठिपक्यांचा लक्ष्यवेध करीत असतां कांही बाण जरा बाजूला लागून एक मात्र त्या ठिपक्याला भेदून जावा तसं त्या हसण्यांतील एका छटेने मला हृदय विद्ध झाल्याप्रमाणे भासूं लागलें.

मी पुनःपुन्हा मनाला विचारीत होतें, की खरेंच का ती तिरस्काराची छटा त्या हसण्यांत होती ?

माझ्याबद्दल मुकुंदरावांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला काय ? बाकीचें कांहीहि सहन होईल; पण त्यांचा तिरस्कार ?

तिरस्कारच होता का तो ? हो. तिरस्कारच.

आमचें बोलणें झाल्यानंतर मुकुंदरावांनी आपलें सामान सूटकेसमध्ये घातलें व "जातों" म्हणून त्यांनी माझा आणि ताईचा निरोप घेतला. त्यांच्या मुद्रेवर आशाकुलता दिसत होती.

माझ्या मनाची चलबिचल झाली. परंतु माझा निश्चय बदलला नाही.

मीं मानेनेच होकार दिला. " कुठं जातां ? " किंवा " जाऊं नका " असे शब्द माझ्या तोंडून निघेनात. माझ्या निराशेचा आघात मला असह्य झाला होता. त्यामुळे माझी सारासार विचारशक्तीच लोपली होती की काय कोण जाणे !

मुकुंदराव घरांतून गेल्यावर मात्र मला गोंधळल्यासारखें झालें.

" हें झालं तें बरं झालं का ? " माझें मन मला म्हणत होतें.

तितक्यांत ताईने विचारलें,

" सुमति, झालं तरी काय ? "

" कर्म झालं माझं ! " मीं वैतागाने उत्तर दिलें. पुन्हा तिने विचारलें, " विरंजगांवीं कधीच नाही परत जायचं आपण ? "

" नाही. "

" तें कां ? " ताईने निराशेने विचारलें.

" सांगितलं ना तुला कर्म माझं म्हणून ! "

ताई आंत निघून गेली. मी हतबल होऊन खुर्चीवर बसलें.

जरा वेळाने ताई बाहेर येऊन म्हणाली,

" चल जेवायला. "

" मला नाही जेवायचं. तूं जेवून घे. "

ताईने माझ्या समोरल्या खुर्चीवर हुबेहूब माझ्यासारखीच बैठक घेऊन म्हटलें,

" तूं जेवत नसलीस तर मलाहि नाही जेवायचं. "

आम्ही दोघी हसलों.

मी मुकाट्याने उठून आंत जाऊन पाटावर बसलें. ताईने दोन पानें वाढून घेतलीं आणि आम्ही जेवायला बसलों.

" ताई... "

ताईने चमकून विचारलें, " काय ग ? "

माझा कंठ सद्गदित झाला होता. " ताई, आता चार महि-न्यांत मी तुला खूप इंग्रजी शिकवीन. मग तूं नर्सिंगचा कोर्स घे म्हणजे माझ्या नी तुझ्या नशिबाची वावडी हवी तशी भिरभिरली तरी तुला मग स्थिरता येईल. "

ताईचे डोळे पाण्याने भरून आले.

" मला एकटीला तशी स्थिरता नकोच आहे. आधी तुझी स्थिरता अन् मग माझी. मी नर्सिंगचा कोर्स घेऊन तूं काय मग घरांत एकटी वाईट विचार करीत बसणार होय ? "

" तसं नव्हे ग. जमलं तर पुन्हा हुजुरपागेंत नाहीतर कन्या-शाळेंत नोकरी धरीन मी. "

ताईने नाखुषीने मान उडविली. जरा वेळ बोलू की नको असा तिला प्रश्न पडला असावा. मग जणू निर्धार करून ती म्हणाली,

" सुमति, तूं शिकलेली आहेस, शहाणी आहेस. मीं तुला सांगावं असं नाही. पण पोटांत आच असली तरच कढ येतो, म्हणून बोलल्याशिवाय राहावत नाही. सुमति, विरंजगांवला एवढं मोठं सत्कार्य तुझ्या हातून घडतं आहे तें चुटकीसरसं तूं आपलं सोडून द्यावंस हें कांही बाई मला बरं वाटत नाही. गरिबींतच का होईना, पण तिथं आपले दिवस किती सुखांत जातात ? पुष्कळ शिकावं अन् आपणहि कांही करावं असं मला अलीकडे सारखं वाटूं लागलं होतं. " ताईने हताशपणें एक निःश्वास सोडला.

मी नुसती हसलें. काय उत्तर देणार मी तिला ?

आंचवून मी वाचण्यासाठी हातीं पुस्तक घेऊन बसलें; पण मुकुंदरावांचें तें तिरस्कारमिश्रित हसणें डोळ्यांसमोरून हालेना.

"चुकलं का आपलं? आता आपलं आयुष्य कसं जायचं? फुटक्या मडक्यांत मोठ्या शिकस्तीनं थोडं पाणी जमलं होतं तेंहि पार गळून गेलं! आता जीवन कसं कंठायचं?"

रात्रीं बिछान्यावर याच विचारांनी तळमळत मी पडलें होतें.



# प्रकरण ३७ वें

पुढील दोन महिने भ्रमांत असल्याप्रमाणेच मीं काढले. त्यापूर्वीच्या एक महिन्यांत मी कित्येक इष्टमित्रांच्या घरीं गेलें होतें. कित्येक संस्था बघून आलें आणि कित्येक व्याख्याने ऐकलीं. वाचलेंसुद्धा कितीतरी! त्या सर्व गोष्टींपासून मला किती आनंद झाला होता!

पण आता मला कुठे जावेंसें वाटेना! कुणाला भेटू नये, बोलूं नये, हिंडूफिरूं नये, वाचूं नये, कांही करूं नयेसं मला वाटूं लागलें

सारखे वाईट विचार मनांत येऊन गेल्या दोनतीन वर्षांतलें मनोधैर्य ते पोखरून टाकीत.

हळूहळू मला नवल वाटूं लागलें, की मी एकदम विरंजगांवला जाण्याला भ्याले कां? माझें आणि मुकुंदरावांचें प्रेम उघड झालें, त्यामुळे माझ्या निराशेंत अल्पांशाने तरी भर पडण्याचें कारण काय? सावलीप्रमाणेच आमचें प्रेम मुळीं निराशेला बरोबर घेऊन जन्मलें होतें. त्या निराशेची प्रथमपासून आम्हांला पुरी जाणीव होती. पण ती परस्परांना उघडपणें कळली नव्हती. पण उजेडांत येतांच ती निराशेची सावली स्पष्ट दिसली म्हणूनच मी भेदरलें काय? की थोडी अंधुक आशा माझ्या मनांत घर करून होती?

सावलीप्रमाणेच तेजहि वस्तूबरोबर जन्म पावतें. माझी निराशाहि आशेच्या संगतींत होती की काय? आणि ती आशा पूर्ण लुप्त होतांच निव्वळ निराशा दिसून मला धक्का बसला का?

हो. असेंच.

माझ्या मनाने वाईट आशा बाळगली यांत माझीच चूक झाली. मुकुंदरावांच्या मनांतून प्रथमपासूनच आशेची हकालपट्टी झालेली असावी म्हणूनच त्यांची शांति ढळली नाही. त्यांच्या मनःशांतीमुळे आपल्या अभिमानाला धक्का बसला. त्यांचें प्रेम तुलनेने कमी वाटून आपलें मन दुखावलें.

केवढी ही आपली चूक झाली! त्यांचें धैर्य पाहून आपल्याला त्यांच्याबद्दल वास्तविक आदर वाटायला पाहिजे होता, आपण

त्यांचें अनुकरण करायला हवें होतें. तर उलट आपल्याला त्यांचा राग आला !

आपल्यावर विश्वास ठेवून त्यांनी आपल्या कार्याचा व्याप वाढवला आणि आपण त्यांचा विश्वासघात केला ! कां नाही त्यांना तिरस्कार वाटणार ?

आता काय करूं मी ? जाऊं या का विरंजगांवला ? काय बरें वाटेल त्यांना ? जावें का ?

पण मनाला वाटत असून धीर होईना ! अशा या संदिग्ध मनःस्थितींत तर मी कासावीस होऊन गेले.

एके दिवशीं संध्याकाळीं अशाच भरकटलेल्या मनःस्थितींत मी खोलींत येरझारा घालीत असतां मनांत विचार आला, " इंदिरा-ताई इतकीं वर्षे आजारी आहेत, आमची गाठ पडण्यापूर्वीच त्या गेल्या असत्या तर ? अन् आता-"

माझी मीच दचकलें ! पाण्यांतल्या सापाचें डोकें वर दिसावें तशी माझ्या मनांतला हा दुष्ट विचार बघून माझी अवस्था झाली.

तितक्यांत ताई घाबऱ्या घाबऱ्या खोलींत आली

' सुमती, तार आली आहे तुझ्या नांवची. "

" माझ्या नांवची तार ? "

मग सही करून शिपायाच्या हातून तार घेऊन फोडीपर्यंत हजारों कुशंका मनांत आल्या. कापऱ्या हाताने मीं तार वाचली. तार मुकुंदरावांची होती त्यांत मजकूर होता- " इंदु अत्यवस्थ असून तुमची सारखी आठवण करीत आहे. ताबडतोब निघून यावें म्हणजे आभारी होईन. "

मला कसेसेंच झालें ! इंदिराताई माझी आठवण काढीत होत्या. माझ्यावर त्या इतकें प्रेम करीत होत्या आणि माझ्या मनांत त्यांच्या-बद्दल दुष्ट विचार डोकावत होते.

ताई अधीरपणें जवळ उभी होती. माझें तोंड उतरलेलें पाहून तिने भिऊन विचारलें, " कुणाची तार ? "

" इंदिराताई अस्वस्थ आहेत. त्या माझी आठवण काढता-हेत. तेव्हा उद्या सकाळींच जाऊं आपण. तुला यायचंय् ना ? "

" हो हो तर. मला केव्हापासून त्या सगळ्यांना भेटावंसं वाटतंय् ! तर दुर्दैवानं त्या आजारी पडल्या आहेत. मला आता इथं क्षणभरहि चैन पडणार नाही ! "

ताई आंत गेली. जरा वेळाने ती बाहेर येऊन म्हणाली, " चुलीवर कुकर ठेवलाय्. मी जरा जाऊन भिकारदास मारुती-पुढं नारळ फोडून येतें. "

मी मनांत घोकीत होतें, " इंदिराताईंना गुण पडला पाहिजे. मग तो औषधानं पडो, की नवसानं पडो-- इंदिराताईंना गुण पडला पाहिजे. "

रात्रीं माझा डोळयाला डोळा लागला नाही. रात्रींहि मी तोच मंत्र जपीत होतें.

आम्ही दुसऱ्या दिवशीं लॉरीतून विरंजगांवला कशा गेलों तें मला आठवत नाही. आम्ही गेलों खऱ्या.

यशोदामावशी आम्हां दोघींना घेऊन माडीवर गेल्या. मुकुंदराव पलंगाजवळच्या खुर्चीवर बसले होते. आम्हांला पाहातांच त्यांनी मानेनेच मला जवळ येण्याची खूण केली. मी अगदी पावलांचा आवाज न करतां पलंगाजवळ जाऊन उभी राहिलें.

इंदिराताईंचा क्षीण देह पलंगावर पडला होता. त्यांचें मुख रोगजर्जर आणि रक्तहीन दिसत होतें. त्यांचे डोळे मिटलेले असून जड श्वास चालला होता.

मुकुंदरावांनी हलक्या आवाजांत म्हटलें, " इंदू, सुमतीताई आल्या आहेत. "

इंदिराताईंनी तापामुळे जड झालेले आपले डोळे अर्धवट उघडून माझ्याकडे पाहिलें आणि त्या क्षीणपणें हसल्या. नंतर त्यांनी पुन्हा डोळे मिटून घेतले.

त्यांची निश्चलता पाहून माझ्या मनांत कुशंका येऊन काळ-जांत धसका बसला. पायांतली शक्ति जाऊन मी मटकन् खालीच बसलें.

क्षणभर मुकुंदरावहि गडबडले. नंतर त्यांनी हसून खुणेनेच इंदिराताईंना झोप लागली असल्याचें सांगितलें. नंतर ते हलकेंच म्हणाले, " आठ दिवसांनंतर आज तिला ही झोप लागते आहे. तुम्हाला बघून तिला इतकं स्वस्थ वाटलं. "

माझ्या सर्वांगांतून आनंदाच्या लहरी उठल्याप्रमाणे मला झालें. मनाला एकदम हलकें वाटूं लागलें. मी खाली गेलें आणि मधल्या अंधाऱ्या खोलींत बसून खूप रडलें. त्या रडण्यांत दुःख मात्र नव्हतें. मग मावशींनी इंदिराताईंच्या आजाराची हकीकत सांगितली. इंदिराताईंना टायफॉइड झाला होता. आठ दिवसांत त्यांना झोप आलेली नव्हती. आणि त्यापूर्वीपासूनच ताप येत असून तो पुरता निघत नव्हता. आता दोनतीन दिवसांत उतार पडला पाहिजे म्हणजे काळजी नाही असें जुन्नरचे डॉक्टर विश्वनाथराव म्हणाले होते.

आणि आज त्यांना स्वस्थ झोप लागली होती.

मावशीहि मला म्हणाल्या, " सुमतीताई, तुम्ही तार पोचल्याबरोबर आलांत म्हणून बरं झालं. इंदूला बोलवत नाही; पण त्यांतून बळ करून म्हणायची, की सुमतीताईंना बोलवा म्हणून. "

संध्याकाळीं डॉक्टर आले तेव्हा त्यांनी अत्यंत अनुकूल अभिप्राय दिला.

डॉक्टरांची आणि माझी चांगली ओळख होती. ते मला म्हणाले, " आता जायची घाई करूं नका बरं का. "

" नाही, नाही. मुळीच घाई करणार नाही. "

तेवढयांत इंदिराताई क्षीणपणें बोलल्या, " जायचंच नाही. "

" बरं, नाही जाणार. तुम्ही लवकर बऱ्या व्हा म्हणजे झालं. "

डॉक्टर न बोलण्याची सूचना करीत असतां इंदिराताई म्हणाल्या, " वचन द्या जाणार नाही म्हणून. "

मीं इंदिराताईचा हात हातीं घेतला आणि म्हटलें, " अगदी वचन. पण आता तुम्ही स्वस्थ पडा. बोलण्याचे श्रम घेऊं नका मुळीच."

एखाद्या लहान मुलाप्रमाणे इंदिराताई एका कुशीवर वळल्या आणि त्यांनी डोळे मिटून घेतले.

● ● ●

# प्रकरण ३८ वें

इंदिराताईंच्या प्रकृतींत झपाट्याने सुधारणा होत गेली. त्यांच्या शुश्रूषेचें काम मीं सर्वस्वीं आपल्याकडे घेतलें होतें आणि इंदिराताईंना त्यामुळे अतिशय समाधान वाटत होतें.

इंदिराताई माझ्यावर किती सहज प्रेम करीत होत्या ! त्यांत कुठे कांही देखावा नाही, खोच नाही, कांही नाही.

माझ्या मनांत त्यांच्याबद्दल इतका अशुभ विचार आला कसा हेंच मला आता नवल वाटू लागलें होतें. माझ्या मनाच्या डोहांत असलें हें सापाचें पिल्लू का उमटलें ? माझेंच मन मला खात होतें

म्हणूनच मी इंदिराताईंच्या शुश्रूषेची तपस्या करीत होतें. त्या शुश्रूषेमुळे इंदिराताईंना आराम पडत होता आणि त्यामुळे मला एक प्रकारें तपस्यापूर्ति झाल्याप्रमाणे वाटत होतें. पण माझ्या मनांत असा विचार आलाच कां, हें प्रश्नचिन्ह डोळ्यांपुढे कालियाप्रमाणे नाचत होतें.

इंदिराताईंच्या नित्य शुश्रूषेमुळे मला पुष्कळच दगदग होई; पण मनाला बरें वाटे. पण इंदिराताईंच्या खोलीबाहेर पडलें, की मनाला बेचैन होई.

इंदिराताई तोंडाने पुष्कळदा म्हणत, " तुम्ही इतके माझ्या-करिता श्रम करतांहां, आता तुम्हीच आजारी पडाल बरं का. जरा तरी विश्रांति घेत चला "

पण जरा दूध, लापशी वगैरे देण्याच्या वेळीं मी नसलें, की त्या सहज म्हणून माझी चवकशी करीत.

मुकुंदराव एकदा माझ्यादेखतच थट्टेने त्यांना रुष्ट स्वरांत म्हणाले, " इंदू, तूं आता माझ्यापेक्षा सुमतीताईंच्यावर जास्त प्रेम करायला लागलीस अं ! "

इंदिराताईंनी त्यांच्याकडे पाहात विचारलें, " शक्य तरी आहे का तें ?" त्यांनी स्वरांत थट्टेचा प्रयत्न केला होता; परंतु त्यांच्या नेत्रांतून उमटलेला प्रीतीचा संदेश गहनगंभीर होता.

तो संदेश वाचतांना मुकुंदरावांच्या नेत्रांत पाणी चमकलें. त्यांनी इंदिराताईच्या अंगावरून हलुवारपणें हात फिरविला.

मी निःशब्दपणें खोलींतून बाहेर आलें.

एक महिन्याने इंदिराताई खोलींतल्या खोलींत हिंडूंफिरूं लागल्या तेव्हा त्याच मला म्हणाल्या, "आता राहाणार ना इथं मागल्यासारख्याच ?"

राहूं नयेसें सेअजूनहि मनाला वाटत असून राहायचें असा मीं मुळी निर्धार केला होता. माझ्या शुश्रूषातपस्येमुळे माझें मनोधैर्य पुष्कळच वाढलें होतें. पुण्यांत मीं दोन महिने घालवले तसेच यापुढेहि दिवस घालवावे ही माझी इच्छा नव्हती. विरंजगावीं अंगिकारलेलें समाजसेवेचें कार्य पुढे अखंड चालवायचें, त्या कार्यासाठी आपल्या वैयक्तिक भावनांचा बळी द्यायचा हें मीं मनाशीं पक्कें ठरवलें होतें.

म्हणून मीं इंदिराताईंना होकारार्थी उत्तर दिलें.

मुकुंदरावांनी मात्र या बाबतींत माझ्याजवळ अवाक्षर उच्चारलें नव्हतें. ते फारसे माझ्यापाशी बोलतच नसत. मी नसल्यामुळे माझ्या कामाची त्यांनी कसकशी वाटणी केली होती आणि त्यांना किती जास्त दगदग पडत होती तें मावशींच्या तोंडून मला कळलें होतें.

इंदिराताईनी जो प्रश्न केला तो मुकुंदरावांनी करावा म्हणून मी उत्कंठेनं वाट पाहात होतें. पण त्यांनी तो प्रश्न केलाच नाही ! त्यामुळे मला वाईट वाटत होतें.

माझें एक मन मात्र मला सांगत होतें, की मुकुंदरावांसारख्या स्वाभिमानी माणसाला तेंच वागणें शोभत होतें. माझीच चूक झाली. मींच नम्रता स्वीकारून ती सुधारली पाहिजे.

एके दिवशीं मुकुंदरावांच्या बैठकीच्या माडींत जाऊन मींच त्यांना म्हटलें, " आता इंदिरातईाना चांगलं बरं वाटत आहे, तेव्हा..."

मुकुंदरावांनी अधीरतेने विचारलें, " तेव्हा काय ?"

" तेव्हा पूर्वीप्रमाणंच शिकवण्याचं वगैरे काम करायला कांही हरकत नाही. "

मुकुंदराव मोकळेपणाने हसले आणि म्हणाले, " अगदी नक्की विचार? नाहीतर तुम्हां बायकांची लहर केव्हा फिरेल त्याचा नेम नसायचा! "

एकच वाक्य अन् तेंसुद्धा हसतहसत उच्चारलेलें; पण मला त्यामुळे मेल्यापेक्षा मेल्यासारखें होऊन गेलें!

लगेच मुकुंदरावांनी कामासंबंधी सर्व गोष्टी बोलण्यास सुरवात केली.

दुसऱ्या दिवसापासून सर्व कार्यक्रम पूर्वीप्रमाणे सुरू झाला. आमच्या खोल्या पुन्हा साफसूफ करून तेथेच मी आणि ताई राहूं लागलों. ताईचा उल्हास अगदी अपूर्व होता.

मी पुन्हा काम करूं लागल्याबद्दल विरंजगांवच्या लोकांना फार आनंद वाटत होता. सर्वांनी मला विचारून विचारून पुरेसें केलें, " तुम्ही सुट्टीकरिता गेलां आणि पुण्यालाच काय राहिलां? "

त्यांना काय कारण सांगायचें? म्हणून मीं आणि मुकुंदरावांनीहि माझी प्रकृति जरा बरी नव्हती तेव्हा जरा विश्रांतीसाठी जास्त दिवस राहिलें असें सागून त्या लोकांचें समाधान केलें.

त्या गोष्टीचा किती विपरीत परिणाम झाला!

सुमारे पंधरा दिवसांनंतरचीच हकीकत. मी माझ्या माडींत एकटीच बसलें असतां मुकुंदराव आले. त्यांचें तोंड बघून माझ्या मनाला चरकाच बसला. मीं घाबरून विचारलें, " काय झालं? "

मुकुंदराव माझ्या दृष्टीला दृष्टि देण्याचें टाळून ते खिडकींतून दूर बघू लागले. काय बोलावें हेंच त्यांना सुचत नसावें.

मीं अधीरपणें पुन्हा विचारलें, " काय झालंय् तरी काय? "

" सांगतों; पण तुम्हीं मन अगदी घट्ट केलं पाहिजे आणि कांही झालं तरी, हातीं घेतलेलं कार्य करीत राहायचं, किती त्रास झाला तरी विवेक सोडायचा नाही आपणां दोघाची देव परीक्षा पाहातो आहे त्यांत आपण विजयी झालं पाहिजे. "

या बोलण्याने माझा धीर सुटत चालला. “ परीक्षा ? म्हणजे काय ? ”

मुकुंदरावांनी आपल्या कोटाच्या खिशांतून दोन पत्रें काढलीं. मीं उत्सुकतेने हात पुढे केला; परंतु पत्रें हातांतच धरून ते म्हणाले, “ हीं तुम्हाला दाखवावीं की न दाखवावीं असा मला प्रश्न पडला होता. पण इकडून तिकडून कळण्यापेक्षा मीच सांगितलेलं बरं आणि शिवाय पुढल्या संकटाला आधीच मन तयार केलेलं बरं म्हणूनच दाखवतों हीं पत्रं. वाचा. ”

दोन निनांवीं पत्रें होतीं तीं. शाळेंतल्या मास्तरीण लहानीबाई कारखानीस यांच्या नांवावर एक आलें असून दुसरें विरंजगांवचे एक प्रतिष्ठित गृहस्थ हरिपंत साठे यांच्या नांवावर होतें.

पाकिटावर पुण्याच्या पोस्टाचा शिक्का होता अक्षर अगदी वेडेंवाकडें होतें.

आणि पत्रांतला मजकूर ?

एकेक अक्षर इंगळीसारखें मला डसत होतें.

“ सुमतीबाई आणि मुकुंदराव हीं दोघं वाईट आहेत. ती बाई आपलें पाप लपवण्यासाठी पुण्याला राहिली होती. चांगली समाज-सेवा दोघेंजण करताहेत ( ? )! तुमच्या गावाला भूषण झालीं आहेत नव्हे ! संभाळा. तुमच्या मुलीबाळी अशाच तयार होतील ! ”

पत्र माझ्या हातांतून गळून पडलें ! मला वर मान करण्याचा धीर होईना. माझ्या डोक्यांत घणासारखे घाव बसत होते.

परीक्षा ! खरोखरच परीक्षा होती ही !

आता याचा परिणाम काय होणार ?

मीं विचारलें, “ लोक विश्वास ठेवतील या पत्रांवर ? ” माझा आवाज मलाच वेगळा वाटत होता.

“ साठयांच्याबद्दल कांही काळजी नाही, त्यांनी मला पत्र दिलं तेव्हाच ते मला म्हणाले, की ‘ मी तें केराच्या टोपलींत टाकणार होतों; पण म्हटलं तुम्हाला दाखवावं. असलीं हीं पत्रं म्हणजे आपल्या

कार्याचा गौरव आहे वास्तविक, असं समजा म्हणून मला सांगितलं त्यांनी. कारण ते म्हणाले, तुमची कीर्ति पुण्यापर्यंत पोचली याबद्दल मत्सर वाटून कुणीतरी हा उपद्व्याप केला आहे, दुसरं काय! मत्सर म्हणजे पराभूतीचं चिन्ह. मुकुंदराव, तुम्हीं या निनाव्यांचा पराभव केला आहे' असा मला साठ्यांनी धीर दिला" पण मुकुंदराव जरा आवकले. नंतर ते म्हणाले, 'पण या कारखानीसबाईनी पत्र चारपाच लोकांना दाखवून बराच गोंधळ सुरू केला आहे परवापासून. आज हे पत्र कुलकर्णी मास्तरांनी मला दाखवलं आणि त्या बाई तुमच्याविरुद्ध फार बोलताहेत असंहि मला सांगितलं."

"म्हणजे एव्हाना सर्व गावांत या पत्रांची हकीकत कळली असली पाहिजे! पण लोकांनी विश्वास कां ठेवावा? पुण्याला कुणीहि सांगेल, की हें खोटं आहे म्हणून."

"हो, पण इतकं कोण करतंय्! तुम्ही आजारी होतां म्हणून आपणच सर्वांना सांगितलं. त्यामुळं त्यांना जास्तच खरं वाटतंय्."

इतकी मी संतापलें होतें तरी मला या विचित्र घटनेचें हसूं आलें. पण हसतांनाच डोळ्यांत ऊष्णाश्रु उभे राहिले.

तेव्हा मुकुंदराव म्हणाले, "मी सांगितलं ना मघाशी की धीर सोडायचा नाही म्हणून?"

"पण धीर धरून काय होणार? आपल्याला लोक पूर्वीसारखे काम करूं देतील का? लहानीबाई काय करतील कोण जाणे!"

"मी उद्या त्या बाईला भेटणार आहें."

"काय सांगणार तुम्ही तिला?"

"माझ्या शब्दावर जर ती विश्वास ठेवीत नाहीसं वाटलं तर मी तिला सांगणार, की तूं पुण्याला जाऊन स्वतः खात्री करून घे. नाहीतर या बाबतींत शब्द बोलूं नको."

जरा वेळ मुकुंदराव स्वस्थ बसले. नंतर तेच म्हणाले, "एरवीं मीं या बाबतींत कांहीच केलं नसतं; पण समाजाला आपल्याविषयी

आदर वाटला तरच आपलं कार्य नीट चालेल. म्हणून हा गैरसमज यथाशक्ति दूर करायचा प्रयत्न केला पाहिजे."

मीं विचारलें, "कुणीं लिहिलीं असतील हीं पत्रं ?"

मुकुंदराव तिरस्कारव्यंजक स्वरांत म्हणाले, "आपले ते पूर्व-परिचित महाशय परांजपे, गिड्डसाहेब, प्रधान आणि--" मुकुंदरावांच्या मनांतलें नांव त्यांनी उच्चारलें नाही तरी मला तें कळलें.

"काका असतील यांत ?" मीं विचारलें.

"मला असं वाटतं."

"नसतील हो ते. कसं झालं तरी नातं आहे ना आमचं ! माझ्याविरुद्ध ते इतकं वाईट कस करतील ?"

"नसले तर चांगलंच."



## प्रकरण १९ वें

परंतु दुसऱ्या दिवशीं मुकुंदराव लहानीबाईशीं बोलण्यापूर्वीच त्यांनी आणखी एक भयंकर घोटाळा करून ठेवला.

मुकुंदराव कोर्टांत गेले होते. मी आणि ताई इंग्रजीच्या तासाकरिता शाळेंत गेलों होतों. जनीला इंदिराताईजवळ बसवून मावशी खाली ओसरीवर दोघीतिघी बायकांबरोबर गोष्टी बोलत बसल्या होत्या. त्याच वेळेला लहानीबाई इंदिराताईंना भेटावयास गेल्या होत्या. यशोदाबाईंना त्यांत वावगें कांहीच दिसलें नाही. अर्ध्यापाऊण तासाने लहानीबाई निघून गेल्या.

जरा वेळाने मावशी वर गेल्या तों इंदिराताई रडत पडल्या होत्या !

काय झालें म्हणून विचारतां, "सगळ्यांना नकोशी झालेय् तरी मी मेली कपाळकरंटी जगून राहातें आहे ! मला सुख नाही ती इतरांनाहि सुख नाही." असें बोलून त्या पुन्हा ज्या रडत सुटल्या त्या कशानेहि थांबेनात आणि औषधपाणीहि घेईनात.

संध्याकाळीं साडेसहाला मुकुंदराव जुन्नरहून आल्याबरोबर मावशींनी त्यांना घडलेला प्रकार सांगितला लहानीबाई येऊन गेल्यानंतर लगेच इंदिराबाई रडू लागलेल्या कळल्यावर मुकुंदरावांच्या ध्यानांत सर्व प्रकार आला. "आता मात्र मी त्या लहानीबाईची गय करणार नाही !" इतकें त्वेषाने बोलून ते तडक माडीवर गेले.

इंदिराताईंचे रडू थांबलें होतें. मग मुकुंदरावांनी जवळ बसून त्यांच्या अंगावरून हात फिरवून "इंदू" म्हणून हाक मारताच पुन्हा त्या कळवळून रडूं लागल्या.

नंतर हळूहळू सर्व हकीगत मुकुंदरावानी त्यांच्याकडून काढून घेतली. अपेक्षितच होती ती. निनांवी पत्रांतील सर्व हकीकत इंदिराताईंना खरी वाटावी अशा तऱ्हेने लहानीबाईनी ती रंगवून सांगितली होती. ताईच्या नर्सिंग कोर्सबद्दल चवकशी करण्यासाठी मी ससून हॉस्पिटल-

मध्ये दोनतीन वेळां गेलें होतें त्याचा विपर्यास करण्यांत आला होता. आणि मी तीन महिने पुण्यांत राहिलें त्याचाहि विपर्यास करून इंदिराताईंचें मन लहानीबाईंनी घायाळ करून टाकलें होतें. मुकुंदराव त्यांना सर्व खरा प्रकार समजावून सांगत होते. मला हा प्रकार कांहींच माहीत नव्हता. माझें काम आटपून मी ताईबरोबर फिरून घरीं आलें आणि नित्याप्रमाणे इंदिराताईच्याकडे निघालें. मावशींनी मला हकीकत सांगतांच मुकुंदराव तिथे आहेत हें माहीत असतां मी धाईनेच माडीवर गेलें. माझ्या काळजाने अगदी ठाव सोडला होता !

मुकुंदरावांनी असहाय्यपणें माझ्याकडे पाहिलें आणि मला पाहातांच इंदिराताईंनी मान वळविली.

मी माडींत आलें की इंदिराताई किती मनापासून स्मित करीत त्या स्मितांत आगतस्वागत भरलेलें असायचें. दुखण्यांत त्यांनी आठवण करून करून मला पुण्याहून आणलें व माझ्या हातची शुश्रूषा आनंदाने घेतली. इतर सर्वांपेक्षा त्यांना माझी शुश्रूषा जास्त आवडे. मला बघून त्यांच्या जिवावरल्या दुखण्याने माघार खाल्ली.

आणि आज ? मला बघून इंदिराताईंनी दुःखाने आणि तिरस्काराने मान वळविली होती !

लाजेने मी अर्धमेली झालें.

मला कसेंतरीच शून्य वाटूं लागलें. मळमळल्यासारखें होऊन घेरी येतेसें वाटलें, म्हणून मीं भिंतीला टेकून डोळे घट्ट मिटून घेतले. मी क्षणभरच तशी उभी असेन, पण मला वाटत होतें, की अनंत काळाच्या लाटा माझ्या डोक्यावरून जाताहेत. त्यांच्या होत असलेल्या प्रचंड खळखळाटाने माझें डोकें बधिर झालें !

मला दुरून कुठून तरी खोल खोल आवाज ऐकूं आला--

" सुमतीताई ! "

इंदिराताई मला हाक मारीत होत्या. त्यांच्या स्वरांत किती आर्तता होती !

मी एखाद्या अपराध्याप्रमाणे पलंगाजवळ जाऊन उभी राहिलें. मनांतून मला वाटत होतें, की काय आणि कसें यांना समजावून सांगूं

म्हणजे त्यांचा गैरसमज दूर होईल ? मुकुंदरावांना जी गोष्ट साधत नव्हती हें उघड होतें ती मी त्यांना कोणत्या प्रकाराने समजावूं ? माझ्या तोंडून शब्द निघेना.

मला वाटलें, इंदिराताई वाईट वाटून मला आवेगभरांत दूषणें देणार, तिरस्काराने बोलणार, म्हणून मीं भीतियुक्त मनानेच " इंदिरा-ताई" म्हणून हाक मारून पुढे बोलण्यासाठी आवंढा गिळला.

मुकुंदराव हतबुद्ध झाले होते.

तितक्यांत इंदिराताईनी मुकुंदरावाचा उजवा हात हातीं घेतला. त्या व्यथित चित्ताने बोलूं लागल्या, " मी मरण मागतें तरी मला तें मिळत नाही. पण तेवढ्याकरिता लोकदूषण तरी कां पतकरतां ? " इंदिराताईनी माझा उजवा हात आपल्या डाव्या हातीं घेतला. " मी मेलें असं समजा, नी..."

त्यांचा आशय ओळखून मुकुंदरावांनी आपला हात त्यांच्या हातून ओढून घेतला. संतापानेच ते म्हणाले, " इंदु, तुला हें असलं वागणं शोभत नाही. मी इतका जीव तोडून सांगतों आहे तें तुला खोट वाटतं अन् त्या लहानीबाईच्या बोलण्यावर अन् त्या निनांवी पत्रांवर मात्र तूं अढळ विश्वास ठेवावास अं ! तूं अन् मी लहानपणीं एकत्र वाढलों, इतकीं वर्षं एकत्र संसार केला, पण माझ्या स्वभा-वाची तूं ही अशी पारख करावीस ? व्यर्थ माझं प्रेम ! " मुकुंदराव उद्वेगभरांत इतके बोलून जाऊं लागले.

इंदिराताईना आता हुंदक्यांवर हुंदके येत होते. त्यांनी हाक मारली, " जाऊं नये. "

पण मुकुंदराव दारांतून वळून म्हणाले, " माझ्याबद्दल जोंपर्यंत तुझं मन साफ होणार नाही तोंपर्यंत मी आता या माडींत पाऊल टाकणार नाही. "

मुकुंदराव निघून गेले. मी इंदिराताईचा हात हातीं घेऊं लागलें: पण त्यांनी हात मागे घेतला; तेव्हा मी पण खाली आलें

मग मावशी त्यांच्याजवळ जाऊन बसल्या. कसली ती भयंकर रात्र ! मला वाटतें, त्या रात्रीं कुणाच्याहि डोळ्याला डोळा लागला नाही !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं इंदिराताईनी मला आणि मुकुंदरावांना बोलावणें पाठविलें. केल्या प्रकाराबद्दल त्यांना अंतःकरणपूर्वक वाईट वाटत होतें. आम्हां दोघांना जवळ बसवून घेऊन त्यांनी सांगितलें, की लहानीबाईशीं बोलणें झाल्यापासून तें सर्व खरें वाटून त्यांचें मन अतिशय बिथरून गेलें होतें. त्यांनी रात्रभर विचार केल्यानंतर त्यांना लहानीबाईच्या बातमींतील खोटेपणा पटू लागला. बारीकसारीक गोष्टी व ताईने सांगितलेली नर्सिंग कोर्सची हकीकत आठवून खऱ्या गोष्टी त्यांच्या ध्यानांत आल्या. इंदिराताईनी काल्च्या प्रकाराबद्दल स्वतःकडे दोष घेऊन आमची पुनःपुन्हा क्षमा मागितली. त्यांना थांबवतां थांबवता आम्हांला पुरेवाट झाली.

त्या मला म्हणाल्या, " सुमतीताई, मीं यांचा तर अपराध केलाच, पण तुमचा त्याहूनहि मोठा अपराध केला. असली ही घाणेरडी कल्पना मीं खरी मानायला नको होती. "

" इतकं मनाला कां लावून घेतां ? इतका पुरावा मिळाल्यावर तुम्हांला तरी कां खरं वाटू नये ? "

" सुमतीताई, तुम्ही माझ्या आजारात धांवून आलां, माझी जिवापाड शुश्रूषा केलीत, त्याचे हे असे उपकार फेडले मीं ! "

मुकुंदराव मुद्दामच चेष्टेने म्हणाले, " पण काय ग इंदु, मागं तूं मारे अगदी औदार्य दाखवीत असेस, की सुमतीताईशीं लग्न करा, मला त्यांत फार आनंद होईल, तें खोटंच वाटतं ? काल इतकं अगदी मग पिसाळायला काय झालं ? "

" कशी झालें तरी बायकोच आहे ना मी इकडची. माझ्या बुद्धीला तें पटलं तरी माझं प्रेम -- " इंदिराताईनी लाजून मान फिरवली. मुकुंदरावांनी हसून तिच्या केसावरून हात फिरवला.

केवढें तरी समाधान मला वाटत होतं ! एखाद्या दुष्ट भीतिदायक स्वप्नांतून जागें झाल्याप्रमाणे माझें मन शांत झालें होतें.

मुकुंदरावांनाहि अतिशय बरें वाटत होतें. पण त्यांना पुरतेंसें स्वस्थ वाटत नव्हतें.

कारण इंदिराताईची खात्री झाली तरी गावकऱ्यांची खात्री पटवून देणें अत्यावश्यक होतें.

पुढील चार दिवसांत आमचीं कामें पूर्वीप्रमाणेच चालू होतीं. पण मन बिचकलेलें असे. लोक आपल्याकडे तिरस्काराने बघताहेत असें वाटे. कांही लोक जरा अनादराने बोलतहि.

पण मुकुंदराव मला धीर देत होते.

लोकांचा विश्वास पुन्हा संपादन करण्यासाठी थोडीशी खटपट करणें जरूर होतें.

नर्सिंग कोर्सची चवकशी करण्यासाठी मी ससून हॉस्पिटलमध्ये दोनतीन वेळां गेलें होतें तें ताईने सहजगत्या काकांना सांगितलें होतें. मीं ताईला त्याबद्दल त्या वेळीं जरा बोललेंहि होतें की तूं कशाला तें त्यांना सांगायला गेलीस म्हणून !

हॉस्पिटलमध्ये माझ्या जाण्याचा उल्लेख लहानीबाईंच्या तोंडून निघाला होता. जाण्याचें कारण मात्र त्यांना वेगळेच वाटत होतें !

या दुव्याने आम्हांला बेअब्रूच्या साखळदंडांत कायम जखडण्याचा त्या दुष्टांचा कट होता. पण नेमका हाच दुवा कमकुवत करणें आम्हांला सोपें गेले.

मी ज्या डॉक्टरांना भेटलें होतें, त्या दोघांकडून मीं इस्पितळांत कोणत्या कामासाठी गेलें होतें त्याबद्दल पत्रांतून खुलासाच मागवला.

तेव्हा मग लहानीबाईसकट सर्वांचीं तोंडें बंद पडलीं !

पण आम्हांला हा प्रश्न पडला, की लहानीबाईंना ही गोष्ट कळली कशी ? भवानी विरूपाक्ष मंडळांतील प्रकारहि माझ्याविरुद्ध खुलवून तिने चारचौघांना सांगितले होते, ते कसे?

या गोष्टीचा उलगडा आम्हांला पुढे झाला.

लहानीबाईची एक बहीण अलीकडे डॉ. प्रधान यांच्याकडे नर्स म्हणून राहिली होती. सुट्टींत लहानीबाई चार दिवस तिला भेटून आल्या होत्या. तेथेच विरंजगांवच्या बातम्या पुण्याला आणि पुण्याच्या बातम्या विरंजगांवला कळल्या होत्या.

हें सर्व कळल्यावर मी मनाचें समाधान करून घेत होतें, की निनांवीं पत्रें मला लिहिण्यांत काकांचें अंग मुळीच नसेल. मी इस्पितळांत गेलें होतें तें डॉ. प्रधानांनाच कळलें नसेल कशावरून ?

काही का असेना, तेवढ्या बाबतींत आमचें मन बरेंच स्वस्थ झालें होतें. लोकांना बोलायला आता जागा राहिली नव्हती. ल्हानीबाईने घरीं येऊन इंदिराताईंची माफी मागितली.

पण आता त्या माफीचा काय उपयोग होता ! त्यांनी इंदिराताईंच्या कानांत जें विष ओतलें त्याचा दुष्परिणाम आधीच झाला होता ! त्यांचें मन जरी आमच्याबद्दल आता पूर्ण स्वच्छ झालें असलें तरी त्या दिवशीं त्यांच्या भावनांना जो क्षोभ झाला तो त्यांना जाणवलाच !

इंदिराताईंचें दुखणें उलटलें, विकोपाला गेलें.

मुकुंदरावांनी पुण्याहून डॉक्टरांना आणलें; शुश्रूषेची शिकस्त केली, पण गुण पडला नाही. आम्हांला यश लाभलें नाही !

आणि–

आमच्या इंदिराताई आम्हां सर्वांना सोडून गेल्या !

पावसाची झिमझिम चालू असूनसुद्धा केवढी मोठी स्मशानयात्रा निघाली होती ! त्यांच्या गुणवर्णनपर भाषणें पुष्कळ झालीं. मुकुंदराव धीरगंभीरपणें कर्तव्य गोष्टी करीत होते. पण त्यांच्या मनांत केवढा दुःखसागर उसळला होता याची मला चांगली कल्पना होती.

लोकांना अतिशय हळहळ वाटत होती. इंदिराताई लवकर जायच्या हे सर्वांनाच माहीत होतें. पण त्या अशा प्रकारें दुखणें उलटून जाव्या याचे सर्वांना वाईट वाटलें.

ल्हानीबाईविरुद्ध गावांतलें लोकमत फार बिघडलें. शेवटीं त्या बाईने शाळेचा राजीनामा लिहून दिला.

आमच्यावर सर्वांच्या सहानुभूतीचा वर्षाव होऊं लागला.

आणि जरा कुठे स्थिरस्थावर होतें तों काकांचें मला पत्र आलें. त्यांत त्यांनी माझ्यावर वाटेल तसें तोंडसुख घेऊन "तूं आमच्या घराण्याला काळोखी फासलीस. तुमच्याच दुष्कृत्यामुळे धक्का बसून मुकुंदरावांची बायको वारली ही जाणीव ठेव ! आता तरी त्या कुलंकट मुकुंदरावांचा नाद सोडून दे नाहीतर लग्न तरी करून टाक त्याच्याशीं !" अशी शेवटीं मला सूचना केली होती.

परांजपे, डॉ. प्रधान यांचा खुनशीपणा मला आकलन होत होता. त्यांचे डावपेच मला त्रस्त करून सोडीत होते पण काकांचा दुष्टपणा मला समजत नव्हता. त्यांनी मला धारेवर धरून सतत असा मर्मभेद कां करावा तें मला कळत नव्हतें !

शिवाय काकांचें लग्न होईपर्यंत त्यांनी माझ्यावर प्रेम केलेलें होतें. तें प्रेम इतक्या भयंकर द्वेषांत कसें रूपांतरित झालें होतें याचा मला उलगडा होईना ! जाऊं दे पण! काय करायचें उलगडा करून ?



# प्रकरण ४० वें

पुढचें वर्ष कांही चमत्कारिकच गेलें. मला वाटतें, मुकुंदरावांचीहि मनःस्थिति विलक्षण झाली असून एकंदरींत गावावरच धुक्या-सारखें औदासिन्य पसरलें होते. आमच्ीं कामे चालू होतीं, पण त्यांत जीव नव्हता. आमच्या कार्यांचें पाऊल मागे पडले नव्हते, परंतु उत्साहाने ते पुढेहि पडले नव्हते.

इंदिराताई गेल्यानंतर पांचसहा दिवसांनीच दसऱ्याच्या दिवशीं होणारें शाळाचे संमेलन आल्याकारणाने तें गतवर्षी बंदच ठेवलें होते. यंदाचा समारंभ नुकताच झाला होता; परंतु तोहि आपला यथातथाच झाला.

मी आणि मुकुंदराव सारखें काम करीतच होतों, पण आमच्या नात्यांतील साधेपणा, सहजपणा नष्ट होऊन कसला तरी आडपडदा आला होता.

देवाला वाहण्यासाठी एखादें फूल नेत असतां अचानक त्याचा वास आला, की चमकल्यासारखें होतें. वाटतें, की देवाआधी या फुलाचा वास मला मिळाला हे बरें नव्हे; त्यामुळे त्या फुलाची किंमत जरा उतरली.

आमच्या प्रीतिकलिकेच्या अकालीं प्राप्त झालेल्या सुवासामुळे मला वाटते आमचें मन असेंच बिचकून गेलें होते. आमचें प्रेम प्रगट न व्हावे म्हणून आम्ही जपत होतों. लोकांची काकदृष्टि आमच्यावर आहे ही जाणीव आम्हांला होती.

अरेबियन नाइटस्‌मधली कोळ्याची गोष्ट माहीत आहे ना? त्यांतील राक्षसाला एका भांड्यांत बंदिस्त करून ते भांडे समुद्रांत बुडवून टाकलें होतें.

आमचेहि प्रेम आम्ही आमच्या मनांत महाप्रयासाने कोंडून ठेवलें होतें. आमचें मनहि आम्ही कामामध्ये बुडवून टाकीत होतों आणि त्याभोवती ढगाच्या छायेप्रमाणे निराशेचा अंधार पसरला होता.

आणि इतकें असूनसुद्धा हें सर्व वातावरण कृत्रिम आहे, तें लवकरच दूर सारलें पाहिजे ही जाणीव आमच्या मनाला पूर्णपणें होती.

इंदिराताईंच्या मृत्यूने मावशींना फार धक्का बसला होता. स्वतःच्या मुलीप्रमाणे त्यांनी इंदिराताईंच्यावर माया केली होती. नेहमी त्यांच्या आठवणी काढून मावशी डोळ्यांना पाणी आणीत.

परंतु सहा महिन्यांनंतरच त्यांनी मुकुंदरावांना, मी तेथे असतांना सुचवलें होते— " झाली गोष्ट वाईट झाली हें खरंच; पण आता जगरहाटीकडे लक्ष द्यायला हवं. "

" इतक्यांतच काय घाई आहे ! " म्हणून मुकुंदरावांनी उडवाउडवी केली होती.

त्यांच्या मनःस्थितीची मला पूर्णपणें जाणीव होती.

आमची ही चमत्कारिक मनःस्थिति बदलावी म्हणून आम्ही खरोखरीच मनापासून प्रयत्न करीत होतों; पण त्यांना यश लाभलें नव्हतें.

आणि अंधारापोटीं प्रभाकराचा उदय व्हावा त्याचप्रमाणे आमच्या गावाला डॉ. प्रभाकरपंत आले आणि त्यांनी थोड्याच दिवसांत आपल्या उत्साहाने, आनंदी आणि बोलक्या, खेळकर व प्रेमळ स्वभावाने आमच्या गावांतलें तात्पुरते आलेलें औदासिन्य तर घालवलेंच; पण आमचीहि वृत्ति पुन्हा उल्हसित करून टाकली

प्रभाकरपंत हे पुण्याला एल्. सी. पी. एस्. झाले असून दोनतीन वर्षांत पुण्याला जम बसेना म्हणून मुकुंदरावांच्या सल्ल्यावरून ते विरंजगांवीं आले व त्यांनी दवाखाना उघडला.

डॉक्टर विधुर असून त्यांना एक मुलगी होती.

ती मुलगी आजोळीं होती.

डॉक्टरांच्या आगमनानंतर आम्हांला लवकरच कळून आलें, की आमच्या विरंजगांवला एक तरुण डॉक्टर तर लाभलाच; पण शिवाय आमच्या कार्यांत मदत करील असा एक कार्यकर्ताहि आम्हांला मिळाला होता.

बलिप्रतिपदेचा दिवस होता तो. मी, डॉक्टर व ताई असीं आम्ही तिघेहि घरीं— ज्या मुख्य घरांत मुकुंदराव व मावशी राहात त्यासंबंधी उल्लेख करतांना आम्ही घर असें म्हणत असूं व माझ्या माडीला पुढली माडी हें नांव होतें— जेवावयास जाणार होतों. मावशींनी ब्राम्हण, सुवासिनी बोलावलीं होतीं. भटजींची पत्नी स्वैपाकाला आली असून त्या व मावशी कडक सोवळ्यांत· श्रीखंडपुरीचा स्वैपाक करीत होत्या.

आज सकाळीं लेण्याद्रि पाहून यावा असा प्रभाकरपंतांनी संकल्प केल्यावरून आम्ही चौघे— म्हणजे मी, ताई, मुकुंदराव व प्रभाकरपंत असे सकाळीं लवकर अभ्यंगस्नान करून निघालों.

देवाचें मंगल स्नान व पूजाअर्चा संपवून भटजी खालीं आपल्या घरीं जायला निघाले होते.

सर्व लेणें बघून झाल्यावर प्रभाकरपंतांना जेव्हा कळलें की खरा गणपति मागल्या गुहेंत आहे म्हणून, तेव्हा “ बघूं या तर जरा तिकडे जाऊन ” असा डॉक्टरांनी आग्रह धरला. भटजींनी त्यांना पुष्कळ सांगितलें, की “ नाना फडणिसांना जी गोष्ट अशक्य झाली ती तुम्ही कशी करणार ? शेवटीं देवीनं त्यांना साक्षात्कार दिला की तुम्ही या भानगडींत पडूं नका. देवाची इच्छाच तशी तिथं आपणां मानवांचा काय उपाय ? ”

आम्हींहि त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण प्रभाकरपंतांचा उत्साह कायमच होता. आपल्याबरोबर आणखी ताईलाहि त्यांनी नेलें.

मुकुंदराव हसत म्हणाले, “ जा, जा. दहा मिनिटांत परत याल ही माझी खात्री आहे. ”

भटजी खाली निघून गेले. त्यांना आज जरा गडबड होती.

ते गेल्यावर आम्ही दोघेंच एका झाडाखाली बसलों.

जरा वेळानें शांततेचा भंग करून मुकुंदरावांनी विचारलें, “ आपण मागं आलों होतों तें आठवतं ? चार वर्षं झालीं ” त्या गोष्टीला, नाही ? ”

" नुसतं आल्याचंच काय, पण आपण कायकाय बोललों तेंसुद्धा आठवतं. "

" खरंच, त्या वेळीं केलेले बेत इतपत सफल होतील असं मला कांही वाटलं नव्हत. पुष्कळच कल्पना मूर्त स्वरूपाला आल्या, नाही ? "

" होय तर. खरोखरच समाधान मानण्याजोग्या पुष्कळच गोष्टी घडून आल्या आहेत. शेखमहंमदाचे तुम्ही वडील भाऊ की धाकटे भाऊ हें मीं त्या वेळीं नक्की ठरवलं नाही हेंच फार बरं केल." मीं हसून म्हटले, " नाही ? "

यावर मुकुंदराव हसले. नंतर ते म्हणाले, " पण तुमची जर मला मदत मिळाली नसती तर मात्र तें जितकं सर्व बाजूंनी सुंदर झाल असतं की नाही याची मला शंका वाटते ! "

मीं त्यांना सांगितले, " सगळ्याचं श्रेय तुमच्याकडेच आहे. माझ्याकडून हें सत्कार्य करून घेऊन तुम्हीं माझ्या आयुष्याला अर्थ आणला आहे. माझ्याकडे कांहीएक मोठेपणा येत नाही. "

" तुमच म्हणणं क्षणभर खरं असं धरलं तरी सुमतीबाई, विहिरींत पाणी असलं तरच त्याला पंप लावून बागेंत त्याचा उपयोग करून घेतां येतो, नाही का ? विहिरींतच पाणी नसेल तर- "

आम्ही दोघेंहि यावर मनापासून हसलों.

" पण माझं एवढयानंच समाधान झालं नाही. अजून आपल्याला कित्येक गोष्टी करायच्या आहेत. माझ्या पुढल्या सर्व कल्पना मीं तुम्हाला सांगितल्याच आहेत. त्यांना मूर्त स्वरूप आपण दिलं पाहिजे. " मुकुंदराव उत्साहभरांत बोलत होते. त्यांचे डोळे चमकत होते.

" खरोखर, आपण तितकं सगळं करूं शकलों तर किती मौज होईल, नाही ? " मुकुंदरावांच्या उत्साहाने माझेंहि मन भरून गेलें होतें.

जरा वेळ आम्ही आपापल्या विचारांत गढून गेलों. नंतर अचानक मुकुंदरावांनी विचारलें, " त्या दिवशीं त्या विकत घेतलेल्या मूर्तीला पुन्हा कांही सूर्यदर्शन घडलं नाही वाटतं ? "

मीं चमकून वर पाहिलें. पण मुकुंदराव हसून बोलत होते.

मुकुंदरावांचें वय आता चाळीस वर्षांचें होतें. त्यांचे गाल जरा बसले होते; परंतु ते हसले की अजून त्यांच्या गालांना खळ्या पडत. त्यांच्या हसण्यांतील मोहकपणा मन आकर्षून घेई.

पण आज कित्येक महिन्यांनी मुकुंदरावांचे इतकें मोकळेपणाचें हसणें मीं पाहिलें होतें. त्यांच्या तेजस्वी नेत्रांत प्रेमभावना उमटल्या होत्या.

मुकुंदरावांच्या प्रश्नामुळे माझ्या मनावर लज्जेचें आवरण उत्पन्न झालें. मला कांही बोलवेना! नुसतें हसूं मात्र आलें.

मुकुंदराव हळुवारपणें माझे हात धरून नंतर म्हणाले, " मला अशी भीति वाटूं लागली आहे, की एक माणूस पुन्हा पुण्याला पळून जातं की काय! पण आता मी तें माणूस कायम पकडून ठेवणार आहे अं!"

" आधीच पकडून ठेवलेलं आहे. " मी हळूच बोललें.

" मग असं असून गेल्या वर्षी पुण्याला कसं दोन महिने राहावलं ? मीं इकडे कसे ते दोन महिने काढले माहीत आहे ? "

" आणि मी कांही मजेंत नाही राहिलें पुण्याला. एकेक दिवस मोजीत होतें. सगळं जीवन निरर्थक वाटूं लागलं होतं मला. "

" मला तसंच झालं होतं. चार चार वेळां मनांत येई, की यावं पुण्याला. पण धीर होईना. आणखी फार दिवस मला काढतां आले असते असं कांही वाटत नाही. कदाचित् आलोंहि असतों. "

" पण त्यापूर्वीच कदाचित् मीच इकडे शरणचिठी घेऊन निघून आलें असतें. माझी चूक मला नीट चांगली कळून आली होती. "

" छे: छे:! चूक नव्हती ती. अति निराशेचा परिणाम होता तो. पण त्यावरूनच माझ्यावर तुझं किती प्रेम आहे याची खात्री पटली

मला माझ्या प्रेमाची पूजा तूहि प्रेमानंच बांधतेस याचा प्रत्यय आला. ”

माझ्याकडे मुकुंदराव बघत होते. किती पवित्र आणि सोज्वल प्रेम त्या दृष्टींत साठवलें होते. दृष्टिसुमनांनी ते जणू माझी पूजाच बांधीत होते.

आणि ती विठ्ठलरावांची विषयांध नजर ! शीः !

मुकुंदराव पुन्हा हसून म्हणाले, “ काय मजा पाहा. ती सहा वर्षांची शेपटेवाली पोरगी पुन्हा माझ्या आयुष्यांत येईल आणि इतकं महत्त्वाचं स्थान घेईल ही मला कल्पना तरी होती का ? ”

“ पण हीं मधलीं दुःखमय वर्षं आपल्याला भोगायला नसतींच लागलीं तर किती चांगलं झालं असतं ! ”

“ नाही. मला वाटतं, एकापरीनं त्यांतसुद्धा अर्थ आहे. रात्रीं काळ्या आकाशाच्या पार्श्वभागावर चांदण्या जास्तच खुलतात. त्याप्रमाणं आपल्या दुःखमय आयुष्यामुळ यापुढील सुखांत आपल्याला अधिकच स्वारस्य वाटेल. ”

मुकुंदराव बोलत असतां त्यांच्या खादीच्या शुभ्र कोटाकडे माझी नजर गेली. वरल्या झाडाच्या पर्णराजीमधून थोडेसे सूर्यकिरण त्यावर पडले असून सावली आणि ते सोनेरी किरण यांची नयन-मनोहर नकशी तयार झाली होती.

माझ्या मनांत एकदम कल्पना आली, मनुष्याचा आयुष्यपट प्रथम असाच शुभ्र आणि निर्मळ असतो आणि मग त्यावर सुखदुःखांच्या सोनेरी आणि काळ्या रंगछटांनी त्याचें चरित्रचित्र रेखाटलें जातें. त्या काळ्या रगाच्या मिश्रणामुळेच सोनेरी नकशीकाम जास्त खुलून दिसतें.

अन् बघतां बघतां ती सोनेरी नकशीच तेवढी माझ्या दृष्टीला दिसूं लागली. ती नकशी अधिकाधिक तेजोमय होतां होतां तिच्या दीप्तीने माझे डोळे दिपून गेले

मुकुंदरावांच्या प्रश्नामुळे मी या तंद्रींतून जागी झाले, “ तुला नाही वाटत असं सुमती ? सुमती ! ”

सुमती हीं अक्षरें त्यांनी किती नाजुकपणें आणि कोमल आवाजांत उच्चारलीं होतीं !

एकदम मुकुंदरावांनी मला आपल्या बाहुपाशांत घेतलें. मी त्यांच्या त्या धीरोदात्त हृदयावर मस्तक टेकलें. त्या क्षणीं माझीं पूर्वायुष्यांतील सर्व दु:खें, संकटें आणि निराशा हवेंत पार विरून गेल्यासारखें मला वाटलें आणि अननुभूत सुखसंवेदनांच्या लहरी नसानसांतून वाहत असल्याचा मला भास झाला.

त्या सुखाच्या मोहिनीने भारावल्यामुळे मीं माझे नेत्र मिटून घेतले आणि दुसऱ्याच क्षणीं मुकुंदरावांचा मृदु ओष्ठस्पर्श त्यांना होत असल्याची जाणीव मला होऊन माझ्या हातांचा विळखा आपोआपच त्यांच्या कंठाभोवती पडला.

०००

सर्वांनाच या बातमीने आनंद झाला. मावशी आणि ताई यांना तर अतिशयच आनंद झाला. आम्ही लग्नासाठी पुण्याला जाणार होतों; पण प्रभाकरपतांनी सांगितले, की " मी लग्नविधि शिकून तुमचं लग्न लावतों. हा पहिला पुनर्विवाह आपल्या गावांतच झाला पाहिजे. "

कुणींहि गावकऱ्यांनी हरकत केली नाही. लग्नसमारंभ साध्या रीतीनेच पण उत्साहाने पार पडला.

सर्व गावाला इतका आनंद झाला, मग आम्हां उभयतांना तर किती बरें आनंद वाटत असेल ?

हो. अन् काकांनीसुद्धा मला पत्र लिहून कळवलें, की " माझ्या पत्राप्रमाणं वागण्याची तुम्हाला सद्बुद्धि झाली याबद्दल मला समाधान वाटतं " म्हणून.

मग आणखी काय पाहिजे ?



## प्रकरण ४१ वें

मुकुंदरावांची सुवर्णज्युबिली केवढया तरी थाटामाटाने साजरी झाली !

त्या वेळीं त्यांना तालुक्यातर्फे, कलेक्टरसाहेबांच्या हस्तें मानपत्र आणि थैली अर्पण करण्यांत आली. ते पैसे मुकुंदरावांनी आपल्या कार्याकरिताच पुन्हा देणगीच्या रूपाने इंदिरताईंच्या नांवाने दिले.

ज्युबिली-समारंभासाठी चार दिवसांची रजा काढून भाऊ मुद्दाम आला होता. एकटाच आला होता.

कॉलेजांतले माझे तिघे मित्रहि आले होते !

या तिघांपैकी एकानेच, कॉलेजमधल्या एका मुलाला माझ्या-विरुद्ध वेडंवाकडें बोलल्याबद्दल मुष्टिमोदक चारले होते.

ते मुष्टिमोदक चारणारे हातच आता पेटीवादनांत इतके निष्णात झाले होते, की त्यांनी समारंभाच्या वेळीं मधुमधुर रागरागिण्यांच्या श्रुतिमनोहर स्वरलहरींनी श्रोतृसमुदायाला डुलत ठेवलें.

मावशींना किती धन्यता वाटली त्या दिवशीं! त्या आता पुष्कळच थकल्या होत्या. तरी त्या कधी रिकाम्या म्हणून बसत नसत.

गेल्या दहा वर्षांत मी आणि मुकुंदरावांनी इतकें थोरलें कार्य केलें की मला आश्चर्य वाटते-- आम्हांला इतका हा उरक आला तरी कसा ? इतकें काम आम्हांला करतां आलें कसें ? ”

पांच वर्षांपूर्वी विरंजगावकराचे राममंदिर सर्वांना खुलें झालें होतें आणि एक सहभोजन होऊन त्या समारंभासाठी जिल्ह्याचे कलेक्टर आले होते. त्यांनी सरकारी मदतीचे आश्वासन देऊन तें थोडयाबहुत प्रमाणांत पाळलेंहि. यानंतर आमच्या कार्याचा बोलबाला वर्तमानपत्रांतून होऊं लागला आणि इतर ठिकाणीं ग्रामोद्धारकार्य, करणाऱ्या मंडळींबरोबर मुकुंदरावांच्या आणि माझ्याहि नांवाचा गौरवपर

उल्लेख येऊ लागला. त्याचप्रमाणे आमच्या कार्याला बाहेरुन पैशाची मदतहि मिळूं लागली.

नुसती पैशाचीच मदत आम्हांला मिळाली असे नव्हे, तर गावांतलेच आमच्या हाताखाली तयार झालेले स्त्रीपुरुष आम्हांला आता मदत करीत होते.

ताई म्हणजे माझा उजवा हात झाली होती. ती बुद्धिमान् होतीच; पण तिच्या अगीं इतका दांडगा उत्साह नी उरक असेल असें मला कधी वाटलें नव्हतें.

आमच्या लग्नानंतर दोन वर्षांनीच ताईने प्रभाकरपंतांशीं पुनर्विवाह केला होता.

प्रभाकरपंतांचा दवाखाना थोडक्याच वेळांत फार चांगला चालूं लागला होता. अर्थात् खेडेगावांत शहराइतका पैसा मिळत नाही; पण कमी कांही पडत नाही इतकें खरें.

प्रभाकरपंत पहिल्यापासूनच आमच्या कामांत धडाडीने मदत करूं लागले. त्यामुळेच ताईची आणि त्यांची ओळख होऊन परस्परानुराग उत्पन्न झाला व त्यांनी पुनर्विवाह केला.

त्याच दिवशीं विरंजगावांत 'इंदिरा वाचनालय' उघडण्यांत आलें होते.

पुनर्विवाहानंतर दोन वर्षांनी त्यांना एक सुंदर पुत्ररत्न लाभलें. तेव्हा सर्व गावाने त्या मुलाचें बारसें साजरें केलें आणि यथाशक्ति बाळंतविडा केला.

आमच्या गावीं इतक्या वर्षांत आम्हीं किती गोष्टी केल्या अन् कशा केल्या त्या सांगत बसलें तर रामायणच होईल. तेव्हा इतकेंच सांगितलेलें पुरें, की आमच्या कार्याचें पाऊल सर्वतोपरीं पुढे होतें. आता त्याची पीछेहाट होण्याची भीति नव्हती.

मुकुंदरावांना आणि मला किती कृतकृत्य वाटत होतें!

मावशी तर आपल्या मुलाचे सारखे धन्यवाद गात असत.

ज्युबिलीपूर्वी सुमारें दीड वर्ष एक फार महत्त्वाची गोष्ट घडली. तेने माझ्या मनावर इतका कायम परिणाम करून ठेवला आहे, की आठवण झाल्याबरोबर तांबड्या रंगाने चितारल्याप्रमाणे तो प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर उभा राहातो.

मावशी त्या दिवशीं सकाळीं उठल्यापासून घोकीत होत्या, की 'एकदा आपण ओझरला जाऊं. काल स्वप्नांत मला विघ्नेश्वराचं दर्शन झालं."

तेव्हा मुकुंदराव त्यांना म्हणाले, "दर्शन झालं ना? मग झालं तर मग! पुन्हा आता जाण्याची यातायात पडूं नये म्हणून तर देवानं हा अनुग्रह केला."

यावर मावशींनी निक्षून सांगितलें, की "तुझी चेष्टाबिष्टा राहूं दे. मला आपल दर्शन करूं दे."

मुकुंदरावांनी भाड्याची टॅक्सी केली आणि आम्ही दोघें, मावशी व डॉक्टर अशीं चौघें ओझरला गेलों. ताईच माझ्याऐवजी जाणार होती; पण मुलगा जरा आजारी पडल्याकारणाने तिचें जाणें रहित झाले आणि मला जायला मिळालें.

तेथल्या तेथेच एकजणीने नैवेद्याच्या स्वैपाकाची व्यवस्था केली.

सर्व धर्मकृत्यें आटोपून आमचीं जेवणे होतात तों एक भिकारीण आली. लेकुरवाळी होती ती. तिच्या कडेवर एक, पाठुंगळीला एक व दोन हातांशीं धरलेलीं लहानलहान मुलें होती. घाणेरडी पोरें, अंगावर कुणाच्याच धड कपडा नाही, हातांपायांच्या काड्या आणि पोटें बरगडीला गेलेलीं.

तें दारिद्र्याचें दृश्य बघून आमच्या सर्वांच्या पोटांत भडभडून आलें. मावशींनी तर पुन्हा भात टाकायला सांगितला. त्यांना जेवूं घालावे असा त्यांचा बेत होता.

अन्नाच्या आशेने त्या भिकाऱ्यांना जो काय आनंद झाला होता! आशाळभूतपणाने सर्व वाट पाहात होतीं.

मुकुंदराव म्हणाले, "आज एक आपण त्यांच्या जेवण्याची सोय केली तरी उद्या पुन्हा त्यांची अन्नान्नदशा व्हायचीच."

आमच्या गावीं आम्हीं थोडा प्रयोग केला होता. गावकऱ्यांना अडीअडचणीला आम्ही गावकऱ्यांनी यथाशक्ति हातभार लावून त्या निवारण्याचें श्रेय घेतले होतें. गावांतलेच दोन वृद्ध आंधळे आणि कामधंदा करण्याला असमर्थ असेहि दोन लोक गावच्या खर्चानें पोसले जात होते.

पण हिंदुस्थानांतले जे लक्षांनी मोजण्याजोगे भिकारी– धट्टेकट्टे असून भीक मागणारे लोक-– त्यांचा प्रश्न कसा सुटायचा ?

मीं त्या बाईला प्रश्न केला, " काय ग बाई, तुझा नवरा कुठंय् ग ? "

" तो भीक मागतो ना ! "

" तुम्ही दोघं कांही कामधंदा कां करीत नाही ग ? "

" काय करायचा कामधदा करून ? आमच्या बापजाद्यांपासून आमी भीक मागण्याचाच धदा करतुया चागली कमाई होती आमांला. "

" मग अशीं लक्तरं कां ग ? " मावशीने विचारलें.

" मग चांगले कपडे घालून कोन भीक देईल ? "

" तुझा नवरा कुठं आहे ? "

" त्यो हाये पुन्याच्या बाजूला. "

" बराच आहे की संसार तुमचा. मग तुम्ही भेटतां केव्हा ? '

" आता पुढल्या महिन्याला एकादशीला आळंदीला मी जायची. त्योबी तिथंच येईल. "

" आम्हीं काम दिलं तर करशील का ? " मीं थट्टेने विचारलें

" नाय बया. आपल्याला नाई त्ये येटीचं काम व्हायच. येक गाव भीक मागितली की प्वाट भरतंय् मग कशापायीं कामधदा ? "

भीक मागण्याची जोंवर लाज वाटते तोंवर त्या मनुष्याला उद्धरण्याचा विचार. भीक मागण्याची लाज वाटेनाशी झाली की संपलें त्याचें मनुष्यपण !

जेवणें झाल्यावर ती भिकारीण थोडा भात मागं लागली.

तेव्हा मावशींनी जरा रागांतच म्हटलें, "जेवण घातलं ना ? आता कसला आणखी भात ? कांही नाही मिळणार आता. जा इथून मुकाटयानं."

तेव्हा ती बाई गयावया करून म्हणाली, "बाई, येव तुमोला उदंड आउक्ष येईल. पण बाई, वाइच भात दिलांत तर उपकार व्हत्याल. इथून येक कोसावर येका झाडाखाली येक येडी पडलीया. किती दिवसांची उपाशी हाये कोन जानं ! परान जनु कंठाशीं आल्यात. आन्नान करतीया. गोळाभर भात खाईल बिचारी !"

"तुझी कुणी आहे की काय नात्याची ?"

"नाई. काल मीबी त्याच झाडाखाली झोपलें व्हतें. सारखी हात चाचपती नी म्हंती 'माझ्या गोटपाटल्या कुठं हायती ?' मला बगून मला माराया बगत व्हती. म्हणाली, की 'तूंच गोठपाटल्या चोरल्यास !' पन उठवत बी नाय तिला. मीं म्हनल, 'लईच शिरमंतीन पडलीस ग.' तर म्हनती, 'तुला ठाव नाय म्ही किती शिरमतीन हाये !' चांगलं तुमां बामनावानी बोलत व्हती. काय बया नांव बोलली. ध्येनामंदी बी न्हाईना !"

मीं म्हटलं, "खरंच असेल का कुणी श्रीमंतीण ?"

"अवं, अशा पुष्कळ म्यां आजवर बगितल्यात. शरीर विकून पैसा कमावत्यात अन् समदा गमावत्यात. आन मग आमच्या सगं भीक मागाया येत्यात. आमच्या अन्नाला वांटेकरीण मेल्या ! म्हनं शिरमतीन ! काय बयाच नांव ? हं आठवलं. तारिनीबाय, तारिनीबाय."

एखाद्या बॉंबचा शेजारीं स्फोट झाला असता तरी मी दचकलें नसते इतकी हें तारिणीबाई म्हणून नांव ऐकून दचकलें !

अन् त्याच वेळीं मुकुंदरावांनीहि माझ्याकडे बघितलें.

नंतर मी बोलून गेलें, "नांवासारखीं नांवं पुष्कळ असतात. तारिणीबाईंची ही अवस्था ! छे: ! अशक्य !"

"त्याचा काय नेम ?" मुकुंदराव म्हणाले.

"तर मग बघूं या ना आपण जाऊन. आता मनांत शंका आली आहे. आपण जर खात्री करून घेतली नाही तर माझं मन नेहमी खात राहील." मी आर्जवाने बोललें.

" त्यांत कठीण काय आहे ? एक कोसावर तर आहे. आपण मोटारींतून जाऊं. त्याला कितीसा वेळ लागतो ? "

मला अतिशय आनंद झाला.

ती भिकारीण अतिशय आश्चर्यचकित झाली होती.

ती गयावया करून म्हणाली, " बाई, मी नाई तिच दागिन चोरलेलं. "

" तुझ्यावर कांही तोहमत येणार नाही. तूं आम्हांला ती बाई कुठं आहे तें नक्की सांग. "

त्या बाईने सर्व खाणाखुणा नीट सांगितल्यावर तिला एक नोट देऊन आम्ही मोटारींतून निघालों.

जातांना नाना प्रकारचे विचारतरंग मनांत येत होते. डॉक्टर प्रश्न विचारीत होते, पण " मग सांगूं सर्व. आधी बघू तर खरं. " असें मुकुंदरावैंनी त्यांना उत्तर दिलें होतें तिने.

लवकरच आम्हांला तें झाड सापडलें. आम्ही आलों त्यापेक्षा निराळ्या रस्त्यावर हें होतें.

त्या झाडाखाली एक बाई निपचीत पडली होती. एक अस्थि-पंजर होता झालें. कशीबशी लाज रक्षण केली होती तिने.

कुठे त्या तारिणीबाई व कुठे ही वेडी भिकारीण ! ओळखण्या-जोगे कुठे काय होतें दोघींत ?

पण मी निरखून पाहूं लागलें तेव्हा नाकांडोळ्यांची ठेवण परिचित वाटूं लागली.

मला हळहळू शंका वाटूं लागली आणि ती दृढ होऊं लागली. पूर्ण खात्री पटेना तरी मीं म्हटलें, " मला वाटतं की त्याच या असतीलहि तेव्हा आपण या बाईला घरीं नेऊं या. बघू, नाहीतर नसल्या त्या म्हणून तरी कुठं फारसं बिघडलं ! एक मनुष्यप्राणी आहे ती. "

आम्हीं कशीतरी व्यवस्था करून त्या बाईला घरीं नेऊन बिछान्यावर निजविलें.

डॉक्टरांनी तिला कांही औषधपाणी करून थोडे चमचे दूध घातलें आणि शेकणें व चोळणें याहि गोष्टी माझ्याकडून करवल्या.

एका तासाने त्या बाईने डोळे उघडले. आपले हात उचलून आश्चर्याने ती बोलूंहि लागली,

" किती सुरकुत्या या माझ्या हाताला ? अन् किती काळवंडले हे ! मी फार आजारी होतें वाटत ? माझ्या गोठपाटल्याहि काढलेल्या दिसताहेत ... ! "

केसांवरून हात फिरवीत ती म्हणाली, "किती भरभरीत झालेत ! अगबाई ! अन् पांढरे कसे झाले हे ! " ती बाई केसांच्या बटा हातांनी पुढे आणून अति आश्चर्याने बघत होती. " अन् दातांना काय झालंय् ? असं कां चमत्कारिक वाटतंय् ? " तिने दातांना हात लावण्यासाठी जवळ नेला; पण त्या तोंडांत एकहि दात नव्हता ! किंचाळतच ती उठण्याचा प्रयत्न करीत बोलली,

" कोण मी ? कोण आहे मी ? तारिणीबाईच को दुसरी कुणी ? " हा मानसिक धक्का असह्य होऊन ती बाई पुन्हा बेशुद्ध पडली !



# प्रकरण ४२ वें

डॉक्टरांनी पुन्हा कांही उपचार चालू केले आणि आम्हांला समजावून सांगितलें, " मृत्यूपूर्वी वेडया माणसाचं वेड नाहीसं होऊन थोडा वेळ त्याची बुद्धि पूर्वीप्रमाणंच होते त्या वेळीं सर्व गोष्टी त्यांना नीट आठवतात. त्या कधी पूर्णपणानं आठवतात तर कधी अर्ध्यामुर्ध्या आठवतात प्रत्येक वेडयाच्या बाबतींत अस होतं की नाही कोण जाणे ! मी तरी ही असली केस प्रथमच बघतों आहे ! "

जरा वेळाने त्या बाईने डोळे उघडून सभोवार फिरवले. आता त्या डोळयांतली वेडाची लहर पूर्णपणे नष्ट झाली होती. माझ्यावर त्यांनी आपली दृष्टि स्थिरावली व ओळख पटल्याप्रमाणे उद्‌गार काढले, " सुमतीबाई, मी कुठं आहें ? बरेच दिवस आजारी होतं का मी ? "

तारिणीबाईच होत्या त्या !

त्यांच्या दैवाचा तो दुर्विलास बघून माझी बुद्धि बधिर झाल्या-सारखी झाली. मला कापरें भरलें आणि अनावर रडू येऊं लागलें.

पण मीं मन घट्ट करून तारिणीबाईचा हात आपल्या हातीं धरला. " तारिणीबाई, तुम्ही लवकरच आता बऱ्या व्हाल. तुम्ही विरंजगांवला माझ्या घरीं अहां. आता जरा डोळे मिटून स्वस्थ पडा आणि विश्रांती घ्या. "

तारिणीबाईंनी डोळे मिटले; पण त्या सारख्या विचार करीत असाव्या. कारण त्यांच्या मुद्रेवरून नाना प्रकारचे विकार उमटत होते आणि त्यांची आठवण जागी होत होती. त्यांच्या मुखावर दुःख-भावना येऊन त्यांचा श्वास जोराने चालला होता.

त्या दुःखभरांत बोलूं लागल्या, " अरेरे ! काय माझ्या आयु-ष्याचा मीं सत्यानाश करून घेतला ! "

मी तारिणीबाईंना स्वस्थ राहाण्यास सांगणार होतें, पण प्रभाकर-तांनी खुणेनेच त्यांना बोलूं द्या म्हणून सांगितलें.

मलाहि सर्व ऐकण्याची तीव्र उत्सुकता लागलीच होती. मी अधीर चित्ताने ऐकूं लागलें,

" त्या नीच विठ्ठलरावाच्या नादीं लागून माझ्या आयुष्याची, पैशाची मीं धूळधाण करून टाकली मामंजींनी निढळाच्या घामानं मिळवलेला पैसा त्या चांडाळाच्या चैनीखातर खर्च व्हावा ना अगदी!"

" त्याचं जाऊं दे तारिणीबाई, पण तुम्ही इतके दिवस होतां कुठं ? काय करीत होतां ? "

तारिणीबाईंनी शहारल्यासारखें केलें. त्यांचे डोळे भीतीने तारवटल्यासारखे झाले आणि त्या अं करून जरा विव्हळल्या. मला भीति वाटली की पुन्हा त्यांना वेडाची लहर येणार ! पण क्षणभरांत त्या बोलूं लागल्या. आपल्या आपल्याशींच जणू त्या बोलत होत्या. माझ्याकडे किंवा शेजारीं बसलेल्या प्रभाकरपंत, मुकुंदराव यांच्याकडे त्या बघतच नव्हत्या. अशक्त आवाजांत मधूनमधून आठवल्यासारखें करीत त्या बोलत होत्या,

" त्या विठ्ठलरावांनी मला सांगितलं, की ' त्यांचा पत्ता लागला असून ते नक्की वारले म्हणून दाखलाहि मिळाला आहे. तेव्हा आता आपण पुनर्विवाह करायला कांही हरकत नाही. माझी बायको नुसती आपली स्वैपाकपाणी करून मुलं सभाळणारी, पण माझं प्रेम मात्र तुझ्यावरच आंहे.' मला कोण आनंद झाला ! पण ते म्हणाले, की 'आधी ही इस्टेट माझ्या नांवावर कर्जफेडीबाबत करून दे. नाहीतर लग्नानंतर इस्टेट नानासाहेबांकडे जाईल ' मीं मूर्खपणानं तसं करून दिलं. नंतर विठ्ठलराव म्हणाले, की 'सर्वांना मी यजमानांनी बोलावलं आहे तिकडे जाणार आहे' म्हणून सांग. कारण थोडे दिवस आपण परगावीं राहूं. म्हणजे नानासाहेबांचा त्रास होणार नाही. विठ्ठलराव बोलतील तें मला वेदवाक्य वाटत होतं. त्यांनी सांगितल्याबरहुकूम मी सर्वांना सांगत होतें. तरीपण त्या सर्व आनंदांत मला मनांतून अतिशय भीति वाटत होती. विठ्ठलराव माझ्याशीं पुर्नविवाह करतील हें मला पुरतंसं खरं वाटत नव्हतं. पण मला कांही विचारण्याचा धीर झाला नाही. नंतर आठच दिवसांनी

दुपारीं माझं परगावीं जाण्यासाठी बांधलेलं सामानसुमान स्टेशनवर नेण्याची व्यवस्था करतों म्हणून त्यांनी नेलं. नंतर रात्रीं आठ वाजतां राहात्या घराला कुलूप लावून आणि किल्ली परांजप्यांच्या हवालीं करून मी घराबाहेर पडलें.

"नंतर विठ्ठलराव मला म्हणाले, की गाडीला अजून बराच अवकाश आहे तेव्हा आपण फिरायला जाऊं.

"ते मला पेरूच्या गेटावरून पुढे नेऊं लागले तेव्हा मला अतिशय भीति वाटूं लागली. रात्रीची वेळ, अंधार गडद पडला होता आणि रातकिड्यांचा किर्रर आवाज काळजाचा थरकाप करून सोडीत होता. झाडांच्या काळयाकभिन्न आकृति दिसत होत्या.

"पण विठ्ठलराव माझी थट्टा करूं लागले आणि लग्नानंतरच्या आयुष्याचीं मोहक चित्रें रंगवू लागले तेव्हा माझी भीति हळूहळू कमी होऊं लागली.

"आम्ही खजिन्याच्या विहिरीशीं आलों. तिथं विठ्ठलरावांनी रहाटाजवळ जाऊन डोकावल्यासारखं केलं; तेव्हा मीहि डोकावूं लागलें.

"तितक्यांत त्यांनी मला मागून जोरानं धक्का दिला. मी अगदी आंत पडायचीच, तितक्यांत मीं खांबाला गच्च धरलं आणि ओरडण्याचा प्रयत्न केला. विठ्ठलरावांनी माझा गळा दाबून धरला आणि दुसऱ्या हातानं माझा खांबाचा हात ते सोडवूं लागले. आणि तेवढयांत बोलत येणाऱ्या लोकांचा आवाज कानांवर आला! विठ्ठलरावांनी मला ओढीतच विहिरीजवळून आणलं व ते झपाटयानं चालूं लागले. मला वाटतं, त्या लोकांच्या भीतीमुळं विठ्ठलरावांना थोडा वेळ काय करावं नी'काय नाही त्याचं भान राहिलं नाही!"

तारिणीबाईंच्या तोंडावर घर्मबिंदु आले होते आणि त्या थरथर कापत होत्या.

मला असेंच स्वप्न पडलें होतें. तारिणीबाईंची हकीकत ऐकत असतां माझ्याहि जिवाचा थरकाप झाला होता.

"मी भीतीमुळ अर्धमेली झाले होतें. माझी बोबडी वळली होती. दात थडाथड वाजत होते. पायांत जीव नाहीसा झाल्यामुळं विठ्ठलराव जवळजवळ मला ओढूनच नेत होते.

"मोठ्या रस्त्यावर टांगा दिसतांच त्यांनी मला टांग्यांत घातलं आणि टांगा चालू झाला.

"विठ्ठलरावांचा चेहरा इतका क्रूर अन् निष्ठुर दिसत होता! त्यांनी माझा हात इतका गच्च आवळून धरला होता! मला कांही त्या वेळीं पुरती शुद्धच नव्हती! नाहीतर मी निमूटपणीं त्यांच्याबरोबर टांग्यांतून गेलेंच नसतें. सापासमोर बेडकीची अवस्था होते तशी माझी अवस्था झाली होती.

"मला स्टेशनवर नेऊन त्यांनी एका उभ्या असलेल्या गाडीच्या डब्यांत बसवलें आणि माझ्या कानांत सापानं फूत्कार टाकावा तसं ते बोलले, 'जर पुन्हा पुण्यास आलीस तर जिवत ठेवणार नाही. माझ्याविरुद्ध अक्षरहि तोंडांतून काढायचं नाही!'

"गाडी सुटेपर्यंत रागारागानं चवताळल्यासारखे माझ्याकडे बघत ते उभे होते.

"मला वाटतं, घडलेल्या प्रकारामुळं माझ्या मेंदूला धक्का बसला होता. मला कशाचं कांही भानच नव्हतं. नंतर मी कुठं उतरलें, काय झालं तें मला कांहीच आठवत नाही!

"मी बेशुद्ध पडलें की आजारी पडलें कोण जाणे!

"मला शुद्ध आली तेव्हा मी दिल्लीच्या एका घाणेरड्या वस्तींतल्या घरांत होतें. अर्थात् ही माहिती मला पुढं कळली. त्या घराची मालकीण मुसलमान होती. हिचं घर म्हणजे वेश्यागृह होतं.

"पुढल्या पांच वर्षांतलं माझं आयुष्य म्हणजे नरकवास. जो पुरुष पैसे देईल– नको ती आठवण..." तारिणीबाईनी आपले डोळे झाकून घेतले. शरमेने त्यांचें तोंड काळवंडून गेलें. त्यांच्या निस्तेज गढूळलेल्या डोळ्यांतून आसवें झिरपत होतीं.

जरा शांत झाल्यावर त्या म्हणाल्या, "पांच वर्षं मी तिथं त्या घरांत होतें. मनःस्तापामुळं मी वाळत चाललें होतें, ती एके दिवशीं

तापानं फणफणून पडलें. त्यानंतरचंहि मला कांही आठवत नाही. कां बरं आठवत नाही ? किती वर्षांतल मला आठवत नाही ? चार वर्षांतली एकहि गोष्ट मला आठवत नाही. कां बरं ?"

तारिणीबाईंनी कपाळाला हात लावला. भेदरलेल्या स्वराने त्यांनी विचारलें, "मला वेड लागलं होतं ? सुमतीबाई, मला वेड लागलं होतं ? खरं ना ? बोलत कां नाही तुम्ही ?"

तारिणीबाईचा अशक्त आवाज आंत आंत ओढत चालला होता. श्वासोच्छ्वास घेतांना घशांत आवाज होत होता. त्यांचा हात माझ्या एका हातीं घेऊन मी दुसऱ्या हाताने त्यांच्या अंगावरून हात फिरवीत होतें. मीं म्हटलें, "तारिणीबाई, जाऊं देत त्या पूर्वीच्या गोष्टी. आता मन शांत ठेवा म्हणजे तुम्ही लवकर बऱ्या व्हाल."

"सुमतीबाई, तुमच्यासारखी मैत्रीण मला लाभली हें मी माझं भाग्य समजतें. तुमच्यासारख्या सज्जनांत राहून माझी संपत्ति नी आयुष्य मीं सत्कार्यांत वेचलं असतं तर कशाला माझी ही दशा झाली असती! आज तरी सुदैवानं मी तुमच्यांत आलें आहे. सुमतीबाई, मी बरी झालें तर माझी इस्टेट आपण सत्कार्यांत खर्चू हं. मी खूप खूप काम करीन ! कां रडतां तुम्ही ? हें काय हें असं ? तुम्हीं मला धीर द्यायचा नी तुम्हीच रडतां ? सु– म-- ती– आ– आ--"

तारिणीबाईचा आत्मा त्यांच्या जर्जर देहाला सोडून गेला !

त्यांचे अंत्यविधि आम्हीं यथायोग्य रीतीने केले !

तारिणीबाईच्या आयुष्यांतील न कळलेल्या प्रसंगांचे दुवे आम्हीं मग मागाहून तर्कानेच जुळवले. ते म्हणजे विठ्ठलरावांनी तारिणी-बाईंना गाडींत बसवून दिलें. त्यानंतर तारिणीबाईंची खिन्न मनःस्थिति आणि विकलावस्था कांही गुंडांनी हेरून त्यांना कांही सबबींवर जवळपासच्या लोकांच्या लक्षांत कांही येऊं न देतां– अशा लोकांच्या स्त्रीसाथीदार असतातच-- मध्ये कुठेतरी उतरून घेऊन दिल्लीला नेलें असावें आणि त्यांनी त्या मुसलमान बाईला विकून टाकलें असावें व त्या गुंडांनीच सर्व दागदागिने लांबवले असावे.

तारिणीबाई थोड्याशा आजारानंतर बऱ्या झाल्या तरी बुद्धीने पूर्ण बऱ्या झाल्या नाहीत. त्यामुळेच त्या कांही सुटकेचा प्रयत्न न करतां त्या वेश्यागृहांत राहिल्या. मग त्यांना पुरतें वेड लागलें. त्यांचा धंद्याला उपयोग नसल्यामुळे त्या मुसलमान स्त्रीने त्यांना वेड्या असतांनाच घरांतून हाकलून दिलें. त्याच अवस्थेंत गावोगाव हिंडत पोटाला मिळेल तें भीक मागून खाऊन त्या कशातरी जीव धरून होत्या. हिंडतहिंडत त्या अचानक ओझर-जवळ आल्या. वेड्या असतांना त्यांना पूर्वस्थितीचें कधीमधी स्मरण येत असलें पाहिजे. किंवा निदान मृत्यूपूर्वी एकदोन दिवस कांही आठवणी होत असाव्या. त्यामुळेच पूर्ववैभवांतील गोठपाटल्या आणि आपल्या नांवाचें त्यांना स्मरण झाले.

कांही का असेना, कोणत्या तरी योगायोगाने शेवटीं मला त्या भेटल्या आणि माझ्यासमोर त्यांचा अंत झाला.

काय त्यांचे भयंकर जीवन ! पुढे कित्येक दिवस मला विठ्ठल-रावांच्याबद्दल भयंकर संताप येई. त्या तिरमिरींत असें वाटे की... मलाच नव्हे, सर्वांनाच त्यांची चीड येई.

तारिणीबाईंच्या मृत्यूनंतरच्या मे महिन्यांत भाऊ पुण्याला आला. आम्हांला त्याने बोलावल्यावरून आम्ही चौघें—म्हणजे मी, ताई, मुकुंद-राव आणि प्रभाकरपंत असे आठ दिवस गेलों होतों. आठ दिवस अगदी सर्वांचे बहारीचे गेले. आम्हां दोघांना भेटायला इतके लोक येत की वेळ कुठल्या कुठे निघून जाई. काकासुद्धा एकदा भेटून गेले.

पण त्यांतल्या त्यांत वेळ काढून तारिणीबाईंच्या वाड्यांतल्या त्या बाईंच्याकडे त्यांच्या नव्या पत्त्यावर मी गेलें.

अगदी म्हाताऱ्या झाल्या होत्या त्या. माझी ओळख पटल्यावर त्यांना अतिशय आनंद झाला. माझें आगतस्वागत करून माझ्या कार्या-बद्दल त्यांनी मोठा गौरव केला

मीं त्यांना तारिणीबाईंचा पुढील वृत्तान्त सांगितला तेव्हा त्यांना अतोनात वाईट वाटलें

" पराच्या गाद्यागिरद्यांवर ऐषारामांत लोळणारी बायको शेवटीं अन्नान्नदशा होऊन झाडाखाली तळमळत पडावी ना ? काय हा नशिबाचा फेरा ! "

असे उद्‌गार काढून नंतर त्यांनी विठ्ठलरावांना इतक्या शिव्या देऊन घेतल्या !

पण त्या शिव्या विठ्ठलरावांना का लागणार होत्या ? ते आम्हांला नव्या ओपेलमध्ये एकदा दिसले होते. व्यसनांमुळे गाल-फडें बसलेलीं, डोळे गढूळलेले झाले होते. पण कळलें, की त्यांच्या चैनींत कांही कमी नव्हतें.

त्यांना तारिणीबाईंची आठवण होत असेल का ?

त्यांनी तारिणीबाईंचें म्हणून जें प्रेत ओळखलें तें कुणातरी बाईचें बेवारशी प्रेत असावें. त्याची बातमी कळतांच परांजप्यांनी ती संधि साधून घेतली. प्रथमपासूनच ते अशी संधि शोधीत असावेत; ती दोन वर्षांतच त्यांना मिळाली.

इतक्या वर्षांत तारिणीबाईंचे काय झालें असावे असा विचार कधी त्यांच्या मनांत आला असेल का ? आठवण झाल्यावर काय वाटत असेल त्यांना ?

पण त्यांना कांही का वाटेना, तारिणीबाईंच्या हकीकतीच्या स्मरणाने माझें अंग मात्र अजूनसुद्धा शहारून निघतें.



# प्रकरण ४३ वें

मुकुंदरावांच्या ज्युबिलीनंतर चार महिन्यांनीच मावशींनी थोडयाशा आजारानंतर शांतपणें मुलाच्या मांडीवर डोकें ठेवून इहलोकींची यात्रा संपवली.

मुकुंदरावांनी सर्वांजवळ उद्गार काढले, की " माझ्या यशाचं खरं श्रेय माझ्या आईला आहे. तिनं देहकष्ट करून माझं शिक्षण केलं म्हणून मला इतकं सगळं करतां आलं. "

त्यांच्या स्मारकाप्रीत्यर्थ वाचनालयांत त्यांचा एक पुतळा करून बसवला

त्याच्या पुढील वर्षी जुन्नरच्या नव्या सब्जज्जांनी एक हजाराची देणगी दिली. त्याबद्दलचा आभारप्रदर्शनाचा समारंभ झाला.

त्यानंतरचा गोड प्रसंग म्हणजे भिवा कोष्टयाची मुलगी चार इयत्तांपर्यंत शिकल्यानंतर विणकाम व रंगकलेच्या शिक्षणासाठी बडोद्याला गेली होती. नवीन तऱ्हेच्या लुगडयांचा खप चांगला असल्यामुळे भिवा बराच संपन्न झाला होता. त्याने आमच्या सल्ल्यावरून आपली मुलगी कावेरी हिला आपल्या खर्चाने बडोद्याला ठेवली होती. ती पास होऊन आली तेव्हा आम्ही सभा भरवून तिचा गौरव केला आणि तिला एक घडयाळ बक्षीस दिलें.

आमच्या गावचीं आणखी पांच मुलें कलाशिक्षणासाठी परगावीं गेलीं असून एक शेतकी कॉलेजांत होता आणि एक नुकताच बी. ए. मध्ये गेला होता व तो पुढे वकील होणार होता.

मुलीदेखील हळूहळू पुढे येतील असा आम्हांला चांगलाच भरंवसा वाटू लागला होता.

सगळयांत कोणती गोष्ट विशेष लक्षांत येण्याजोगी झाली असेल तर ती म्हणजे गावाचा सोयिस्कर व्यापार चालू लागल्यापासून गावकऱ्यांच्या जवळ पैसा खेळूं लागला होता. पतपेढीचा उपयोग चांगला होत होता.

मुकुंदरावांनी एके दिवशीं माझ्याजवळ उद्गार काढले, " ज्या कार्यासाठी तनुमनधन अर्पून मी झटलों तें यशस्वी झालं असं म्हणायला आता हरकत नाही. पण तुझ्या मदतीवांचून मला इतकं सर्वांगीण कार्य करतां आलं नसतं."

तेव्हा मी मुद्दामच म्हणालें, " आता मी कांही मागल्यासारखं नाही म्हणायची. आता मी म्हणेन, की अर्ध श्रेय मला मिळालंच पाहिजे. मग मीं काही केलं असो की नसो."

यावर आम्ही खूप हसलों.

नंतर मीं सांगितलें, " पण आता इतकं काम तुम्हीं करूं नये. आता आहेत पुष्कळ लोक काम करणारे तेव्हा त्यांच्यावर जास्त काम सोपवीत चला."

मीं बरेच वेळां त्यांना तसं अलीकडे सुचवलें होतें अन् नेहमी-प्रमाणेच या वेळींहि त्यांनी निव्वळ हसण्यावारी सर्व घालवलें.

गेल्या दोनतीन वर्षांत मुकुंदरावांच्यांत किती बदल पडला होता! त्यांचे बरेचसे केस पिकले होते. त्यांचे गाल बसले असून चेहऱ्यावर वार्धक्यरेषा दिसूं लागल्या होत्या. गेल्या वर्षांत तर त्यांची प्रकृति बरीच खालावली होती.

तरीहि कुणाचे कांहीहि न ऐकतां ते काम करीत राहात.

आणि खरोखरी कामाचा व्याप इतका वाढला होता, की मुकुंदरावांना काम करण्यावांचून गत्यंतर नव्हतें. मी आणि प्रभाकरपंत त्यांच्या कामांत त्यांना मदत करून त्यांच्यावर फारसें काम पडूं नये म्हणून यथाशक्ति प्रयत्न करीत होतों. तरी शेवटीं त्यांना मुख्य सूत्रें हालवावींच लागत.

याचा परिणाम काय व्हायचा तोच होत चालला. कामाचा शीण येऊं लागला. जरा जास्तकमी खाणेंपिणें झालें की अपचन होई. अगदी बेतासबात खाणेपिणें, व्यवस्थित व्यायाम, याप्रमाणे प्रभाकर-पंतांच्या सल्ल्यानुसार राहून एक वर्ष बरें गेलें. नतर थोडथोडा जाणवूं लागलेला किडनीचा विकार बराच बळावला. ऑपरेशन करावें लागलें. त्यांतून ते सुखरूप बाहेर पडले व त्यांची प्रकृति बरीच सुधारली.

पुन्हा त्यांनी काम करण्यास सुरवात केली. आता त्यांचें धोरण मात्र स्पष्ट होतें सर्व कार्यसूत्रें आता माझ्या आणि प्रभाकरपंतांच्या हातीं व्यवस्थितपणे जमवून देण्याचा त्यांनी उपक्रम चालवला होता. आम्हीं त्यांना नको नको म्हणत असतां आम्हांलाच ते कर्तव्याचा उपदेश करीत.

सहा महिन्यांत मुकुंदरावांचा विकार पुन्हा बळावला. पुन्हा ऑपरेशन झालें; पण तें विशेष यशस्वी झाले नाही.

मुकुंदराव अंथरुणावर पडून असत. त्यांचा शक्तिपात होत चालला होता.

मुकुंदरावांची सेवाशुश्रूषा हेंच माझें आता मुख्य कर्तव्य झालें होतें. आमच्या कार्यासंबधी ते ज्या कांही इच्छा प्रदर्शित करतील त्या इतरांकडून यथायोग्य रीतीने पुऱ्या करून घेण्यांतच माझी समाज-सेवा सामावली होती.

डॉक्टर अनेक उपकरणांच्या सहाय्याने त्यांचें प्रकृतिमान तपाशीत, पण मुकुंदरावांच्या मुखावरील रेषा न् रेषा माझ्या दृष्टीला वाचतां येत असे. त्यांच्या वेदनांचें लेखन माझ्या हृदयावर उमटत असे. त्या वेदनांनी माझा जीव घाबरा होई.

मुकुंदराव माझा हात आपल्या हातीं घेत आणि क्षीणपणें हसत. त्यांच्या गालांवरल्या खळया कुठल्या कुठेच लुप्त झाल्या होत्या. त्यांचे ते तेजस्वी हसरे डोळे आता खोल गेले असून गढूळले होते. ती पूर्वीची पिळदार व सशक्त देहयष्टि आता जर्जर होऊन गेली होती.

मुकुंदरावांच्या सहवासांत जाईल तो महिना भाग्याचा असें मी समजत होतें. नंतर जाईल तो तास भाग्याचा असें मला वाटूं लागलें मग तो आनंद क्षणाक्षणाने मी मोजूं लागलें.

पुण्याचे एक नामांकित डॉक्टर, जुन्नरचे दोघे व प्रभाकरपंत त्यांच्याभोवती बसले असून मी त्यांचा हात धरून बसलें होतें.

त्यांची ती मूर्ति कायमची मनावर कोरून ठेवण्यासाठी माझे डोळे उत्कंठित झाले होते. पण वरचेवर आसवें साचून मला कांही दिसेनासेंच होई.

शेवटीं त्यांनी डोळे उघडले. माझ्याकडे आणि प्रभाकरपंतांच्याकडे पाहून ते क्षीण हसले. मोठें बळ करून ते बोलले, " कार्य चालू ठेवा." बोलतां बोलतां त्यांची मान उशीवरून सरकली.

गेले मुकुंदराव! माझे मुकुंदराव मला कायमचे अंतरले. गेले ते!

मला प्रभाकरपंत उठवू लागले; पण मला खरेंच वाटेना! 'मुकुंदराव' म्हणून मीं त्यांना हाका मारल्या. डोळ्यांवरून हात फिरवला, छातीवर चोळलें. मग वाटलें, ते बेशुद्ध पडले असावे. म्हणून तोंडावर पाणी शिंपडलें आणि चमच्याने तोंडांत थोडें दूध घातलें.

मग माझ्या लक्षांत आलें की मुकुंदराव आता पुन्हा माझ्याशीं बोलणार नाहीत!

" माझे मुकुंदराव! गेले ते! पुन्हा नाही भेटणार मला? मुकुंदराव, मुकुंदराव...! "

पण तो देह निश्चल पडला होता.

बाहेर मुकुंदरावांच्या प्रकृतीची वार्ता कळावी म्हणून शेकडो लोक उभे होते. त्यांना ही शोकजनक वार्ता कळतांच केवढा शोकसागर उसळला! अंतःकरणांतली आच होती ती.

पुढलें वर्णन करण्याचें मला सामर्थ्य नाही. मी मुळी घराबाहेर पडलेंच नाही .

त्यांची स्मशानयात्रा तालुक्यांतल्या लोकांनी जमून मोठ्या मानसन्मानाने काढली. रस्त्यावर फुलांचा नुसता खच पडला होता. किती हार त्यांना घातले होते!

हीं वर्णनें मला मागून कळलीं!

सर्व वर्तमानपत्रांनी दुःख व्यक्त करून त्यांच्या कार्याचा गौरव केला.



# प्रकरण ४४ वें

ते गेल्याला सहा महिनेच का झाले आहेत? की सहा वर्षे? की सहा युगें?

मागून मग मला विरंजगावी राहाण्याची मुळीच इच्छा नव्हती. पुण्याला जाऊन राहावे असे मला वाटत होते पण लोक ऐकेनात. त्यांनी मला सांगितलें, " आम्ही तुम्हाला कुठं जाऊं देणार नाही. मुकुंदराव आमच्या गावचे प्राण होते ते गेले, आता तुम्हीच आम्हाला त्यांच्या जागीं आहा "

मी पडेल तें काम करीत असते. योग्य ती सल्लामसलत देत असते, पण मला त्याचे सुखदु ख जाणवत नाही

माझाहि प्राण हरपला नव्हता का?

अन् तरी मी आपली जगतेच आहे आयुष्याचीं नवनवीं दालनें तयार होतातच आहेत!

ताई आणि गावांतले लोक मला म्हणताहेत, " पुढल्या वाढदिवशीं आम्ही तुमची ज्युबिली करणार आणि मानपत्र देणार "

पण मला आता त्या मानपत्राची काय किमत वाटणार आहे?

मुकुंदरावांच्या एका शब्दाने, एका दृष्टिक्षेपाने मला जो मान लाभत होता तो आता कागदांच्या भिंडोळ्यांनी मला कसा लाभणार?

आणि मला मानपत्र कशासाठी? ज्यांना खरें मानपत्र मिळण्याची योग्यता त्यांना तें मिळालें. त्यांतच मला सर्व पावलें पण लोक ऐकेनात.

नुकतीच पुण्याची एका संस्थेतील कांही मंडळी येऊन गेली, तीहि म्हणत होती, " आम्ही लवकरच तुम्हांला पुण्याला बोलावणार आहों."

मीं 'कशाला' म्हणून विचारतां त्यांनी सांगितलें, " तुम्हांला आम्ही मानपत्र देणार आहों. तुम्ही आमच्या पुण्याच्या ना! तुमच्या कार्याचा गौरव आम्ही नाही करायचा तर कुणी करायचा?"

भाऊ सहकुटुंब येऊन पंधरा दिवस राहून गेला. इंदूरला येण्याबद्दल त्याने मला मनःपूर्वक बोलावले. त्याची मुले हुषार आहेत पैशाच्या बाबतींत मात्र कधी मोटारींत तर कधी फाटक्या वहाणांत अशी अवस्था आहे त्याची. पुष्कळ पैसा असेल तेव्हा पुष्कळ खर्चून टाकायचा, कमी असेल तेव्हा थोडक्यांत भागवायचे !

हो खरेंच, काकासुद्धा येऊन गेले. त्यांनी आणखी एक बंगला डेक्कन जिमखान्यावर बांधला आहे. मोटारहि घेतली आहे.

गेल्या दहा-बारा वर्षांत लग्नमुंजीच्या छापील पत्रांनीच त्यांनी मला निमंत्रणें दिलेली होतीं. आता मात्र वसंताच्या धाकट्या मुलाच्या मुंजीचें निमंत्रण काका आणि काकू यांनी मोठ्या आग्रहाने दिलें

मग थट्टेचा देखावा करून काका म्हणाले, " नाहीतर जग दीशला तूं दत्तकच घेऊन टाक ना. म्हणजे मग तुलाहि एकटं एकट नको वाटायला. "

मीं सांगितलें, "मुकुंदरावांची आणि माझी संपत्ति विरंजगांवच्या उन्नतीप्रीत्यर्थ खर्चायची आहे त्यांतूनहि लहर येऊन दत्तक घ्यावासा वाटला तरी मी भाऊचा किंवा ताईचा मुलगा दत्तक घेईन. "

" असं ! तरी वाटलंच " काकू कुजकेपणाने म्हणाली, " पण म्हटलं ताईपेक्षा आमचं नातं जास्त जवळचं आहे हो "

पण मग बांगुलपणाच्या आविर्भावाने त्यांनी सर्व बोलणें थट्टेवारी नेलें आणि " जातांना पुन्हा मुंबईला आलंच पाहिजे हो " म्हणून आग्रहाचें बोलावणें केलें.

मी आता फक्त एका बोलावण्याची वाट पाहात आहें

माझ्या आयुष्याचें मुख्य लेणें कोरून झालें आहे ! मग आता उगीच काळ काढण्यांत अर्थ काय ?

आता तो वरला विद्युत्संदेश मला लवकरच येणार अशी मला आशादेखील वाटूं लागली आहे.

डॉ. प्रभाकरपंत मला सारखें म्हणतात, " तुमच्यावर आता टप्पट जबाबदारी पडली आहे. आणखी दहा वर्षं तरी तुम्हांला जगल

पाहिजे. तुम्हीं जर तशी इच्छाशक्ति धरली नाही तर आत्महत्त्येच पाप तुम्हांला लागेल."

"दहा वर्षं !! पण डॉक्टर, तुम्हांला जो महिना वाटतो तो मला वर्षासारखा जातो. माझ्या दृष्टीने मी आणखी आठदहा वर्षं जगण्याचा संभव आहे."

ताईलासुद्धा तसंच वाटलें की काय कोण जाणे; पण तिनेच मला माझे चरित्र लिहिण्यास सांगितले. अगदी आग्रहच धरला तिने. अगदी कंटाळत होतें मी. पण लिहितां लिहितां माझें मन त्यांत रमूं लागलें आणि मनाला विरंगुळा वाटूं लागला.

त्या निमित्ताने माझ्या आयुष्याच्या राजवाड्याचे साती चौक आणि साती मजले यांतून मी पुन्हा एकदा हिंडून आलें आहे.

मला राहूनराहून नवल वाटते, की मींच का हा राजवाडा बांधला ? की मी ही प्रेक्षक प्रवासी कुणी निराळीच आहे ?

माझा राजवाडा ? हो, माझा राजवाडा. काय हरकत आहे तसें म्हटलें म्हणून ?

आजच सकाळीं मीं वाचलें, की दोनतीन संस्थानाधिपतींना राजे हा किताब दिला म्हणून. राजेराण्यांचा किताब असा खिरापतीसारखा काय वांटावा ? सातचौकी, सातमजली राजवाडा ज्या संस्थानांत मावायचासुद्धा नाही तें कसलें राज्य ?

काय मौज आहे पाहा. तिकडे अमेरिकेंत शंभरावर मजले चढताहेत; पण तिकडे राजेराण्याच नाहीत ! अन् आमच्या हिंदुस्थानांत राजेराण्यांचा सुकाळ !

मग या सुकाळांत माझ्याहि आयुष्याला मीं राजवाडा म्हटलें तर बिघडलें कुठें ?

एक गोष्ट लहानपणीं सांगतात ती आठवते का ? सात गरीब भाऊ पोटापाण्याची सोय लावण्याकरिता दिल्लीला चालले होते. वाटेंत त्यांना लोकांनी विचारलें, "तुम्ही कोण ? कुणीकडे निघालां ?" म्हणजे त्या भावांनी उत्तर करावें, "हम सब राजपुत्र हैं. और दिल्लीको जाते हैं."

मी लिहितां लिहितां वर मान करतें तों तें समोरलें चिमुकलें लेणे मला दिसूं लागलें आहे. डोंगरांतली अवलीशी खिडकीच ! माझें चरित्र लिहायला मी माझ्या देवडीवरल्या आवडत्या माडींतच बसत असतें. खिडकीतून नजर टाकली की समोरला विस्तृत प्रदेश बघतां· बघतां माझ्या पूर्वायुष्याचा प्रदेशहि मला स्पष्ट दिसूं लागतो.

पण तें लेणें काय सांगतें आहे मला ? लेणें नव्हे, डोंगराने कांही बोलण्याकरिता आपलें मुख उघडलें आहे कानडी अम्मांच्या दातां सारखे लुकण लावलेले खांबांचे दात दिसताहेत.

हं हं. समजलें मला

काळाच्या डोंगरांत प्रत्येक जीव आपल्या जीवनाचीं बरींवाईट लेणीं खोदून ठेवीत असतो डोंगराच्या उदरांत ताऱ्यांप्रमाणे अगणित लेणीं खोदलेलीं आहेत

खरेंच, आकाशांतले तारे म्हणजे देवदेवतांचीं लेणीं असतील का ? असेलहि तसें.

स्वर्गातल्या देवदेवतांचीं लेणीं आकाशाच्या डोंगरांत आणि आमचीं लेणीं पृथ्वीवर

बरें तर ! माझ्या चरित्राला " माझीं कोरीव लेणीं " असेंच नांव देतें मी.

